# टॉम काका

— म्हणजेच —

# गुलामगिरींतील जीवन !



अमेरिकन विदुषी मिसेस हॅरियट बीचर स्टोकृत ' अंकल
टॉम्स केबिन ' या हृदय हालवून सोडणाऱ्या उत्कृष्ट
इंग्लिश कादंबरीची संक्षिप्त मराठी
आवृत्ति.

संपादक

विश्वनाथ गणेश ताम्हणकर.

महाराष्ट्र पब्लिशिंग हाउस, पुणें.

सन १९१२ ] [ किं. १२ आणे.

# संपादकाचे चार शब्द

सदर भाषांतर आमचे मित्र श्री. रामचंद्र विष्णु काळे यांनीं मुळांत केले तें आम्ही छाटून गाळून विद्यार्थ्यांच्या हातांत देण्यास योग्य असे तयार केलें. खरें मूळ श्रेय श्री. काळे यांसच आहे.

इंग्रजी ग्रंथांचीं भाषांतरें करावीं कीं रूपांतरें करावीं असा कोठें कोठें वादाचा प्रश्न आहे. ही कादंबरी तरी रूपांतरास योग्य नाहीं असें आमचें ठाम मत आहे. ही हृदय हालवून सोडणारी गोष्ट दहा आकरा वर्षांच्या मुलानें मोठ्या आनंदानें वाचून संपविली हा आमचा प्रत्यक्ष अनुभव आहे. ही गोष्ट या कादंबरीचें मनोहरत्व व सुलभत्व स्पष्ट करण्यास पुरेसे आहे असें आम्हांस वाटते.

संभाषणांतील अशुद्ध रूपें प्रथम प्रथम प्रो. म. रा. परांजपे यांचें सल्लयाप्रमाणें सुधारली पण पुढें आमचेकडे एका विदुषीनें प्रसिद्धीकरितां पाठविलेल्या गोष्टींत अशीच अशुद्ध रूपें लिहिलेली पाहून शेवटच्या पानांत कुठं, असं, तिथं, येतं--हीं कुठें, असें, तिथें, येतें अशी रूपें मुद्दामच बदललीं नाहींत. लोकमताचा तसा आग्रह दिसल्यास पुढील आवृत्तींत तशी सुधारणा करूं. यांत कांहीं परमेश्वरविषयक थोडा गहन मजकूर टॉम-काकाच्या संभाषणांत आला आहे पण तो एकंदर ग्रंथाच्या मानानें फार थोडा आहे.

छपाईत काहीं किरकोळ अशुद्धें राहिलीं आहेत तीं सहज समजण्या-सारखी असल्यामुळें स्वतंत्र शुद्धिपत्र दिलें नाहीं.

प्रो. महादेव रामचंद्र परांजपे यांनीं हीं कादंबरी वाचून केलेल्यां सूचना-बद्दल आम्ही त्यांचे फार आभारी आहों.

गुलामगिरीची प्रथम कल्पना आणून देणारे ‘ चतुर इसापचें चरित्र ’ ‘ गुलामगिरीचें उच्चाटण करणारा अब्राहाम लिंकन ’ यांचें चरित्र व गुलाम-गिरीस धक्का देणारी ही सुंदर ‘ कादंबरी ’ ही तिन्ही वाचल्यानें ‘ गुलाम-गिरी ’ या विषयाचा विद्यार्थ्यांच्या पुरेसा अभ्यास झाला असें म्हणावयास हरकत नाहीं.

## कादंबरींतील स्वभावचित्रें.

मिसेस शेल्बी, जॉर्ज शेल्बी, कुमारी ईव्हा, सेंटक्लेअर, मि. बर्ड, मिसेस बर्ड व मिस आफेलिया हीं सद्भावी व उदार पात्रें.

हेले, सांबो, क्विंबो, लेग्री, ही खल ( दुष्ट स्वभावाचीं ) पात्रें.

टॉमकाका, एलिझा, जॉर्ज हॅरीस, कॅसी हीं गुलामगिरींत जीवित कंठणारीं उदात्त व तडफेची स्वभावचित्रें होत.

या पुस्तकांतील दोषांची जाणीव आम्हांस आहे. दुसरी आवृत्ति काढण्याचा योग आल्यास ते दोष जरूर काढून टाकूं.

भाद्रपद शुद्ध ४
शके १८५४

वि. ग. ताम्हणकर.
संपादक.

## अंकल टॉम्सकेबीनच्या लेखिका.

# मिसेस एच. बी. स्टो. यांचें चरित्र.



प्रस्तुत 'गुलामगिरींतील जीवन' हें पुस्तक ज्या मूळ इंग्रजी कादंबरीचें संक्षिप्त भाषांतर [illegible] टॉम्स केबीन' ह्या सुप्रसिद्ध इंग्रजी कादंबरीच्या लेखिका मिसेस हॅरिअट बीचर स्टो यांचा अल्प परिचय येथें देत आहों.

हॅरिअट बीचर या प्रसिद्ध परोपकारी अमेरिकन लेखिकेचा जन्म अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांपैकीं कनेक्टिकट संस्थानांतील लिचफील्ड गांवीं ता. १४ जून १८११ इ. रोजीं झाला. यांच्या आईचें नांव रोक्सेना व व वडिलांचें लीमन. कनेक्टिकट हें न्यू इंग्लंडसंस्थानांपैकीं उत्तरेकडील एक संस्थान असून तेथील सुसंस्कृत लोकांत त्यांचें बालपण गेलें. इ. स. १८१५ सालीं त्यांची माता वारली व त्यांचे पालनाचा भार त्यांची वडील बहीण कॅथेराईन बीचर हिचेवर पडला. ती बुद्धिमान् व हुषार असून स्त्रियांचे शिक्षणाबद्दल तिला प[illegible]गी. कांहीं वर्षांनीं तिनें हार्टफोर्ट गांवीं एक शाळा काढली. त्यांत हॅरिअट बीचरचें शिक्षण झालें व पुढें त्याच शाळेंत त्या अध्यापिकेचें काम करूं लागल्या. इ. स. १८३२ सालीं त्यांचे वडीलांची ओहिओ संस्थानांतील सिनसिनाटी गांवीं नुकत्याच स्थापन झालेल्या एका धार्मिक शिक्षण संस्थेच्या अध्यक्षाचे जागीं नेमणूक झाल्यामुळें ते तेथें राहावयास गेले. त्यांचेबरोबर या दोघी बहिणीही तेथें गेल्या. स्त्रियांसाठीं तेथें विद्यालय काढण्याचा कॅथेराईन बीचरचा विचार होता. हॅरिअट बीचरनें ह्या वेळेपर्यंत शिक्षणाशास्त्राचा चांगला अभ्यास केला असून वर्तमानपत्रांतून किरकोळ लेख लिहिण्यास सुरवात केली होती. इ. स. १८३६ सालीं तेथील प्रो. कॉलव्हिन् एलिस स्टो यांचेबरोबर हॅरिअट बीचरचें लग्न झालें. त्या सिनसिनाटी गांवीं सुमारें अठरा वर्षें होत्या.

त्या काळीं संयुक्त संस्थानांत गुलामगिरी रूढ होती. संयुक्त संस्थानांचे

नकाशावर इलिनोइस संस्थानचे खालून आडवी रेघ मारून संयुक्त संस्थानांचे दोन भाग केले असतां वरच्या भागांत जीं संस्थानें येतात त्यांस उत्तरेकडील संस्थानें व खालचे भागांतील संस्थानांस दक्षिणेकडील संस्थानें म्हणतात. उत्तरेकडील संस्थानांत उद्योगधंदे बेताचे असल्यानें मजुरांची फारशी गरज लागत नसे यामुळें तेथें गुलामगिरी जवळजवळ नव्हतीच म्हटलें तरी चालेल. पण सुपीक जमीन व चांगली हवा यामुळें दक्षिणेकडील संस्थानें हीं निसर्गतःच कृषिप्रधान असून तेथें कापसाचे मोठमोठे मळे असत व त्यांतून कापसाची लागवड करणें, कापूस वेचणें व सरक्या काढून त्याचे गठ्ठे बांधणें इ. कामें मोठ्या प्रमाणावर चालत. या कामाला अर्थातच पुष्कळ मजूर लागत व तितके तेथें मिळण्यासारखे नव्हते यामुळें तेथील वसाहतवाल्यांना गुलामाची फार गरज लागे. कारण गुलामांचा अशा कामीं फार उपयोग होई. गुलामांची पैदास करून त्यांची वाढ करणें व त्यांचा व्यापार करणें हे धंदे दक्षिणेकडील संस्थानांतून चांगले चालत. गुलामांत बहुतेक भरणा आफ्रिकेंतील निग्रोंचाच असे. बहुतेक मळेवाले व गुलामांचे मालक आपल्या गुलामांना अत्यंत क्रूरपणानें वागवीत यामुळें धन्याच्या त्रासाला कंटाळलेले गुलाम उत्तरेकडील संस्थानांतून कानडाकडे पळून जात. कानडा देश उत्तरेकडील संस्थानांचे वरचे बाजूस आहे. तो इंग्लिशांचे ताब्यांत असून तेथें गुलामगिरीस [illegible] मज्जाव होता. उत्तरेकडील संस्थानांतलि पुष्कळ लोकांना ही गुलामगिरीची पद्धत आवडत नसल्यामुळें ते अशा पळून जाणाऱ्या गुलामांना गुप्तपणें शक्य ती मदत करीत.

सिन्नसिन्नाटी गांवाचे पलीकडील ओहिओ नदी ओलांडली कीं गुलामगिरी रूढ असलेल्या केंटुकी संस्थानची हद्द लागे. केंटुकींतून व त्याखालील दाक्षिणात्य संस्थानांतून पळून येणाऱ्या गुलामांकडून मिसेस हॅरीअट स्टोना त्यांच्या दुःखमय जीवनाची हकीगत कळे. यामुळें साहजिकच त्यांचें लक्ष गुलामगिरीचे प्रश्नाकडे लागलें. दक्षिणेकडील संस्थानांतून प्रसंगवशात् त्यांनीं थोडा फार प्रवास केला होता त्यावेळींहि गुलामांची दुःस्थिति त्यांचे नजरेस आली होती. या दुर्दैवी लोकांबद्दल त्यांना फार हळहळ वाटे. व त्यांना दुःखमुक्त करण्यासाठीं आपणांकडून शक्य ती खटपट करण्याचें त्यांनीं ठरविलें. इ. स. १८५० सालीं संयुक्त संस्थानांची राजधानी जें वाशिंग्टन शहर

तेथील वरिष्ठ कायदेमंडळानें एक कायदा पास करून दक्षिणेकडून पळून येणाऱ्या गुलामांना कोणीही थारा देऊं नये; उलट त्यांना पकडून देण्याचे कामीं त्यांचे मालकांना शक्य तें साह्य करावें असें जाहीर केलें. तेव्हां गुलामांच्या हालअपेष्टांचें करुण चित्र आपल्या देशबांधवांपुढें मांडण्याचे उद्देशानें स्टोबाईनीं वाशिंगटन येथील 'नॅशनल इरा' या गुलामगिरीविरोधी वर्तमानपत्रांतून क्रमशः प्रसिद्ध होण्यासाठीं 'अंकल टॉम्स केबीन किंवा गुलामगिरींतील जीवन' ही हृदयस्पर्शी कादंबरी लिहिली. १८५२ सालीं ही कादंबरी पुस्तकरूपानें प्रसिद्ध होऊन तिनें अमेरिकन समाजांत विलक्षण खळबळ उडवून दिली. पुढें १८६० सालीं संयुक्त संस्थानांपैकीं उत्तरेकडील दक्षिणेकडील संस्थानांमध्यें गुलामगिरी नष्ट करण्याचे बाबतींत यादवी माजून जें युद्ध झालें त्याचे कारणापैकीं या कादंबरीचें प्रकाशन हें एक कारण आहे. या कादंबरींत वर्णिलेले प्रसंग प्रत्यक्ष घडले आहेत. काय तें कळविण्याबद्दल स्टो बाईना पुष्कळांनीं विचारणा केल्यावरून आपले म्हणण्याचे समर्थनार्थ कागदोपत्रीं पुरावा प्रसिद्ध करून कादंबरींत वर्णन केलेले प्रसंग नित्य घडत असल्याचें त्यांनीं जाहीर केलें. ही कादंबरी अत्यंत लोकप्रिय होऊन जगांतील निरनिराळ्या सुमारें २३ भाषांत तिचें भाषांतर झालेलें आहे.

इ. स. १८५२ सालीं प्रो. स्टो यांची बदली मेसाच्युसेट्स संस्थानांतील ॲन्डोव्हर गांवीं झाली यामुळें स्टोबाई तेथें राहावयास गेल्या. प्रो. स्टोनीं इ. स. १८५३ पर्यंत तेथें काम केलें. इ. स. १८५३ मध्यें स्टोबाईनीं युरोपखंडात प्रवास करून तेथील इंग्रज व अमेरिकन स्त्रियांमध्यें गुलामगिरीविरुद्ध जागृति उत्पन्न केली. १८५६मध्यें 'ड्रेड' किंवा 'भयाण दलदल' हें पुस्तक त्यांनीं लिहिलें. त्यांत गुलामगिरी रूढ असलेला समाज कसा पतित झालेला असतो याचें चित्र वर्णिलें आहे. यानंतर कांहीं वर्षें त्यांनीं वर्तमानपत्रांतून व मासिकांतून अनेक लेख लिहिले व दोन तीन कादंबऱ्याहि प्रसिद्ध केल्या. त्यांपैकीं मिनिस्टर्स वूइंग (इ. स. १८५९) ही फार प्रसिद्ध आहे.

इ. स. १८६० सालीं गुलामांना स्वातंत्र्य देण्याचे बाबतींत उत्तरेकडील व दक्षिणेकडील संस्थानें यांच्यांत युद्ध सुरू झालें. तें चार पांच

वर्षें चालून त्यांत उत्तरेकडील संस्थानांचा जय झाला व संयुक्त संस्थानांतून गुलामगिरीचें उच्चाटन झालें. सुमारें ३०।४० लाख लोकांना स्वतंत्रता मिळाली. या युद्धांत स्टोबाईचा मुलगा कॅप्टन फ्रेडरीक बीचर स्टो हा जखमी झाल्यामुळें त्याची प्रकृति लौकर सुधारावी म्हणून त्या फ्लॉरिडामध्यें राहावयास गेल्या. तेथें त्या बरींच वर्षें होत्या. इ. स. १८८६ मध्यें त्यांचे पती प्रो. स्टो वारले. त्यानंतर त्या परत हार्टफोर्ड गांवीं राहावयास आल्या. यानंतरचीं दहा वर्षें त्यांचीं जवळ जवळ एकांतवासांतच गेलीं. ता. १ जुलै १८९६ रोजीं या थोर लेखिकेचा अंत झाला.

---

# अनुक्रमणिका.



# टॉम-काका

## अथवा

## गुलामगिरींतील जीवन !

## प्रकरण पहिलें

### छोटा हॅरी

आमच्या गोष्टीस सुरवात अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांपैकीं **केंटुकी** संस्थानांतील एका गांवीं होते. त्यावेळीं संयुक्त संस्थानांत गुलामगिरी रूढ होती. **केंटुकी** संस्थानांत गुलामांना वागवण्याची पद्धत जरी थोडी सौम्य होती तरी एकंदरींत गुलामांचें जीवित अत्यंत कष्टप्रद होतें. या गुलामांत बहुतेक निग्रो बायका व गोरे वसाहतवाले पुरुष यांच्या मुलांचा भरणा असे. कायद्यानें या चालत्या-बोलत्या मनुष्यप्राण्यांना ' देवघेवीच्या वस्तु ' ठरवून अरेराव मालकांचे ताब्यांत दिलें होतें. या मालकांना कोणी विचारणारा नसल्यामुळें त्यांच्या सुष्टदुष्टपणास व लहरी स्वभावास बिचाऱ्या दुर्दैवी गुलामांना निमूटपणें मान वांकवावी लागे. गुलामांतील स्त्रीपुरुषांचीं आपापसांत लग्नें होत, पण त्यांचें बायकांमुलांवर त्यांचे धन्याचीच सत्ता असे ! थोडक्यांत सांगायचें म्हणजे जनावरांच्या व या गुलामांच्या आयुष्यांत फारसा फरक नव्हता.

फेब्रुवारी महिन्यांतील एका दिवशीं हवेंत गारठा फार होता. तिसरे प्रहरीं एका सुशोभित दिवाणखान्यांत दोन गृहस्थ बोलत बसले होते.

त्यांच्या भाषणावरून ते एखाद्या महत्त्वाच्या गोष्टीची वाटाघाट करीत असल्याचें दिसत होतें.

त्यांपैकीं एकाचें नांव **शेल्बी** असून त्यांचा तेथें थोडा जमीनजुमला होता. दुसरा गृहस्थ **हेले**—हा गुलामांचा मोठा व्यापारी होता. **शेल्बी** हे उदार, सुस्वभावी व दयाळू असून आपल्या गुलामांना चांगल्या प्रकारें वागवीत पण ते हाताचे सढळ असल्यामुळें त्यांना फार कर्ज झालें होतें. त्यांनीं लिहून दिलेले बऱ्याच किंमतीचे कर्जरोखे **हेले** याचे ताब्यांत असून कर्जफेडीची व्यवस्था लवकर करण्याबद्दल त्याचा शेल्बींना तगादा लागलेला होता व त्याबद्दल बोलणें करण्याकरितांच तो आज शेल्बींचेकडे आलेला होता. **हेले** हा एक हलक्या वृत्तीचा मनुष्य असून आपण ज्या भावनेनें गुरांढोरांकडे पाहतों त्याच भावनेनें तो गुलामांकडे पहात असे. शेल्बींना कर्जफेडीची दुसरी कांहीं व्यवस्था करतां येणें शक्य नव्हतें म्हणून निरुपायानें आपल्या गुलामांपैकीं **टॉम** या गुलामाला ते विकायला तयार झाले होते.

‘ मि. **हेले**, या बाबतींत अशीच व्यवस्था करावी असें मला वाटतें.

‘ पण मि. **शेल्बी**, मला असा व्यवहार करतां येत नाहीं त्याला माझा नाइलाज आहे. ’

‘ कां बरें ? तसें पाहिलें तर आमचा टॉम हा सामान्य माणूस नाहीं. कुठेंहि त्याची इतकी किंमत येईल. तो साळसूद व विश्वासू असून नियमितपणें काम करण्याची त्याला संवय आहे.’

‘ कोणाही निग्रोइतकाच तो विश्वासू असेल. ’

‘ तसें नव्हे. खरोखरच टॉम हुषार व सच्छील आहे. त्याचे विश्वासूपणाबद्दल माझी खात्री आहे. माझी प्रत्येक वस्तु—पैसे, घर, घोडे त्याच्या ताब्यांत असतात. त्याला कोठेंहि जाण्याची मीं मोकळीक ठेवली आहे, तरी मला केव्हांहि त्याचा अप्रामाणिकपणा

दिसून आला नाहीं.तो नेहमीं सचोटीनें वागतो व त्याच्यावर कोणतेंहि काम सोंपवा तो तें मन:पूर्वक करतो.'

'निग्रो आणि सच्छील! हें कांहीं खरें वाटत नाहीं. पण मला एका निग्रो गुलामाचा जो अनुभव आला आहे त्यावरून माझा यावर थोडा विश्वास बसत आहे.

'टॉम हा माझ्या मताप्रमाणें अगदीं 'चोख माल' आहे याबद्दल शंकाच नको. नुकतेंच मीं त्याला सिनसिनाटी गांवाला माझ्या वतीनें काम करून पांचशें डॉलर्स आणण्यासाठीं एकटें पाठविलें होतें. त्याला कांहीं हलक्या लोकांनीं ते पैसे घेऊन पळून जाण्याचा सल्ला दिला, तेव्हा तो म्हणाला, 'मला धन्याचा विश्वासघात करतां येत नाहीं.' त्याला विकतांना मला अतिशय वाईट वाटतें. त्याच्या किंमतींत तुम्हीं माझ्या कर्जाची फेड करून घ्यावी. थोडा विचार कराल तर असें करायला कांहीं हरकत नाहीं.'

'व्यापारी मनुष्याला जितका विचार करतां येतो तितकी—किंबहुना त्यापेक्षां थोडा अधिकच, मी विचारी आहें हें आपण जाणतांच. मित्रांसाठीं मी कांहींहि करूं शकेन; पण आपण सांगतां ही गोष्ट अंमळ कठीणच आहे!'

'बरें तर, मग तुमचें काय म्हणणें?'

'टॉमबरोबर एखादा मुलगा अगर मुलगी आपण द्याल तर बरें पडेल.'

'छे! देण्यासारखा एकही फालतू मुलगा किंवा मुलगी माझ्या जवळ नाहीं. खरें बोलायचें म्हणजे निव्वळ प्रसंगामुळें माझा नाइलाज झाला आहे; नाहीं तर माझ्या गुलामांपैकीं कोणालाच विकण्याची मला इच्छा नव्हती!'

त्यांचें अशा प्रकारें संभाषण चाललें असतां दिवाणखान्याचा दर-

वाजा उघडून एक चार पांच वर्षांचा काळसर मुलगा आंत आला. त्याच्यांत एक प्रकारचा विशेष मोहकपणा होता. त्याचे केंस कुरळे व रेशमाप्रमाणें तुकतुकीत असून त्यांचें झुबके त्याच्या गोंडस चेहऱ्या-भोंवतीं पसरले होते. त्याचे टपोरे, काळेभोर व पाणीदार डोळे, ते चौकसपणानें इकडे तिकडे पहात असल्यामुळें, फारच तेजस्वी दिसत होते. हा मुलगा शेल्बींचे एका गुलामाचा असून त्याचेवर त्यांचा फार लोभ होता.

'ओहो! **जिम* क्रो** कां? हे घे तुला, त्यांच्यांकडे द्राक्षाचा एक लंहानसा घड टाकीत शेल्बी म्हणाले.

तो घड घेण्यासाठीं मुलगा दुडुदुडु धांवत जात असतां शेल्बी कौतुकानें हंसत होते.

'बरें जिम क्रो! आतां इकडे ये पाहूं!'

मुलगा जवळ येतांच त्याची प्रेमानें पाठ थोपटली. शेल्बी म्हणाले, 'जिम, आपल्या या पाहुण्यांना थोडें गाऊन व नाचून दाखव पाहूं?'

मुलानें लगेच आपल्या गोड गळ्यानें निग्रो लोकांतील एक प्रसिद्ध गाणें साभिनय म्हणून दाखविलें.

'भले बहाद्दर!' त्याला मोसंब्याचा एक तुकडा देत **हेले** म्हणाला.

यानंतर शेल्बींनीं त्याला आणखी एक दोन नकला करायला सांगितल्या व त्यानें त्या फारच छानदार रीतीनें केल्या. **शेल्बी** व **हेले** यांना हंसतां हंसतां पुरेवाट झाली.

'किती गोड छोकरा आहे! आपल्याला द्या बुवा हा! बस्स, ठरला सौदा!' हेले शेल्बींचे पाठीवर थाप मारीत म्हणाला.

---

*मुलाचें लाडकें नांव.

याच वेळीं दरवाजा हलकेंच उघडून सुमारें पंचवीस वर्षांची एक काळसर स्त्री तेथें आली. ही त्या मुलाची आई होती. त्याच्याप्रमाणेंच तिचे डोळे टपोरे, काळे भोर व पाणीदार असून केंस तुकतुकीत होते. तिचा पोषाख नीटनेटका असून ती बांधेसूद होती.

तिला पाहतांच शेल्बींनीं विचारलें, 'एलिझा, तुला काय पाहिजे ?'

'मी हॅरीला पहात होतें !' ती स्त्री उत्तरली. मुलगा तत्काळ उड्या मारीतच तिजकडे धांवला.

'ठीक आहे, जा त्याला घेऊन !'

मुलाला कडेवर घेऊन एलिझा तेथून निघून गेली.

एलिझाचा मोहकपणा हेलेसारख्या काकदृष्टि व्यापाऱ्याचे नजरेंतून सुटणें शक्यच नव्हतें. ती जातांच तो शेल्बींना म्हणतो, 'हाही चोख माल' आहे. ह्या मुलीवर आपण चांगलेच गबर व्हाल ! इतकी सुरेख मुलगी मीं नव्हती पाहिली. हिला आपण काय किंमतीला देणार ?'

'मला ती विकतां येत नाहीं. तिच्या भारंभार सोनें दिलें तरी माझी पत्नी तिला विकूं देणार नाहीं' शेल्बी तुटकपणानें बोलले.

'असल्या बाबतींत बायकांना काय कळतें ? त्या कांहीं तरी बोलतात झालें !'

'हेले ! हा विषय आतां इतकाच पुरे. कांहीं झालें तरी मला तिला विकायचें नाहीं' शेल्बी निश्चयपूर्वक म्हणाले.

'बरें बुवा, राहिलें ! निदान त्या छोकऱ्याला तरी द्यायला हरकत नाहीं ? आपल्याला तर तो हवाच !'

'त्याचा तुम्हांला काय उपयोग ?'

'आहे, उपयोग आहे. माझा एक स्नेही गोजिरवाणीं मुलें गोळा करून त्यांचा व्यापार करतो व त्याला किफायतही पुष्कळ होते.

'पण मला त्याला विकावेसें वाटत नाहीं. मी थोडा मवाळ वृत्तीचा मनुष्य आहें. आईपासून तिचें लेंकरूं हिरावून घेणें मला कसेंसेंच वाटतें!'

'खरें आहे! मलाहि तसें करणें इष्ट वाटत नाहीं. पण तिच्या न कळत मुलाला नेलें म्हणजे झालें! कांहीं कामानिमित्त तिला आपण बाहेर पाठवा, ती परत यायच्या आंत मुलाला गुपचुपपणें नेण्याची आपण तजवीज करूं. आपल्या पत्नीनें तिला थोडे दागिने, कपडे वगैरे दिले कीं तिचा राग गेलाच म्हणून समजा! कां आहे कीं नाहीं युक्ति?'

यानंतर हेलेनें निरनिराळ्या प्रकारें आपल्या म्हणण्याचें समर्थन करून आपल्या दयाळूपणाचें प्रदर्शन केलें; पण मुलाचे बाबतींतील आपला आग्रह सोडला नाहीं.

शेल्बींनीं आपले पत्नीचा विचार घेऊन संध्याकाळीं काय तें नक्की कळवितों असें सांगून त्याची रवानगी केली. तो जातांच ते स्वतःशीं म्हणाले, 'लाथ मारून घालवून देण्याच्या लायकीचा हा मनुष्य आहे! पण काय करणार? तो माझा धनको पडला! टॉमला असल्या टोणग्याला विकण्याची माझ्यावर पाळी यावी ना? त्याला व एलिझाच्या मुलालाही विकण्याशिवाय मला गत्यंतर नाहीं! आतां या बाबतींत माझ्या पत्नीची कशी समजूत करावी हीच पंचाईत आहे. अरेरे! मी कर्जबाजारी नसतों तर—?'

× × × ×

शेल्बी व हेले यांच्या या भाषणांतील कांहीं भाग एलिझाला ऐकूं आला होता व त्यावरून आपल्या धन्याशीं बोलणारा इसम गुलामांचा व्यापारी असून तो कोणाबद्दल तरी सौदा करण्याकरितां आला आहे हें तिला कळून चुकलें होतें.

यामुळें जिज्ञासेनें त्यांचें आणखी कांहीं भाषण ऐकावयास मिळालें तर पहावें म्हणून जातांना ती दरवाज्याजवळ थोडा वेळ थांबणार होती; पण तितक्यांत तिच्या मालकिणीनें तिला बोलावल्यामुळें तिला घाईघाईनें जावें लागलें. तथापि तो व्यापारी आपले मुलाबद्दलच सौदा ठरवीत असावा असा तिला संशय आला. ह्या नुसत्या कल्पनेनेंच तिची छाती धडधडूं लागली व तिनें आपले मुलाला इतकें घट्ट आंवळून धरलें कीं त्याला आश्चर्य वाटून तो तिचेकडे पाहूं लागला.

वरील विचारांमुळें एलिझाचे वृत्तांत साहजिकच गोंधळ उडून तिचे कामांत चुका होऊं लागल्या. तेव्हां तिची मालकीण म्हणाली, 'पोरी ! आज तुला काय झालें आहे ? असें कां करतेस ?'

एलिझाचे डोळे पाण्यानें भरून आले. ती स्फुंदत म्हणाली, 'बाईसाहेब ! दिवाणखान्यांत तो मेला गुलामांचा व्यापारी धनीसाहेबांशीं सौदा ठरवतो आहे !'

'असेल ! मग ?'

'धनीसाहेब माझ्या लाडक्या जिमला विकतील कां हो ?' बोलतां बोलतां तिची छाती भरून आली व ती ओक्साबोक्शीं रडूं लागली.

'मूर्ख कुठली ! तुझा धनी असल्या व्यापाऱ्यांशीं कधींच व्यवहार करीत नाहीं. आणखी आमचे गुलाम चांगल्या तऱ्हेनें वागत असतां आम्ही त्यांना काय म्हणून विकूं ? बाकी तुझ्या या पोराला कोण विकत घ्यायला बसला आहे म्हणा ! तुला एक तो आपला परब्रह्म वाटतो ! ऊठ, पूस डोळे, असें काय खुळ्यासारखें करावें तें ! परवां घातलीस तशी माझी छानदार वेणी घाल पाहूं ? आणि असें दारांतून कांहींच्या बाहीं ऐकून तें मनाला लावून घेत जाऊं नको !'

'पण बाईसाहेब ! आपण नाहीं ना त्याला विकूं देणार ?'

'पुन्हां तेंच! मी त्याला विकूं देत नाहीं. आतां तरी झालें! बाकी अलीकडे तूं त्या पोराचें भारीच स्तोम माजविलें आहेस! कोणी परका मनुष्य घरांत यायची फुरसत, तुला वाटतें, तो आपल्या मुलाला विकत घ्यायलाच आला!'

अशा प्रकारें आपल्या मालकिणीचें आश्वासन मिळाल्यावर एलिझा निमूटपणें कामास लागली. आपल्या हळव्या मनाबद्दल तिला हसूं आलें.

मिसेस शेल्बी ह्या बुद्धिमान् व सुशील असून उच्च नैतिक व धार्मिक तत्त्वें प्रत्यक्ष कृतीमध्यें आणणें त्यांना फार आवडे. त्यांच्या पतींना त्यांच्याबद्दल आदर वाटे व त्यांचा त्यांचेवर एक प्रकारचा वचकही होता. आपला पती कोणत्या परिस्थितींत सांपडला आहे याची जाणीव नसल्यामुळें त्याच्या सौजन्यावर विश्वासून तिनें वर सांगितल्याप्रमाणें एलिझाला आश्वासन दिलें होतें.

---

## प्रकरण दुसरें

### पति-पत्नी

एलिझा रूपानें देखणी होती तशीच मनानें कोमल व सदाचरणीही होती. लहानपणापासून तिला मिसेस शेल्बींनीं वाढविलें असून तिच्यावर त्यांचें मुलीप्रमाणें प्रेम होतें. ती उपवर होतांच जॉर्ज हॅरीस नांवाच्या सुंदर, हुषार व तेजस्वी म्युलॅटो गुलामाबरोबर मिसेस शेल्बींनीं तिचें मोठ्या थाटानें लग्न लावून दिलें होतें.

जॉर्ज हॅरीस पोतीं तयार करण्याच्या जवळच्या कारखान्यांत कामास होता. कारखानदारानें त्याला त्याच्या धन्याणसून भाड्यानें काम

करण्याकरितां आणिलें होतें. तो बुद्धिमान् व सुस्वभावी असल्यामुळें कारखान्यांतील सर्व लोकांवर त्याची छाप बसली होती. ताग स्वच्छ करण्याचें एक यंत्र त्यानें तयार केलें असल्यामुळें त्याच्या गुणांची जिकडे तिकडे तारीफ होत असे.

पण त्याच्या क्षुद्र वृत्तीच्या जुलमी धन्याला हें कसें खपणार ? गुलामानें अशा प्रकारें यंत्र तयार करून मोठ्या लोकांत मान्यतेस चढावें म्हणजे काय ? महत्पाप ! ! कारखानदाराचे रदबदलीस न जुमानतां त्यानें जॉर्जला घरीं आणून अगदीं हलक्या प्रतीच्या कामास लावलें. नित्य कठोर वाग्बाणांचा त्याला खुराक मिळे; तथापि त्याचा तेजोभंग झाला नाहीं !

कारखान्यांत कामास असतां जॉर्जचे दिवस मजेंत जात. त्याला कोठेंहि जाण्यायेण्यास प्रतिबंध नव्हता. तो वरचेवर एलिझाला भेटावयास येई व याप्रमाणें हें प्रेमळ दांपत्य मोठ्या सुखांत होतें. नाहीं म्हणावयास छोट्या हॅरीचे पूर्वींचीं दोन छकुलीं गेलीं होतीं एवढेंच काय तें दुःख तिला होतें.

एके दिवशीं मिसेस शेल्बी आपल्या मैत्रिणीकडे बसावयास जाण्याकरितां गाडींतून निघाल्या होत्या. एलिझा खिन्नपणें त्यांच्या गाडीकडे पहात आंगणांत उभी होती. इतक्यांत पाठीमागून कोणींसा तिचे खांद्यावर हात ठेवला. तिनें मागें वळून पाहिलें, त्याबरोबर तिला आनंद झाला व ती म्हणाली, 'कोण जॉर्ज ! किती मी भ्यालें पण ? बरें झालें बाई आपण आलांत ! बाईसाहेब आतांच बाहेर गेल्या आहेत. माझ्या खोलींत आपण मनमुराद बोलत बसूं.'

तो तिच्या खोलींत येतांच त्याचे उदास चेहेऱ्याकडे पाहून ती म्हणाली, 'आज आपण असे खिन्न कां ? हॅरीकडे पाहिलें कां ? गुलाम किती खोडकर झाला आहे !'

छोटा हॅरी लाडानें बापाकडे पहात आईला बिलगून उभा होता. एलिझानें त्याच्या केसांवरून हात फिरवून प्रेमानें त्याचें चुंबन घेतलें.

'हा जन्मलाच नसता तर बरें झालें असतें. तोच कशाला, मीच जर जन्माला आलों नसतों तर किती छान झालें असतें !' जॉर्ज दुःखानें म्हणाला.

त्याच्या या भाषणानें एलिझाला अतिशय आश्चर्य व भीति वाटली; त्याचे खांद्यावर डोकें ठेवून ती रडूं लागली.

तिच्याकडे प्रेमपूर्वक पहात जॉर्ज म्हणाला, 'एलिझा ! तुझी मी समजूत तरी कशी करूं ? अरेरे ! माझ्याशीं तुझें लग्न झालें नसतें तर आज तूं सुखांत असतीस !'

'**जॉर्ज ! जॉर्ज** ! असें बोलण्यासारखें आज झालें तरी काय ? आतांपर्यंत तर आपण सुखी आहोंत ?'

'पण आतां नरकयातना भोगण्याचें माझ्या नशीबीं आलें आहे ना ? आपल्या महत्त्वाकांक्षेचा काय उपयोग ? जिवंत राहून तरी काय करायचें आहे ! मला वाटतें मी मेलों असतों तर बरें झालें असतं !'

'जॉर्ज ! असें अभद्र नका बोलूं ! आपला धनी जुलमी आहे हें मला माहीत आहे; पण कांहीं झालें तरी तो आपला धनी आहे ना ?'

'माझा धनी ? कोणीं त्याला माझा धनी केलें ? माझा त्याचा काय संबंध ? त्याच्यासारखाच मी मनुष्य आहें—किंबहुना सर्वच बाबतींत त्याच्यापेक्षां जास्त लायकीचा आहें. माझा मानभंग करण्यासाठीं मुद्दाम अति कठीण, हलक्या प्रतीचें आणि घाणेरडें काम मला तो करायला लावतो आहे ! असें करण्याचा त्याला काय अधिकार ?'

'जॉर्ज ! आज आपली मला भारी भीति वाटते बाई ! आपल्या

---

* पतीला नांवानें हांक मारण्याची चाल पाश्चिमात्य देशांत आहे.

ातून कांहीं बरें वाईट न होवो म्हणजे झालें ! आपल्या स्थितीची मला जाणीव कां नाहीं ? पण माझ्यासाठीं, निदान आपल्या लाडक्या हॅरीसाठीं, थोडा शांतपणा नको कां धरायला ?'

'मीं आतांपर्यंत पुष्कळ सोसलें; पण सहनशक्तीला तरी कांहीं सीमा आहेच कीं नाहीं ? माझा त्यानें अगदीं छळवादच मांडला आहे ! कालचीच गोष्ट पहा, मीं गाडींत दगड भरीत होतों. आमचा छोटा धनी टॉम गाडीच्या घोड्याजवळ हातांतील चाबूक वाजवीत उभा होता. त्या आवाजानें जनावर बुजूं लागलें म्हणून तसें न करण्याबद्दल मीं त्याला विनवून सांगितलें. तें ऐकायचें बाजूलाच राहिलें, उलट तो मलाच चाबकानें मारूं लागला. मीं नुसता त्याचा हात धरला; त्याबरोबर मला लाथा मारीत आरडत ओरडत तो आपले बापाकडे गेला व मी त्याच्याशीं मस्ती करीत असल्याचें त्यानें त्याला सांगितलें. मग काय विचारतां ? आमचे मालक सापासारखे फणफणत धांवतच तेथें आले. माझ्याकडे पहात तो म्हणाला, 'थांब ! तुला धन्याचा इंगा दाखवतों ' असें म्हणून त्यानें मला एका झाडाला बांधून घातलें व त्या झाडाच्या फोकांनीं मरेपर्यंत मला मारण्याबद्दल आपल्या मुलास सांगितलें व त्याप्रमाणें त्या मुलानें केलें !'

हें बोलत असतां जॉर्जच्या भिंवया चढल्या व डोळे लालबुंद झाले. क्रोधकंपित स्वरानें तो म्हणाला, 'या अरेरावाला माझा धनी कोणीं केला हेंच मला पाहायचें आहे !'

त्याची ही स्थिति पाहून एलिझा घाबरून गेली. दुःखपूर्ण स्वरानें ती म्हणाली, 'आपल्या मालकाच्या व मालकिणीच्या मनाप्रमाणें वागणें चांगलें असें आपलें मला वाटत होतें !'

'तुला तसें वाटणें साहजिक आहे. कारण तुझे मालक सज्जन असून त्यांनीं तुला लहानपणापासून चांगल्या तऱ्हेनें वागविलें आहे,

पण माझी स्थिति तशी नाहीं. कितीहि भलेपणानें वागलों तरी लाथा-बुक्क्या व अपशब्दच माझ्या वांट्याला येतात ! हें मीं कशासाठीं सोसायचें ? मी त्याचा काडीचा मिंधा नाहीं. माझ्या किंमतीच्या शेंकडों पट किंमतीचें काम मी आजपर्यंत केलें आहे. छे ! मला आतां हें मुळींच सहन होत नाहीं !'

यानंतर तिनें दिलेल्या कुत्र्याला आपल्या मालकानें कसें विनाकारण निर्दयपणें ठार केलें याची हकीकत जॉर्जनें एलिझाला सांगितली. ती ऐकून तिचे अंगावर कांटा उभा राहिला ! नवऱ्याकडे भीतियुक्त मुद्रेनें पहात ती म्हणाली, ' मग आपण आतां काय करायचें मनांत आणलें आहे ? कांहीं भलतेंसलतें करायची बुद्धि देव आपणांला न देवो !'

' माझ्या धन्याच्या नीचपणाची कहाणी अजून संपली नाहीं ! माझ्या लग्नाला परवानगी दिल्याबद्दल त्याला वाईट वाटत आहे ! शेल्बींचा तो हेवा करतो व तुझ्या सहवासानें मी बिघडलों अशी त्याची समजूत झाली असल्यामुळें तो मला आतां इकडे फिरकूं देणार नाहीं. काल त्यानें मला हें स्पष्टच सांगितलें. माझें पुनः लग्न करून देण्याचा त्याचा विचार असून त्या बायकोबरोबर मी निमूटपणें तेथेंच झोपडी बांधून राहिलों तर ठीक, नाहीं तर कोठें तरी लांब नेऊन तो मला विकून टाकणार आहे !'

' पण आपलें लग्न एकदां माझ्याबरोबर झालें आहे ना ?'

' होय, पण तुला ठाऊक नाहीं ! गुलामाला कायद्यानें लग्न करण्याचा अधिकार नाहीं ! त्यानें मनांत आणलें तर आपली तो सहज ताटातूट करूं शकेल ! यामुळेंच तर मला जीव अगदीं नकोसा झाला आहे. म्हणून आतां या नरकपुरींत खितपत न पडतां, काय वाटेल तें

ावो, *कानडाला पळून जाण्याचा बेत नक्की करून तुला हें कळवेण्यासाठीं मी आलों आहें. तेथें गेल्यावर मी तुझ्या व हॅरीच्या सुटकेची व्यवस्था करीन. तोंपर्यंत तूं धीर सोडूं नको.'

'पण न जाणो, वाटेंत आपणांस पकडलें तर?'

'त्याची काळजी नको! मी जिवावर उदार झालेलोंच आहें. जेवंतपणीं मी कांहीं त्याचे हातीं लागत नाहीं!'

यानंतर एलिझाचे हात आपले हातीं धरून जॉर्ज तिचेकडे नेश्चलपणें पहात उभा राहिला. दोघांचेही तोंडून शब्द निघेना. पुनः उभयतांचे भेटीची आशा वाटत नसल्यामुळें वियोग होतांना त्या प्रेमळ जीवांना किती दुःख झालें असेल व तीं किती रडलीं कढलीं असतील याची कल्पनाच करणें बरें!

---

## प्रकरण ३ रे

### टॉम काकाचे झोपडींत

कर्जफेडीसाठीं निरुपायानें आपला निग्रो गुलाम **टॉम** याला विकायला शेल्बी तयार झाले हें आपणांस पहिल्या प्रकरणांत कळलेंच आहे. पुष्कळ वर्षें **टॉम** शेल्बींचे कडे गुलाम होता. त्याच्या बायकोचें नांव **क्लो**. हीं उभयतां उतार वयाचीं व मनमिळाऊ स्वभावाचीं असल्यामुळें त्यांना बहुतेक मंडळी **टॉम काका** व **क्लो काकू** म्हणत.

शेल्बींचे घरालगतच **टॉम काकाची** लहानशी झोपडी होती. समोर छोटासा बगीचा असून त्यांत अनेक जातींचीं फुलझाडें, फळ

---

*ब्रिटिश कानडा देशांत गुलामगिरीची पद्धत नव्हती.

झाडें व भाजीपाला लावलेला होता. या बगीचाची निगा चांगली राखली असल्यानें उन्हाळ्यांत त्यांतील झाडांना पुष्कळ फुलें-फळें येत.

वाचक, चला आपण थोडा वेळ टॉम काकाचे झोपडींत जाऊं. संध्याकाळचें खाणेंपिणें आटोपलें असल्यामुळें टॉमचीं दोन लहान मुलें आपल्या चिमुकल्या भावंडाला एका कोपऱ्यांत पांगुळगाडयावर चालायला शिकवीत आहेत. ती पहा 'गृहदेवता' क्लो काकू चुली-जवळ घरधन्यासाठीं सैंपाक करीत आहे. तिचा चेहरा बघितलांत कां कसा. गोल, व तजेलदार असून त्यावर शांतपणाची व समाधानाची छटा चमकत आहे! क्लो काकू सुग्रणपणाबद्दल प्रसिद्ध होती व त्याबद्दल तिला एक प्रकारचा अभिमान वाटे.

चुलीजवळ एक लहानसें डळमळींत पायांचें टेबल असून त्यावर भोजनासाठीं सुंदर कपबशा व इतर भांडींकुंडीं मांडून ठेवलीं आहेत. या टेबलाजवळच आमचा कथानायक **टॉम काका** बसला आहे. तो मजबूत बांध्याचा, वर्णानें काळा, चेहऱ्यावरून स्वाभिमानी पण साधाभोळा दिसत आहे.

टॉम लिहावयास शिकत असल्यामुळें एका स्लेटपाटीवर अक्षरें गिरवीत असून सुमारें तेराचौदा वर्षांचा एक तरतरीत मुलगा त्याच्या शिक्षकाचें काम करीत आहे. हा मुलगा म्हणजे टॉमचा 'छोटा साहेब' जॉर्ज शेल्बी होय.

टॉमनें 'G' (जी) चा फांटा उलटा काढलेला पाहून जॉर्ज म्हणतो, 'टॉम काका! अहो आतां हा Q (क्यू) झाला ना?' असें म्हणून त्यानें टॉमला पुनः G (जी) काढून दाखविली. टॉमला आपल्या बालशिक्षकाचें कौतुक वाटून तो त्याप्रमाणें G (जी) गिरवूं लागला.

'बघितलेंत गोऱ्या लोकांचीं मुलें सुद्धां कशीं हुषार असतात तीं. त्यांतून आमचे छोटे साहेब इतक्या लहान वयांत किती तरी छानदार लिहितात अन् वाचतात! स्वभाव पण किती साधा! रोज संध्याकाळीं इथं येऊन आम्हांला सुरेख पुस्तक वाचून दाखवाव-याची त्यांना काय गरज आहे?' क्लो काकू जॉर्ज शेल्बीकडे स्वाभि-मानपूर्वक पहात म्हणाली.

'पण क्लो काकू! तुमच्या या गोड शब्दांनीं कांहीं आपलें पोट भरत नाहीं बुवा! मला कोण भूक लागली आहे! अजून स्वयंपाक नाहीं कां तयार झाला?' जॉर्ज उद्गारला.

'झालाच हं! छोटे साहेब, आतां तीं पुस्तकें अंमळ मिटून बाजूला ठेवा व कारभाऱ्यांच्याजवळ बसा. आपल्या पानांत पहिल्यांदा गरमागरम खुसखुशीत पोळी वाढतें.

जेवण सुरू असतां क्लो काकूच्या पाकनैपुण्यावर व अवांतर कांहीं विषयांवर त्यांचें संभाषण झालें. जॉर्जनें आपल्या विनोदी कोट्यांनीं क्लो काकूला हंसतां हंसतां बेजार केलें.

याप्रमाणें हास्यविनोदांत जेवण होऊन मंडळी जरा बाहेरचे अंगास आली तों तेथें निरनिराळ्या वर्णांचे लहान मोठे कांहीं स्त्रीपुरुष जमा झाले होते. शेल्बी कुटुंबाचे चांगुलपणामुळें त्यांच्या गुलामांना बरेंच स्वातंत्र्य होतें, यामुळें जमलेल्या या मंडळींत थट्टामस्करी व गाणीं-नाचणीं सुरू झालीं.

नंतर जॉर्ज शेल्बीकडे पहात क्लो काकू म्हणाली, 'छोटेसाहेब फारच सुरेख वाचतात बाई! आमच्यासाठीं आतां वाचून दाख-वितां ना?

जॉर्जला आनंद झाला. स्तुति कोणाला आवडत नाहीं? तो जात्याच हुषार असून त्याच्या आईनें त्याला धार्मिक वळण लावलें होतें. त्यानें

नव्या करारांतील 'बायबलच्या कांहीं भाग वाचून दाखविला. त्या वेळीं श्रोत्यांतून मधून मधून 'हें नीट ऐका!' 'यावर विचार करा!' इत्यादि उद्गार निघत होते.

वाचन होतांच श्रोतृवृंदानें जॉर्जची मुक्तकंठानें स्तुति केली.

धार्मिक बाबतींत टॉमला त्याचे सहकाऱ्यांत पूज्य गुरूप्रमाणें मान मिळे. तो बायबलांतील स्तोत्रें प्रेमळपणानें म्हणे व त्या वेळीं त्याचे श्रोते अगदीं तल्लीन होऊन जात.

× × ×

याच वेळीं मि. शेल्बींचे दिवाणखान्यांत निराळाच प्रकार सुरू होता.

शेल्बी व त्यांचे सावकार हेले महाशय हे एका टेबलाजवळ बसले होते. टेबलावर लेखनसाहित्य व कागदपत्र पडले होते.

टॉम व हॅरी यांचे विक्रीचे बाबतींत आपले पत्नीशीं विचार-विनिमय करण्याचा बेत रहित करून हेलेच्या म्हणण्याप्रमाणें त्याला खरेदीखत करून द्यायला शेल्बी तयार झाले होते.

शेल्बींनीं दिलेले दस्तऐवज, पावत्या, वगैरे कागदपत्र हेले तपासून पहात होता.

'ठीक आहे, आतां खरेदीखतावर सह्या झाल्या म्हणजे झालें!' हेले म्हणाला.

शेल्बीनीं आंबट तोंडानें खरेदीखतावर सही करून दिली व हेलेनें त्यांना कर्ज भरपाईची चिठी करून दिली.

'सुटलों बुवा! झाला एकादाचा निकाल!' हेले जाण्याच्या तयारीनें उठत असतां म्हणाला.

‘ होय, बहुतेक कायमचाच निकाल झाला !’ हे शब्द स्वतःशीं पुटपुटत शेल्बींनीं सुस्कारा सोडला. नंतर हेलेकडे वळून ते म्हणतात, ‘ टॉमला दुसऱ्याच्या ताब्यांत देण्यापूर्वीं मला तसें कळविण्याचें तुम्हीं वचन दिलें आहे हें लक्षांत असूं द्या !’

‘आपण स्वतःच तर त्याला आतां दुसऱ्याच्या ताब्यांत देत आहां !’

परिस्थिति ! निवळ परिस्थितीमुळें मला तसें करावें लागत आहे !

‘ ही परिस्थिति माझ्याहि मार्गांत आड येणार नाहीं म्हणून कुणीं सांगावें ? तसें झालेंच तर मी त्याला होतां होईल तों चांगला धनी पाहून देईन. मी स्वतः त्याला कशा रीतीनें वागवीन हें आपणांला सांगायला नकोच. आपण निर्धास्त राहा. परमेश्वरानें मलाहि अन्तः-करण दिलें आहे ?’

हेलेच्या या आश्वासनानें शेल्बींचें समाधान झालें असेल काय ! पण आतां या गोष्टीचा विचार करून काय उपयोग होता ?

---

## प्रकरण ४ थें.

### गुलामगिरीला धिक्कार असो !

त्याच रात्रीं शेल्बी आपले बायकोबरोबर बोलत बसले होते.

“ ऑर्थर ! आपल्याबरोबर जेवायला तें कुठलें ध्यान आणलें होतें ? मिसेस शेल्बींनीं विचारलें.

‘ त्याचं नांव हेले ’

‘ इथें कशाला तो आला होता ?’

‘ कांहीं देण्याघेण्याच्या कामासाठीं मीं त्याला बोलावलें होतें.’

‘ तो गुलामांचा व्यापारी आहे म्हणे !’

‘ तुला कुणीं सांगितलं हें !’

‘ आपली एलिझा नाहीं कां, ती जेवणें झाल्यानंतर घाबऱ्या घाबऱ्या माझ्याकडे आली व आपण एका गुलामाच्या व्यापाऱ्याबरोबर, बोलत बसला असून तो तिच्या मुलाबद्दल सवदा ठरवीत आहे असें मला रडत रडत सांगूं लागली.

‘ ती असें बोलली हं !’

‘ मी तिची समजूत घातली कीं आपल्या गुलामांपैकीं कुणालाही आपण असल्या माणसाला विकणार नाहीं याबद्दल मला खात्री आहे.’

‘ एमिली ! तुझी समजूत रास्त आहे. मी आजपर्यंत असाच वागत आलों, पण आतां आपणांला कांहीं गुलाम विकण्याशिवाय गत्यंतर नाहीं !’

‘ असल्या हलक्या माणसाला ? इश्श ! मला नाहीं हें खरें वाटत!’

‘ नाइलाज आहे ! टॉमला विकण्याचें मीं कबूल केलें खरें !’

‘ काय ! टॉमला ? काय मी ऐकतें हं ? आपल्या बालपणापासून कीं हो त्यानें आपली एकनिष्ठपणें सेवाचाकरी केली ? त्याच्यासारखा विश्वासू माणूस मिळायचा नाहीं. त्याला गुलामगिरींतून मुक्त करण्याचें आपण वचन दिलें होतं व मी त्याबद्दल त्याच्याजवळ कितीतरी वेळां बोललें असेन ! छे ! आतां माझा वाटेल त्या गोष्टीवर विश्वास बसेल ! एलिझाच्या पोरालासुद्धां आपण विकाल !’

‘ तुला कळलेंच आहे, मग मी तरी लपवून कशाला ठेवूं ? टॉम व हॅरी यांना विकायचें मीं कबूल केलें आहे. आपल्या गुलामांना विकणें म्हणजे कांहीं राक्षसी कृत्य करणें नव्हे. या गोष्टी सर्रास सुरूं आहेत ! ’

‘ पण नेमकें यांनांच काय म्हणून विकायचें ? ’

'कारण त्यांची सर्वांत जास्त किंमत आली म्हणून. तो तर तुझ्या एलिझालाच मागत होता !'

'हलकट मेला !'

'पण तुझी तिच्यावर किती माया आहे हें माहीत असल्यामुळें मीं तें साफ नाकारलें ! याबद्दल तूं मला धन्यवाद दिले पाहिजेस.'

'मिसेस शेल्बी थोडा वेळ विचार करून म्हणाल्या, आपण केलेंत तें बरें केलेंत. उतावळेपणानें इकडे लागण्यासारखे मी बोललें याबद्दल मला क्षमा करावी. पण या दुर्दैवी गुलामांबद्दल मला थोडें बोलावसें वाटतें ! टॉम निग्रो असला तरी किती थोर मनाचा आहे ! वेळ पडली तर आपणासाठीं तो प्राणदेखील द्यायला मागेंपुढें पाहायचा नाहीं !'

'होय मला हें सगळें कळतें व तुझ्याप्रमाणें वाईटहि वाटतें ! पण करायचें काय ? तुला सांगायचें माझ्या जीवावर येतें. या दोघांना तरी विकलें पाहिजे किंवा घरदार सर्व विकून कफल्लक बनलें पाहिजे अशी आपली स्थिति झाली आहे ! आपल्या इष्टेटीचें गहाणखत हेलेच्या ताब्यांत असून मीं त्याची ताबडतोब फेड केली नाहीं तर तो हें सर्व आपल्या ताब्यांत घेतल्याशिवाय राहणार नाहीं ! अविचारानें वागून मीं वेळोवेळीं हवेंतसें कर्ज काढलें व कर्जरोखे लिहून दिले त्याचें प्रायश्चित्त भोगण्याची आतां वेळ आली आहे ! हेलेच्या मुठींत मी पुरा सांपडलों असून तो म्हणेल तसें वागणें मला भाग आहे !'

पतीच्या या भाषणानें मिसेस शेल्बींनां धक्का बसल्यासारखें झालें. दोन्ही हातांनीं आपलें तोंड झांकून त्यांनीं एक दुःखपूर्ण श्वास सोडला व त्या म्हणाल्या, 'गुलामगिरीला धिक्कार असो ! गुलामाच्या जन्माला येणें किंवा गुलामाचा मालक असणें यासारखें दुसरें पातक नसेल! गुलामांच्या बाबतींतलें आमच्या देशांतले कायदे चुलींत कां जात नाहींत ?

असल्या जुलमी कायद्यांखालीं गुलामांनां कुठलें सुख लागायला ? लहानपणापासूनच मला हें कळतं होतें, पण म्हटलें आपल्या गुलामांना सौजन्यानें वागवावें, त्यांची काळजी घ्यावी, त्यांनां लिहिणें-टिपणें शिकवावें व अशा रीतीनें त्यांचें जिणें सुखमय करतां आलें तर पहावें—पण माझा तो निव्वळ भ्रम होता ! !

मिसेस शेल्बींचे जवळ एक सोन्याचें घड्याळ होतें. त्याची आठवण होऊन त्या म्हणाल्या, ' मौल्यवान् दागिना असा माझ्याजवळ एकहि नाहीं. हें घड्याळ देऊन हॅरीची सुटका होणार नाहीं कां ? एलिझाच्या मुलासाठीं वाटेल ती माझी वस्तु द्यायला मी तयार आहे !'

' एमिली ! तुझें मन दुखवितांना मलां अतिशय दुःख होतें ! आतां कशाचाच कांहीं उपयोग नाहीं ! खरेदीपत्रावर सही होऊन तें हेले घेऊन देखील गेला ! झालें तें एकापरीं बरेंच झालें नाहींतर त्यानें आपला सत्यानाश केला असतां ! त्याच्या स्वभावाची तुला कल्पना नाहीं ! बरें हें आतां राहूं दे. उद्या सकाळीं तो टॉमला व हॅरीला नेण्यासाठीं इथें येणार आहे. तेव्हां असें करायचें कीं, भल्या पहांटेस मी घोड्यावरून बाहेर फिरायला म्हणून लांब निघून जातों. तूंहि एलिझाला घेऊन दूर कुठे तरी बसायला जा. आपल्या डोळ्यांदेखत या गोष्टी घडायला नकोत ! '

नवऱ्याची ही मसलत मिसेस शेल्बींना आवडली नाहीं. त्या म्हणाल्या, ' असें निष्ठुरपणानें वागणें बरें नाहीं. टॉम व एलिझा यांना वस्तुस्थिति समजूत सांगितली पाहिजे. देवा ! त्यांना सुखी ठेव ! काय आमच्यावर प्रसंग आणलास हा ! '

---

## प्रकरण ५ वें.

### आई !

शेल्बी पति–पत्नींचें भाषण एलिझानें गुप्तपणें लपून ऐकलें. मिसेस शेल्बींच्या आश्वासनानें तिच्या मनाची रुखरुख गेली नव्हती म्हणून तिनें हा मार्ग काढला.

भाषण थांबून सर्वत्र स्तब्धता होतांच ती चुपचुपपणें आपले खोलीकडे परतली. यावेळीं तिच्यांत विलक्षण परिवर्तन (फरक) घडून आलें होतें. चेहऱ्यावरील पूर्वीचें मार्दव नाहींसें होऊन ती निश्चयी व कठोर दिसूं लागली !

तिची खोली नीटनेटकी असून आंतील सामान व्यवस्थित ठेवलें होतें. खोलींत येतांच बिछान्यावर निजलेल्या आपल्या सुकुमार मुलाकडे पहात ती म्हणाली, ' अभाग्या ! त्यांनीं तुला विकलें असलें तरी तुझ्या आईला तुला अंतर देतां नाहीं. कांहीं झालें तरी तुझ्या आईला तुझें रक्षण केलेंच पाहिजे !

या वेळीं तिच्या डोळ्यांतून पाण्याचा टिपूसहि पडला नाहीं. अशा प्रसंगीं अन्तःकरणांतील दुःखावेग अश्रुरूपानें बाहेर न येतां ते आंतल्या आंत कढत राहातात. कागद पेन्सिल घेऊन घाईघाईनें तिनें पुढील ओळी खरडल्या—

' प्रिय बाईसाहेब !

आपलें धनीसाहेबांशीं नुकतेंच झालेलें भाषण मीं आडून ऐकलें याबद्दल मला क्षमा करा. मुलाचा वियोग सहन करणें मला शक्य नसल्यामुळें त्याला घेऊन मी निघून जात आहे. याबद्दल आपण मला दोष देणार नाहीं असें वाटतें. मी कृतघ्न नाहीं. आपल्या भलेपणाबद्दल देव आपलें कल्याण करो ! '

पत्राची घडी करून व त्यावर पत्ता लिहून ठेवून तिनें आपल्या मुलाच्या कपडयांचें लहानसें बोचकें तयार केलें व हातरुमालानें तें आपल्या कमरेस बांधलें. आईची माया किती वेडी असते पहा! अशा गडबडीच्या वेळीं देखील आपल्या मुलाचीं एक दोन खेळणीं त्या बोचक्यांत घालायला ती विसरली नाहीं! नंतर स्वत: पोशाख करून तिनें त्याला हलकेंच जागें केलें व त्याची चिमुकली कोट-टोपी त्याच्या अंगावर चढवली.

या एकंदर प्रकारामुळें गोंधळून जाऊन हॅरी म्हणाला, 'आई! अशा वेळीं आपल्याला कुठें जायचें आहे?'

एलिझानें त्याच्या दृष्टीला दृष्टी लावून अशा कांहीं चमत्कारीक तऱ्हेनें त्याचेकडे पाहिलें कीं तत्काळ आजचा प्रकार कांहीं निराळाच आहे हें त्याच्या लक्षांत आलें! नंतर हलकेंच ती म्हणाली, 'हॅरी, चूप रहा, नाहीं तर त्यांना ऐकायला जाईल! तुला घेऊन जाण्यासाठीं बागुलबुवा येणार आहे! म्हणून तो यायच्या आंत आपण इथून जाऊं या!' अशा रीतीनें त्याची समजूत करून तिनें त्याला कडेवर घेतलें व चकार शब्द न बोलण्याबद्दल त्याच्या कानांत आणखी एकदां सांगून अगदीं सावधपणें पाऊलहि न वाजवितां ती बाहेर पडली.

ती चांदणी रात्र असून जिकडे तिकडे दंव पडलें होतें. आपल्या मुलाभोंवतीं शाल घट्ट लपेटून एलिझा टॉम काकाच्या झोपडीपाशी आली व दारावर तिनें हलकेंच टिचक्या वाजविल्या. तत्काळ टॉम व क्लो यांनीं दार उघडलें. एलिझा त्यांचेकडे पहात म्हणाली, 'टॉम काका! धनीसाहेबांनीं माझ्या मुलाला विकलें हो! म्हणून मी त्याला घेऊन पळून जात आहे!'

'काय विकलें!' टॉम व क्लो आश्चर्यानें उद्गारले.

'होय विकलें! आतां नुकतेंच धनीसाहेबांचं बाईसाहेबांशीं

झालेलं बोलणं मीं अडून ऐकलं. माझा हॅरीला व तुम्हांला अशा दोघांना धनीसाहेबांनीं एका गुलामांच्या व्यापाराला विकलें असून उद्यां सकाळीं तो व्यापारी ताबा घेण्यासाठीं इथें येणार आहे.'

टॉम आश्चर्यानें थक्कच झाला. आपण स्वप्नांत आहों कीं जागे आहों हेंच त्याला कळेना. जवळच्या खुर्चीवर खालीं मान घालून तो कसा बसा बसला.

'देवा ! हें खरें असेल काय ? विकण्यासारखं यांनीं केलं तरी काय ?' क्लो काकू दुःखी स्वरानें म्हणाली.

'त्यांनीं कांहीं वाईटसाईट केलें नाहीं व त्याबद्दल धनीसाहेब त्यांना विकीतही नाहींत ! त्यांना विकण्याची त्यांची मुळींच इच्छा नव्हती आणि बाईसाहेब—त्या माउलीच्या मनांत चुकूनसुद्धां हा विचार आलेला नाहीं !—त्यांनीं आमच्याबद्दल पुष्कळ रदबदली केली पण धनी-साहेबांचा नाइलाज झाला आहे त्यांना त्या व्यापाऱ्याचें देणें असून तें ताबडतोब चुकतें केलं नाहीं तर तो त्यांचें सारें घरदार आपले ताब्यांत घेतल्याशिवाय राहणार नाहीं. यामुळें या दोघांना तरी विकलं पाहिजे किंवा घरदारावर तुळशीपत्र ठेवून निघून गेलं पाहिजे अशी त्या मेल्यानं त्यांच्यावर पाळी आणली आहे असें ते बाईसाहेबांना सांगत होते.'

टॉमला एलिझाप्रमाणें ताबडतोब पळून जाण्याबद्दल क्लो काकूनें सुचविलें तेव्हां वर मान करून तो शांतपणें म्हणाला, 'नाहीं, मला तसें करतां येत नाहीं ! एलिझा गेली तरी तिची गोष्ट निराळी आहे ! माझ्या आत्मयज्ञानें धनीसाहेबांची सारी इस्टेट वांचत असतांना त्यांचा नाश करून मी पळून जाऊं ? छे ! त्यापेक्षां माझेंच काय होईल तें होवो ! आजपर्यंत त्यांच्या प्रत्येक हांकेला मीं तत्काळ ओ दिली आणि आतां त्यांचा विश्वासघात करूं ? ते थोर मनाचे आहेत. तुझा

व मुलांचा प्रतिपाळ ते करतील.' बोलतां बोलतां टॉमचा गळा दाटून आला. दोन्ही हातांनीं तोंड झांकून तो अश्रुमोचन करूं लागला!

जातां जातां एलिझा म्हणाली, 'काय चमत्कारिक योगायोग पहा! दुपारींच माझ्या पतीची व माझी भेट झाली होती. त्यांचा मनस्वी छळ होत असल्यामुळें पळून जाण्याचे ठरवून माझा निरोप घ्यायला ते आले होते. थोड्याच वेळांत माझ्यावरहि तीच पाळी येणार ह्याची तेव्हां मला कुठली कल्पना असणार? त्यांची गांठ पडली तर त्यांना माझा सप्रेम नमस्कार सांगा आणि म्हणावें अशा अशा कारणासाठीं तिला गृहत्याग करावा लागला. कानडाला जाण्याचा तिचा बेत आहे. आपली इथें भेट नाहीं झाली तरी स्वर्गांत खास होईल! आपण आपलें शील सोडूं नका!'

यानंतर मोठ्या कष्टानें त्यांचा शेवटचा निरोप घेऊन एलिझा मार्गस्थ झाली!

त्यावेळीं एलिझाची मन:स्थिति कशी झाली होती याचें वर्णन करणें कठीण आहे.

नवऱ्याच्या व मुलाच्या काळजीनें तिचें मन व्यग्र झालें होतेंच, त्यांतच ज्या घरांत तिचें आजपर्यंतचें आयुष्य मोठ्या आनंदांत गेलें, त्या घराचा व त्यांतील मित्रपरिवाराचा त्याग करून अशा रात्रीच्या-वेळीं आपण कुठें जायचें, आपणाला कोण आश्रय देणार व आपलें पुढें काय होणार याही विचाराची भर पडली होती. परंतु सर्वांत तिला मुलाचीच काळजी जास्त वाटत होती. तो तिच्याबरोबर चालण्याइतका आतां मोठा होता, व दुसरी एखादी वेळ असती तर तिनें त्याला हाताला धरून बरोबर चालविलेंहि असतें; पण आतां त्याला नुसतें खालीं ठेवणें तिला कससेंच वाटूं लागलें! त्याला पोटाशीं घट्ट धरून रस्त्यांत पडलेल्या बर्फावरून ती झपाट्यानें चालली.

तिच्या पायांखालील हिमकणांचा व पाचोळ्याचा जो आवाज होई त्यामुळें भितीनें तिचा थरकांप उडे व ती जास्तच जोरानें चालूं लागे. 'देवा ! आतां तूंच माझा साह्यकारी आहेस !' हे शब्द कसे-बसे तिच्या तोंडांतून बाहेर पडले.

तिचा मुलगा प्रथम कांहीं वेळ जागृत होता पण पुढें त्याला झोंप येऊं लागली तसा तो म्हणाला, 'आई मला झोंप येत आहे ग !'

'मग नीज ना ?'

'पण मला झोंप लागली तर बागलबुवा नाहीं ना नेणार ?'

'नाहीं बरं बाळ ! कुणाला मी तुला हात लावूं देणार नाहीं !'

आईच्या या आश्वासनपर शब्दांनीं धीर येऊन तो तिच्या खांद्यावर झोंपी गेला.

रस्त्याच्या कडेचीं शेतें, झाडें व इतर भूभाग झपाट्यानें तिचे दृष्टीपुढून जात होता. ती वाट तिच्या चांगली परिचयाची असल्यामुळें कोठें यत्किंचितहि न थांबतां ती सारखी झपाट्यानें चालली होती. सूर्योदयाचे सुमारास शेल्बींचे घरापासून कित्येक मैल दूर ती गेली. रस्त्यावरून गाड्याघोडयांची रहदारी सुरूं होतांच कोणाला आपला संशय येऊं नये म्हणून तिनें मुलाला खालीं उतरविलें, कपडे झाडून नीटनीटके केले व नेहमींच्या चालीपेक्षां अमळ जलद पण कुणाला त्याबद्दल विशेष वाटूं नये अशा रीतीनें तिनें चालायला सुरवात केली.

तो रस्ता ओहिओ नदीकडे जात होता. नदीकांठीं एका गांवीं मिसेस शेल्बी आपल्या मैत्रिणींना भेटावयास जात त्यांचेबरोबर एलिझा पुष्कळ वेळां त्या रस्त्यानें गेलेली होती. ओहिओ नदीचे पलीकडे ओहिओ संस्थानची हद्द लागे. ओहिओ नदी ओलांडून पलीकडे जावें मग पुढें काय देव करील तें खरें असें तिनें ठरविलें.

आपल्या लहानशा बोचक्यांत तिनें कांहीं नारिंगें व खाण्याच्या

वस्तु घेतल्या होत्या. मुलाची चाल वाढविण्याचे कामीं तिनें त्यांचा उपयोग केला. एखादें फळ ती थोड्या अंतरावर फेकी व मुलगा तें घेण्यासाठीं त्याचेमागें धांवत जात असे. या युक्तीनें आणखी कांहीं मैल ती गेली.

वाटेंत त्यांना स्वच्छ पाण्याचा एक ओढा लागला. मुलाला तहान-भूक लागलेली पाहून ओढ्याकांठच्या एका मोठ्या खडकाआड बसून तिनें त्याला खाऊं घातलें. ती स्वतः कांहींच खात नाहीं हें पाहून तो तिला खाण्याबद्दल आग्रह करूं लागला, तेव्हां ती म्हणाली, 'छकुल्या ! तुझ्यावरचं संकट टळल्याशिवाय मला खाणं-पिणं कांहीं सुचणार नाहीं ! अजून आपणांला खूप दूर-दूर नदीकडे जायचं आहे !' असें म्हणून ती रस्त्याला लागली ती संध्याकाळचे सुमारास ओहिओ नदीकांठच्या गांवांत आली. यावेळीं तिचें शरीर अगदीं गळून गेलें होतें पण तिच्या मनाचा उत्साह कमी झाला नव्हता.

गांवांत येतांच तिनें नदीकडे दृष्टि फेंकली. वसंतऋतु नुकतांच सुरूं झालेला असून नदीला महापूर आलेला होता. मोठमोठ्या बर्फ-शिला पाण्यांत *जोरानें खालीवर उसळत होत्या. अशा स्थितींत नदींतून नाव चालणें शक्य दिसत नाहीं, तेव्हां काय करावें, हा तिला विचार पडला. नदीचे पात्रालगत एक लहानशी खाणावळ होती, तेथें नावेच्या बाबतींत कांहीं माहिती मिळाल्यास पहावी म्हणून ती गेली.

एलिझाचा गोड पण दीनवाणा शब्द ऐकून संध्याकाळच्या सैंपा-काचे कामांत चूर झालेली खाणावळीची मालकीण बाहेर आली.

'हल्लीं नाव सुरूं नाहीं का !' एलिझानें विचारलें.

---

* उत्तरेकडील थंड प्रदेशांत वसंतऋतूंत बर्फ वितळून नद्यांना पूर येत असतो.

'नाहीं ! हल्लीं नावा बंद आहेत. तुला पलीकडे जायचं आहे वाटतं ? आणखी एका गृहस्थाला पलीकडे जायचें आहे, जमल्यास आज रात्रींच जायचा त्याचा विचार आहे. थोड्या वेळांत तो इथें येईल. जरा इथें बैस, अनायासें त्याची तुझी गांठ पडेल. इतक्यांत हॅरी अतिशय दमल्यामुळें रडूं लागला. त्याचेकडे पहात एलिझा म्हणाली, 'पोराची जात ! त्याला नाहीं चालायची संवय, अन् मीं तर त्याला बरंच ताणीत आणलें, तेव्हां स्वारी आली आहे घाईला !'

'असें का ? मग त्याला या खोलींतील बिछान्यावर घटकाभर निजीव.' खोलीचें दार उघडीत खानावळीणबाई कळवळ्यानें म्हणाली.

एलिझानें त्याप्रमाणें हॅरीला खोलींत नेऊन बिछान्यावर निजविलें. थोड्याच वेळांत त्याला गाढ झोंप लागली. तिला स्वतःला विश्रांति कुठली ? आपणांला पकडण्यासाठीं आपल्या पाठोपाठ माणसें येत असतील हा विचार तिला चैन पडूं देत नव्हता. नदीचे पाण्याकडे पाहात ती खिडकींत उभी होती.

तिला अशा स्थितींत कांहीं वेळ सोडून ती निघून गेल्यावर इकडे शेल्बींचे घरीं काय प्रकार घडला तो आपण पाहूं.

---

## प्रकरण ६ वें

### पाठलाग

सकाळीं एलिझाचें पलायनची बातमी कळतांच मिसेस शेल्बी आनंदानें उद्गारल्या, 'बरें झालें बाई ! देवच पावला म्हणायचा !'

'काय वेड्यासारखें बोलतेस हें ? यामुळें माझ्या अब्रूला धक्का बसेल ना ? मी तिच्या मुलाला विकायला नाखुष आहे हें हेलेला

ठाऊक होतें, यामुळें मींच तिला पळायला फूस दिली, अशी त्याची समजूत होईल !' शेल्बी सचिंतपणें म्हणाले.

शेल्बींच्या गुलामांत मारे एकच धांदल उडाली. एलिझा कशी गेली, केव्हां गेली, कुठें गेली याबद्दल त्यांच्यांत तर्कवितर्क सुरू झाले. टॉम व क्लो काकू यांचेकडून खरा प्रकार कळण्याचा संभव होता. पण तीं उभयतां आपलेच दुःखांत चूर असल्यामुळें स्तब्ध होतीं.

हेले येतांच शेल्बी त्याला दुःखित स्वरानें म्हणाले, 'एलिझाला कसें कळलें कोण जाणें पण ती मुलाला घेऊन इथून पळून गेली!'

'मला वाटलेंच होतें असा कांहीं प्रकार होईल म्हणून !'

'हेले ! अस्सं भलतें सलतें बोलूं नका ! यांत माझा काडीचाही दोष नाहीं ! तिचा शोध करण्यासाठीं तुम्हांला लागेल ती मदत करायला मी तयार आहे. आतां स्वस्थपणानं थोडा फराळ करा. नंतर आपण या बाबतींत काय करायचें तें पाहूं.' शेल्बी म्हणाले.

आपणाला कांहीं जरूरीचें काम आहे असं सांगून मिसेस शेल्बी तेथून निघून गेल्या.

**सॅम** व **अँडी** या निग्रो गुलामांची हेलेला मदत करण्याचें कामीं योजना झाली. ते दोघेहि धूर्त होते. आपल्या मालकिणीचें एलिझावर किती प्रेम आहे, व ती सांपडूं नये अशी तिंची इच्छा आहे हें त्यांना माहीत होतें म्हणून पाठलागाला निघायला शक्य तों उशीरा लावायचा असें त्यांनीं ठरविलें.

हेले फराळ आटपून येतांच सॅम त्याला घोड्यावर बसण्याचें कामीं मदत करूं लागला व अँडी आपले घोडे आणायला गेला.

सॅमनें आपले हातांतील नारळाची चोपडी अशा कांहीं तऱ्हेनें एकदम घोड्याचे डोळ्यापुढें फिरविली कीं हेले पाठीवर बसतांच घोडा

एकदम उधळला व त्यानें आपल्या पाठीवरील स्वाराला जमीनीवर आपटलें !

कसा बसा हेले उठून पुन: घोड्यावर बसतों तों पूर्वसंकेतानुसार अँडीनें आपल्या घोड्यांना उधळायला लावलें ! नंतर सॅम व अँडी यांनीं एकच आरडा ओरडा करीत घोड्यामागें इकडून तिकडे धांवण्यास सुरवात केली !

या एकंदर प्रकारानें हेलाचाहि घोडा गांगरून गेला. स्वत:शीं चरफडत व शिव्या शाप देत हेले इकडे तिकडे फिरूं लागला. बिचाऱ्या शेल्बींना या साऱ्या गोंधळाचा अर्थच कांहीं कळेना.

अशा स्थितींत सुमारें तीन तास गेले. सॅम व अँडी यांचे घोडे एकदांचे सांपडले व ते निघायला तयार झाले. पण जेवणाची वेळ झाल्यामुळें जेवून जाण्याबद्दल हेलेला मिसेस शेल्बींनीं विनंति केली. हेलेहि एकंदरींत कंटाळलाच असल्यामुळें जेवूनच मग पाठलागावर निघावें असें त्यानें ठरविलें.

हेले साहेबांचें दुर्दैव आज पुरें ओढवलें होतें ! जेवण नेहमीं-प्रमाणें वेळेवर तयार नव्हतें. त्यांतहि बराच वेळ गेला.

टॉमला जेवणाचे वेळीं बोलावून आणून शेल्बी म्हणाले, ‘ यांना आज दुसरीं कामें असल्यामुळें ते उद्यां तुला नेणार आहेत. त्यावेळीं तूं इथं नसलास तर मला निष्कारण हजार डॉलर भूर्दंड पड-णार आहे ! ’

‘ धनीसाहेब ! मी आठ वर्षांचा असतांना आपल्या मातुश्रींनीं आपणाला माझ्या ताब्यांत दिलं व ‘ आतां तुझा धनी हा, याला संभाळ ’ म्हणून सांगितलं. त्यावेळीं आपण पुरते वर्षाचेंहि नसाल ! आजपर्यंत मी कधीं तरी आपली आज्ञा मोडली आहे किंवा आपल्या मनाविरुद्ध वागलों आहे कां ? ’

शेल्बींचे डोळे पाण्यानें भरून आले. मिसेस शेल्बींनाहि वाईट वाटलें. त्या म्हणाल्या, 'टॉम ! आमची स्थिति जरा सुधारतांच आम्ही तुझी सुटका केल्याखेरीज खास रहाणार नाहीं !'

दोन वाजण्याचे सुमारास सॅमनें घोडे तयार करून आणलें व हेले, सॅम व अँडी एलिझाचे शोधास निघाले.

थोडया वेळानें जेथून दोन रस्ते फुटतात अशा एका ठिकाणीं ते आले. पूर्वी हे दोन्ही रस्ते वहिवाटींत असून ओहिओ नदीकडे जात होते पण आतां त्यांपैकीं एक कांहीं अंतरावर बंद करण्यांत आलेला होता. सॅमला ही गोष्ट माहीत होती पण त्यानें ती अशा कांहीं मुद्रेनें हेलेला सांगितली कीं त्याचा तीवर विश्वास बसला नाहीं व त्याच रस्त्यानें जाण्याचा त्यानें आग्रह धरला !

एक तासभर त्या रस्त्यानें प्रवास केल्यावर तो बंद असल्याचें दिसून आल्यामुळें त्यांना परत ठिकाणीं येऊन दुसऱ्या रस्त्यानें जावें लागलें !

अशा प्रकारें उशीर होत होत ही मंडळी एकदांची एलिझाचे मागून सुमारें पाऊण तासानें त्याच गांवांत आली.

सॅम सर्वांचे बराच पुढें होता. एलिझा खिडकींत उभी असलेली त्यानें पाहिली. तिला आपले आगमनाची सूचना मिळावी म्हणून आपली टोपी वाऱ्यानें पडल्याचें निमित्त करून तो ओरडला. एलिझा एकदम दचकली व मागें सरली ! हेले व त्याचे सहकारी त्या खिडकी खालून पुढील दारीं आले.

एलिझाचे खोलींतून नदीकडे जायला एक दार होतें. मुलाला उचलून घेऊन तिनें त्या वाटेनें नदीकडे धूम ठोकली. पण तिला हेलेची दृष्टि चुकवितां आली नाहीं ! त्यानें तत्काळ घोड्यावरून

खालीं उडी टाकली व सॅम व अँडीला आपलेबरोबर येण्याबद्दल मोठ्यानें ओरडून सांगत तो शिकारी कुत्र्यासारखा तिचेमागें धांवला!

ती वेळ मोठ्या आणीबाणीची होती. एलिझा इतक्या वेगानें पळत होती कीं, जमिनीवर तिचा पाय बिलकुल ठरत नव्हता. एका क्षणांत ती नदीचे पात्राजवळ आली. हेले तिच्या मागोमाग होताच! आत्यंतिक निराशेनें व्याप्त झालेल्या मनुष्याला जसें एक प्रकारचें धैर्य येतें व जिवावर उदार होऊन वाटेल तें करायला तो तयार होतो तशी एलिझाची त्यावेळीं स्थिति झाली होती. मोठ्यानें किंकाळी फोडीत ती एकदम नदीचे प्रवाहांत घुसली! निराश झालेल्या किंवा वेड्या माणसाला शोभण्यासारखेंच हें भीषण कृत्य होतें! हेले, सॅम व अँडी साश्चर्य भीतीनें हात वर करून ओरडले, 'थांबा!! काय करते आहेस हें!'

शेवाळानें हिरवट दिसणारे बर्फाच्या मोठमोठ्या लहान मोठ्या शिला पाण्यांत इतस्तत: तरंगत होत्या. किंकाळ्या फोडीत एलिझा या तुकड्यावरून त्या तुकड्यावर उड्या मारीत एकसारखी पुढें पुढें जात होती. बुळबुळीतपणामुळें व ते सारखे खालींवर होत असल्यामुळें त्यांवरून जातांना तिचा पाय घसरे, ती ठेंचाळे पण तिनें कशाचीच पर्वा केली नाहीं! तिला यावेळीं देहाची शुद्धि होती कोठें? तिचे बूट पायांतून निघून गेले, पायमोजे फाटले व पाय रक्तबंबाळ झाले! फक्त एकच गोष्ट तिला दिसत होती, ती म्हणजे मुलाला आपलेपासून दूर होऊं न देणें!! अशा रीतीनें थोड्याच वेळांत ती परतीराला पोंचली तेथें उभ्या असलेल्या एका मनुष्यानें हात देऊन तिला सुरक्षितपणें नदीबाहेर ओढून घेतलें.

'तूं मोठी धारिष्टवान् मुलगी दिसते आहेस!' तो मनुष्य विस्मयानें उद्गारला.

त्याच्या आवाजावरून त्यावेळेच्या अंधुक प्रकाशांत तिनें त्याला ओळखलें. शेल्बीचे घरापासून जवळच त्याची शेती होती.

'मला कसेंही करून वांचवा हो! मला लवकर कुठें तरी लपवा!'

'कां? झालें तरी काय? इतकी कां घाबरली आहेस? तूं शेल्बीचेकडे असतेस नाहीं?'

'होय हो! पण त्यांनीं या मुलाला-माझ्या जीवाच्या कलिजाला-विकलें! तो पहा त्याचा नवा धनी माझ्यापासून त्याला हिसकून घ्यायला आला आहे!' परतीराकडे बोट दाखवित एलिझा म्हणाली.

त्या मनुष्यानें तिला नदीकांठचे डगरीवरून पलीकडे नेलें. नंतर तो म्हणाला, 'तुला मदत करायचें माझ्या मनांत फार आहे पण मी तुला कुठें नेऊं? तो समोर पांढऱ्या रंगाचा बंगला दिसतो आहे ना? त्या घरीं जा. तिथलीं माणसं फार सज्जन आहेत, तीं तुला आश्रय दिल्याशिवाय राहणार नाहींत.'

'देव आपलें कल्याण करो! पण कृपाकरून ही गोष्ट कुठं बोलूं नका.'

'मुकाट्यानें जा कशी? इतका कां मी नीच मनुष्य आहे?'

एलिझा मुलाला घेऊन तशीच त्या बंगल्याकडे निघाली.

ती परतीरावरून दिसेनाशी होतांच हेले खिन्नपणें परत फिरला. पुढें काय करावें याचा विचार करण्यासाठीं नदीकांठच्या खाणावळींत तो बसला व सॅम व अँडी यांचें काम झाल्यामुळें हेलेची थट्टामस्करी करीत घोड्यावरून तेही परतले.

—— ——

# प्रकरण ७ वें

## नंतर

नुकत्याच घडलेल्या प्रसंगामुळें मानवी आशांचा फोलपणा व सुखाची क्षणभंगुरता यांवर विचार करीत व स्वतःला शिव्याशाप देत हेलेसाहेबांची स्वारी खानावळींतील एका खोलींत बसली होती. इतक्यांत त्यांच्या सुदैवानें दोन माणसें तेथें आलीं. त्यांपैकीं एकाचें नांव टॉम लॉकर असून तो धिप्पाड व मजबूत बांध्याचा होता. त्याची मुद्रा राकट व उग्र होती. रेड्याचे चामड्याचा कोट त्यानें अंगांत घातला असल्यामुळें त्याच्या उग्रतेंत एक प्रकारें भरच पडलेली होती. त्याचा जोडीदार मात्र गिड्डा, हाडकुळा पण चेहऱ्यावरून लुच्चा दिसणारा असा होता. त्याचें नांव मार्क्स. हे दोघेजण गुलमांचा व्यापार करणाऱ्या मंडळींपैकींच असून पैशासाठीं काय वाटेल तें करावयास तयार होणाऱ्या वृत्तीचे ते होते. या दोघांचे साह्यानें आपला 'हरवलेला माल' परत मिळविण्याचें हेलेनें ठरविलें व त्यावर खल करण्यासाठीं हें त्रिकूट एकत्र बसलें.

एलिझा ही 'सुंदर, खाशी, सुबक ठेंगणी' स्त्री असल्याचें ऐकून या उभयतांचें तोंडास पाणी सुटलें व हें काम यशस्वी झाल्यास छोट्या हॅरीला हेलेला देऊन एलिझाला आपण उपटावें व + न्यू ओरलिन्सला नेऊन तिच्यावर चांगली किफायत मिळवावी असा

---

+ न्यू अरलिन्स हें दक्षिणेकडील संस्थानांपैकीं लुसिआना संस्थानांतील मोठे बंदर असून येथें त्याकाळीं गुलामांचा मोठा बाजार भरत असे. या बाजारांत विक्रीसाठीं आणलेल्या गुलामांना कसें अमानुषपणें वागविण्यांत येई हें अब्राहाम लिंकननें आपले तरुणपणीं प्रत्यक्ष पाहिलें होतें.

त्यांनीं बेत केला. हेलेची या गोष्टीला हरकत नव्हती. कारण हॅरी-लाच त्यानें विकत घेतलें असल्यामुळें तोच तेवढा त्याला पाहिजे होता. एलिझाचें भवितव्यतेची त्याला मुळींच पर्वा नव्हती. त्यांनीं फक्त हॅरीला आपलें स्वाधीन करावें अशी त्यानें इच्छा व्यक्त केली पण हे दोघे हेलेला पुरे पुरे ओळखत होते. ते म्हणाले, ' हें काम हातीं घेण्याबद्दल अनामत म्हणून पन्नास डॉलर आतांच्या आतां आम्हांला द्या काम फत्ते झाले तर तुमची रक्कम तुम्हांला परत मिळेल, नाहीं तर आमचे मेहनतीबद्दल ती रक्कम आम्हांला पाहिजेच!'

हेलेनें नाहीं होय करीत मुकाटयानें पन्नास डॉलर त्यांचे स्वाधीन केले. त्यांचेजवळ वासानें मनुष्याच्या पावलांचा माग काढणारे ' ब्लड हाउंड' जातीचे कुत्रे होते. एलिझा पळण्याचे घाईंत आपली शाल व टोपी खानावळींतच विसरली होती ती त्यांना आयतीच मिळाली व अशा रीतीनें एलिझाचा पाटलाग करण्यासाठीं ही नरपशूंची जोडी सिद्ध झाली!

× × ×

इकडे सॅम व अँडी मोठ्या आनंदानें गप्पागोष्टी करीत परत चालले होते. रात्रीं दहा अकराचे सुमारास ते शेल्बीचे घरीं पोंचले व त्यांनीं शेल्बी दंपतीला घडलेली हकीगत सांगितली. 'एलिझाचें नदींतून जाणें' ही हकीगत ऐकत असतां मिसेस शेल्बींचे अंगावर शहारे आले.

' देव भले करो! तिला कांहीं इजा तर झाली नसेल? आतां कुठें बरें असेल ती?' मिसेस शेल्बींनीं विचारलें.

सॅमनें परतीरावरील एका मनुष्याबरोबर ती कशी गेली व त्या दिवशीं सकाळपासून आपण दूरदृष्टीनें वागून हेलेला कसा विलंब

लावलें व अशा रीतीनें एलिझाला निसटून जाण्यास अप्रत्यक्षपणें कशी मदत केली ती सर्व हकीकत इत्थंभूत आपल्या धनिणीस सांगितली.

त्याचें हें करणें शेल्बींना रुचलें नाहीं. थोड्याशा कठोरपणानें ते म्हणाले, 'ही दूरदृष्टि नसून निव्वळ फसवेगिरी आहे ! निदान माझ्या मंडळींनीं तरी अशा रीतीनें वागून दुसऱ्यांना फसविणें मला मुळींच आवडत नाहीं ? सॅम, पुनः असा प्रकार घडतां कामा नये !

सॅमनें माझी चुकी झाली, पुनः आपण असें करणार नाहीं असें गयावया करीत म्हणतांच मिसेस शेल्बींनीं त्याला व अँडीला स्वयं-पाक घरांत जेवायला जायला सांगून तें प्रकरण तेथेंच मिटविलें.

---

## प्रकरण ८ वें.

### कायदा मोडण्याचा निश्चय !

एलिझाला नदीवर उतरून घेणाऱ्या गृहस्थानें तिला जो पांढरा बंगला दाखविला होता तो बर्डसाहेबांचा असून ते संयुक्त संस्थानांची राजधानी जें वाशिंग्टन शहर तेथील वरिष्ठ कायदेमंडळाचे सभासद होते. तेथील आपलें काम आटपून नुकतेच ते परत आपले घरीं आले होते व दिवाणखान्यांत आपले पत्नीशीं बोलत बसले होते. मिसेस बर्ड त्यांच्यासाठीं चहा व फराळाचे जिन्नस तयार करीत होत्या.

' आज वरिष्ठ कायदेमंडळांत काय काम झालं ? ' मिसेस बर्डनीं विचारलें.

त्यांनीं आजपर्यंत असा प्रश्न कधींच केला नव्हता. बायकांचं ज्ञान चुलीपुरतं, त्यांना बाहेरच्या उठाठेवी हव्या कशाला ? अशी

त्यांची वृत्ति असल्यामुळें बर्डसाहेबांना आश्चर्य वाटून ते म्हणाले ' तसे कांहीं विशेष नाहीं.'

' पण मीं ऐकलं कीं आपल्या दारापुढं आश्रयार्थ येणाऱ्या निराश्रित दुर्दैवी गुलामांना कोणीही अन्नवस्त्र देऊं नये असा एक कायदा होतो आहे, हें खरं का? मला नाहीं वाटत कोणतेंहि खरें ख्रिस्ती कायदेमंडळ असला कायदा करील असे!

' अरे वा! आज तर आपण राजकारणी बनायचें मनांत आणलेलें दिसतें आहे.'

' भलतेंच! मला काय करायचें आहे आपल्या राजकारणाशीं? परंतु असला कायदा होणें निष्ठुरपणाचें व आपल्या धर्मविरुद्ध आहे असें मला वाटतें. असला कायदा नाहींना झाला?'

' झाला! कारण गुलामगिरीला विरोध करणाऱ्या लोकांच्या चळवळीमुळें कैंटुकींतील लोकमत अत्यंत क्षुब्ध झालें होतें, म्हणून त्यांच्या समाधानासाठीं धर्मबिर्म सारें गुंडाळून ठेवून हा *कायदा करावा लागला!'

' असा हा मेला कायदा तरी काय आहे? निराश्रित गुलामांना आम्ही एखाद्या रात्रीं वस्तीला जागा दिली, त्यांच्या पोटाला घातलें, किंवा त्यांना जुनेपुराणे कपडे दिले तर हा कायदा आड येणार काय?'

' होय, तसें करणें म्हणजे त्यांना फूसच देणें आहे!'

मिसेस बर्ड या लहान बांध्याच्या व भित्र्या स्वभावाच्या होत्या.

---

*इ० स० १८५० सालीं ' फरारी गुलामाबाबत कायदा, नांवाचा एक कायदा वाशिंग्टन येथील वरिष्ठ कायदेमंडळांत पास झाला. मालकाचे घरून पळून जाणाऱ्या गुलामांना कोणीही थारा देऊं नये व त्यांना पकडण्याचे कामीं त्यांचे मालकांना जरूर ती मदत करावी असें या कायद्यानें ठरविलें. याच कायद्याचा वर उल्लेख आहे.

त्यांच्या आवाजांत विलक्षण गोडी व मार्दव होतें. आपल्या गृहराज्यांत त्या नम्रतेनें व गोडीगुलाबीनें कारभार त्यांना फक्त एकाच गोष्टीची अत्यंत चीड येत असे, आणि ती म्हणजे त्यांच्या ममताळू व कोमल मनाला निर्दयपणाचें कोणतेंहि कृत्य आवडत नसे, त्या आपले पतीजवळ जाऊन म्हणाल्या, 'आपणा स्वत:ला हा कायदा योग्य वाटतो का ? आपण त्याला खास संमति दिली नसेल !'

'समज, मला तो योग्य वाटतो व मीं त्याला संमत्ती दिली, मग काय म्हणणें ?

'असें बोलतांना आपल्या मनाला कांहींच कसें हो वाटत नाहीं? असला कायदा होणें ही गोष्ट किती दुष्टपणाची अन् लाजिरवाणी आहे ! मला संधी मात्र मिळूं द्या, मीं हा कायदा मोडल्याशिवाय मुळींच राहाणार नाहीं ! शर्थ झाली बाई या कायद्यांच्यापुढें ! अनाथ व भुकेनं तडफडणाऱ्या अभागी जीवांना निवळ ते गुलाम आहेत एवढ्याचसाठीं एखाद्या माउलीनं अन्नपाणीही द्यायचं नाहीं अं ! !'

'मेरी ! तुझ्या या कनवाळूपणाबद्दल मला आनंद वाटतो, पण सार्वजनिक हितानहिताच्या आड कोणालाही कनवाळूपणा येणें चांगलें नाहीं ! '

'जॉन ! मला राजकारण कळत नसलें तरी बायबल चांगलें कळतें ! 'भुकेलेल्यांना अन्न द्यावं, वस्त्रहीनांना वस्त्र द्यावें व दु:खितांचें सांत्वन करावें ' असें बायबलांत सांगितलें आहे. त्याप्रमाणेंच मी वागणार ! इतकं कशाला ? मी आतां आपल्यालाच प्रत्यक्ष विचारतें. समजा, एखादा निराश्रित, अन्नपाण्यावांचून व्याकूळ झालेला वस्त्र भावीं कुडकुडणारा दुर्दैवी गुलाम आश्रयार्थ आपले दाराशीं आला तर आपण त्याला हाकून देणार कां ? '

बर्डसाहेब जात्या अत्यंत सहृदय असल्यामुळें त्यांच्याहातून

असलें कृत्य घडणें शक्यच नव्हतें हें माहीत असल्यामुळेंच मिसेस बर्डनीं असा प्रश्न विचारून वर्मी घाव घातला. बर्डसाहेबांची घांदल उडाली ! काय उत्तर द्यावें याचा त्यांना विचार पडला. यामुळें उत्तेजन येऊन मिसेस बर्ड पुढें म्हणाल्या, 'खरंच, असा प्रकार घडावा अशी माझी भारी इच्छा आहे ! मग आपण कसें वागतां तें तरी मला एकदांचें कळेल !'

'तसें झालेंच तर नाइलाजानें कर्तव्य म्हणून त्याला घालवून देणें मला भाग आहे !'

'काय कर्तव्य ! नका, त्या पवित्र शब्दाची अशी विटंबना करूं नका ! आपल्या गुलामांनीं पळून जाऊं नये असें ज्यांना वाटतें त्यांनीं त्यांना चांगल्या रितीनं वागविलें पाहिजे. मग कशाला ते पळून जातील बरें ? पळून गेल्यानें तरी त्यांच्या मागची ग्रहदशा थोडीच चुकते ! हाल अपेष्टा वनवास त्यांच्या भाळीं लिहिलेलाच असतो ! अशा स्थितींत त्यांना हाकून देऊन त्यांच्या दुःखावर डागण्या देणें आपणांसारख्यांना शोभत नाहीं ! मी तरी निदान असलं दुष्कृत्य खास करणार नाहीं !' मिसेस बर्ड आवेशानें म्हणाल्या.

'मेरी ! मेरी ! माझें जरा ऐक—

'पुरे झालें ऐकणें ! आतांपर्यंत पुष्कळ ऐकलें ! आपण कांहीं जरी सांगितलेंत तरी माझी कांहीं समजूत पडणार नाहीं ! आपणासारख्या मुत्सद्यांना साध्या सरळ गोष्टीवर देखील उगीच काथ्याकूट करण्याची संवय असते ! आपल्या स्वभावाची मला माहिती का नाहीं ? आपण कांहीं जरी म्हटलं तरी आपल्या हातून असलें कृत्य व्हायचेंच नाहीं मुळीं ! !

---

# प्रकरण ९ वें

## एलिझा !

याच वेळीं क्यूजो नांवाच्या त्यांच्या वृद्ध हरकामी निग्रो नोकरानें दरवाजाशीं येऊन कांहीं जरूरीचें कामामुळें स्वयंपाक घरांत येण्या-बद्दल मिसेस बर्डना विनंति केली व त्याप्रमाणें त्या त्याचे मागोमाग गेल्या. बर्डसाहेबांना जरा हायसें वाटलें !

थोडयाच वेळांत मिसेस बर्ड घाइघाईनें दरवाजापाशीं येऊन म्हणाल्या, ' जॉन ! अमळ इकडें येतां का ? '

बर्डसाहेब तत्काळ स्वयंपाकघरांत गेले. तेथील दृश्य पाहून ते हतबुद्धच झाले !

एका तरुण व नाजुक स्त्रीला दोन खुर्च्यांवर निजविलें असून तिला भयंकर मूर्च्छा आलेली होती. तिच्या अंगावरील कपडयांच्या चिंध्या झालेल्या होत्या. पायांत बूट नव्हते व पायमोजे फाटले असून पाय रक्तबंबाळ झालेले होते. तिच्या चेहऱ्यावरून ती गुलामांपैकीं असावी असें दिसत होतें.

मिसेस बर्ड आपल्या मोलकरणीचें साह्यानें तिला शुद्धीवर आण-ण्याचा प्रयत्न करूं लागल्या. मोलकरीण त्या स्त्रीची हकीगत सांगूं लागली. ती म्हणाली, 'ही बाई नुकतीच सैंपाकघराचें दाराशीं आली व थंडीनें कुडकुडत असल्यामुळें जरा विस्तवाजवळ शेकायला बसूं कां म्हणून विचारूं लागली. ती कोण, कुठली म्हणून मी चौकशी करतें तों ती आपली एकदम मूर्छितच पडली !

हळूं हळूं शुद्धीवर येऊन त्या स्त्रीनें आपले मोठे काळेभोर डोळे उघडले व मिसेस बर्डच्या चेहऱ्याकडे शून्यपणानें पाहिलें. त्यावेळीं त्या कळवळून म्हणाल्या, ' अरेरे ! काय बिचारीची अवस्था ही !'

त्या स्त्रीची मुद्रा एकाएकीं कावरीबावरी झाली व ताडकन् उठून ती ओरडली, ‘ हॅरी ! अगबाई माझें बाळ कुठें गेलें ? त्या चांडाळांनीं त्याला नेलं तर नसेल ? ’

हॅरी तत्काळ क्यूजोचे कडेवरून खालीं उतरला व तिजकडे धांवला त्याला पाहून तिला समाधान झाल्याचें दिसलें. मिसेस बर्डकडे पाहात ती म्हणाली, ‘ बाईसाहेब आम्हांला वांचवा हो !

‘बाई ! काळजी करूं नको. इथें कोणी तुला त्रास द्यायला यायचा नाहीं. स्वस्थ ऐस.’

मिसेस बर्डच्या या आश्वासनपर शब्दांनीं त्या स्त्रीचा जीव जरा खालीं पडला. हुंदके देत ती म्हणाली, ‘ईश्वर आपलें कल्याण करो!’

ही स्त्री एलिझाच असल्याचें वाचकांचे लक्षांत आलेंच असेल.

चार समाधानाचे शब्द बोलून दुःखितांचें सांत्वन करण्यांत मिसेस बर्डचा हातखंडा होता. यामुळें एलिझाला शांत करणें त्यांना मुळींच जड गेलें नाहीं. चुलीजवळच एक बिछाना तयार करवून त्यावर घटकाभर स्वस्थ विश्रांति घ्यायला त्यांनीं तिला सांगितलें व त्या पतीसह दिवाणखान्यांत परत आल्या.

‘ ही स्त्री कोण असेल बरं ? ’

‘ उठली म्हणजे कळेलच. ’

‘ मी म्हणतों—’

‘ काय ? ’

‘ तुझ्या अंगांतला झगा तिला होईल कां ? होत असेल तर तिला द्यावा. आणखी माझा तो ओव्हरकोटहि पाहिजे तर द्यावा. तिला कपडयांची फार गरज दिसते. ’

एलिझा जागृत झाल्याचें मोलकरणीकडून कळतांच बर्डसाहेब पत्नीसह परत स्वयंपाक घरांत गेले.

यावेळीं एलिझा शांतपणें विस्तवाकडे पहात बिछान्यावर बसली होती. तिच्याकडे पहात मिसेस बर्ड म्हणाल्या, ' आतां तुला अमळ बरें वाटतें ना ? अगदीं काळजी करूं नकोस. आपल्याच घरीं आहेस असें समज. बरें तूं आलीस कुठून ? '

एलिझानें आपली सर्व हकीकत त्यांना सांगितली. ती नदी तरून आल्याचें ऐकून सर्वांनाच आश्चर्य वाटलें.

नंतर एलिझा मिसेस बर्डच्या चेहऱ्याकडे निरखून पहात म्हणाली ' बाईसाहेब, आपलें एखादें मूल गेलें आहे कां ?

मिसेस बर्डना रडूं कोसळलें. कारण त्यांचें एक आवडतें मूल नुकतेंच गेलें होतें. त्या वेळची त्यांना आठवण झाली. त्या म्हणाल्या ' कां बरें ? नुकतेंच माझें एक मूल गेलें आहे खरें ! '

' मग आपणांला माझ्या दुःखाची खरी कल्पना येईल ! माझीं एकामागून एक अशीं दोन छकुलीं गेलीं, देवाच्या दयेनं हें मात्र वांचलें आहे. माझें जीवन सर्वस्व काय तें हें ! याला त्यांनीं विकलं हो ! याला माझ्यापासून हिसकून घेण्यासाठीं तो राक्षस माझ्या मागो-मांग येतो आहे ! आईपासून कधींही दूर रहावयाची या पोराला संवय नाहीं. अशा स्थितींत इतक्या लहान वयांत यानें कसें हो दूर जायचें ? '

तेथें हजर असलेल्या सर्वच मंडळींना हें हृदयस्पर्शी भाषण ऐकून अत्यंत दुःख झालें बर्डसाहेबांच्या दोघां लहान मुलांचे देखील डोळे पाण्यानें भरून आले.

' बरं आतां तुझ्या मनांत पुढें कुठें जायचें आहे ? ' मिसेस बर्डनीं विचारलें.

' वाट सांपडली तर कानडाला जावं म्हणतें. कानडा इथून किती दूर आहे हो ? '

मिसेस बर्ड कळवळून म्हणाल्या, ‘ तो किती दूर आहे याची तुला कल्पनासुद्धां यायची नाहीं ! तो फार लांब आहे. आमच्याकडून होईल तेवढी मदत आम्ही तुला करूं. आतां स्वस्थ नीज. सकाळीं आपण पाहूं काय करावयाचें तें ! देवावर भरंवसा ठेव. तो तुझें खचित रक्षण करील ! ’

बर्डसाहेब व त्यांच्या पत्नी पुनः दिवाणखान्याकडे गेल्या.

---

## प्रकरण १० वें.

### कायदेभंग !

मिसेस बर्ड दिवाणखान्यांत परत आल्यानंतर आपल्या झुलत्या खुर्चीवर झोके घेत बसल्या. त्यांची मुद्रा विचारमग्न दिसत होती. बर्डसाहेब अस्वस्थपणें इकडून तिकडे व तिकडून इकडे शतपावली करीत होते. थोड्यावेळानें ते म्हणाले, ‘आज रात्रींच्या रात्रीं तिला येथून दूर नेलें पाहिजे. कारण सकाळीं उजाडतें न उजाडतें तोंच सरकारी शिपाईबरोबर घेऊन ती ब्याद इथें येईल व मग त्यांच्याशीं कटकट करणें मला शक्य नाहीं ! म्हणून आजच्या आज तिला येथून नेणें बरें !’

‘पण इतक्या रात्रीं त्यांना न्यायचें तरी कुठं ?’

आपले कपडे चढवीत बडसाहेब जरा त्रासिकपणानें म्हणाले, ‘मला माहिती आहे कुठें न्यायचें तें ! माझा जुना पक्षकार व्हॉन ट्रॉप तुला ठाऊकच आहे. पूर्वीं तो केंटुकींत राहात होता. आपल्या सगळ्या गुलामांना स्वातंत्र्य देऊन त्यांच्यासह तो आतां इथें राहायला आला आहे. ओढ्यापासून सुमारें सात मैलांवर जंगलालगत त्यानें

जागा विकत घेतली असून तिथेंच तो राहातो. त्या बाजूला सहसा कोणी फिरकत नाहीं. शिवाय गडबडीच्या वेळीं ती जागा सांपडण्यासारखीही नाहीं. तिथें हिला कसलाहि धोका नाहीं. माझ्याखेरीज तेथें गाडी नेण्यासारखा कोणी मनुष्य नाहीं एवढी मोठी पंचाइत झाली आहे !

'कां बरं ? आपला क्यूजो नाहीं का हें काम करायचा ?'

नाहीं, त्याच्यानें तें होण्यासारखे नाहीं. रस्त्यांत दोन जागीं वळणें असून दुसरें वळण अतीशय धोक्याचें आहे. माहीतगाराशिवाय तेथून जातां येणें कठीण आहे. मी शेंकडों वेळां घोड्यावरून त्या रस्त्यानें गेलों असल्यामुळें मला तो चांगला माहीत आहे. एकटया क्यूजोच्यानें हें काम रेटणार नाहीं. मला बरोबर गेलेंच पाहिजे. बारा वाजण्याचे सुमारास गाडी जोडून तयार होईल. तींतून मी त्यांना घेऊन जातों व टॉपचे हवालीं करतों. कोणास संशय येऊं नये म्हणून क्यूजो पुढें मला कोलंबसला घेऊन जाईल. म्हणजे कोलंबसला* जाण्यासाठीं आम्हीं गाडींतून निघालों असेंच कोणासही वाटेल !

त्यांचा हा बेत मिसेस बर्डना पसंत पडला. पतीकडे पहात त्या प्रेमळपणानें म्हणाल्या, 'या बाबतींत आपले बुद्धिमत्तेपेक्षां आपला दयाळूपणाच जास्तच व्यक्त होतो आहे. या आपले स्वभावाची आपणापेक्षां मला जास्त माहिती आहे याबद्दल मला अभिमान वाटतो.

बर्डसाहेब गाडीची व्यवस्था पाहण्याकरितां निघाले. जातां जातां दरवाजाजवळ थोडा वेळ थांबून ते म्हणतात, 'मेरी ! तुला आवडेल कीं नाहीं कोण जाणें—त्या ड्रावरमध्यें आपल्या दुर्दैवी चिमुकल्या हेनरीचे कपडे, खेळणीं वगैरे आहेत त्यांपैकीं—' पुढें त्यांच्यानें बोलवेना. ते तडक तेथून निघून गेले.

---

* ओहिओ संस्थानची राजधानी.

मिसेस बर्डनीं तो ड्रावर उघडला व त्यांतून विविध तऱ्हेचे छोटे कोट, झबलीं, टोप्या, मोजे, बूट व खेळणीं बाहेर काढलीं. त्या वस्तु पाहतांच आपल्या मृत बालकाची आठवण होऊन त्यांना दुःखाचा उमाळा आला व त्या मूक रोदन करूं लागल्या! नंतर डोळे पुसून त्या वस्तूंचें एक बोचकें त्यांनीं तयार केलें.

'आई! या वस्तु तूं देऊन टाकणार का?' त्यांच्या मुलांपैकीं एकानें विचारलें.

'बाळांनो! मी त्या कुणाला देणार नव्हतें पण माझ्यापेक्षांहि दुःखी कष्टी माता आज आपले इथें आली आहे. तिला मी या देतें. याबद्दल स्वर्गांत आपल्या हेनरीला आनंदच होईल बरं!'

नंतर आपलें कपाट उघडून त्यांनीं वापरतां येण्यासारखे कांहीं जुने कपडे काढले व सुईदोरा घेऊन कुठं त्याला भोंकबिक असल्यास तें त्या शिवून टाकूं लागल्या. इतक्यांत घड्याळांत बाराचे ठोके वाजले व गाडीच्या चाकाचा आवाज ऐकूं येऊं लागला.

बर्डसाहेब तेथें येऊन पत्नीला म्हणाले 'हं आटप, तिला लवकर जागी करून गाडीपाशीं घेऊन ये. आम्हांला ताबडतोब निघालेंच पाहिजे!'

मिसेस बर्डनीं घाईघाईनें ते सर्व जिन्नस एका लहानशा ट्रंकेंत भरले व कुलूप लावून ती ट्रंक गाडींत ठेवण्यासाठीं पतीजवळ दिली व त्या एलिझाकडे गेल्या. थोड्याच वेळांत त्यांनीं दिलेली टोपी, झगा व शाल परिधान करून व मुलाला घेऊन एलिझा निघाली. बर्डसाहेबांनीं तिला गाडींत बसविलें. गाडीच्या दारापर्यंत तिला पोंचविण्यासाठीं मिसेस बर्ड आल्या होत्या. त्यांचा निरोप घेण्यासाठीं तिचे ओठ हलूं लागले व तिनें एकदोनदां प्रयत्नहीं केला पण त्यांतून शब्द निघेना! तिनें आकाशाकडे आपल्या भरून आलेल्या डोळ्यांनीं पाहिलें. त्या वेळची तिची

दृष्टि अन्तःकरणावर कायमचा ठसा उमटविणारी होती! 'बाईसाहेब! कृतज्ञतेनें हृदय भरून आल्यामुळें माझ्या तोंडावाटें शब्द फुटत नाहीं! आपले आभार मी कोणत्या शब्दांनीं मानूं? परमेश्वर आपलें कल्याण करो!' असाच त्या दृष्टीचा अर्थ असेल काय? नंतर गाडीचें दार बंद होऊन व गाडी चालूं लागली.

देशभक्त बर्डसाहेबांची मनःस्थिति या वेळीं कशीं बरें झाली असेल? पळून जाणारे गुलाम, त्यांना मदत करणारे व त्यांचे बद्दल सहानुभूति दाखविणारे यांना कडक शासन करणारा कायदा करण्याचे कामीं नुकतेंच त्यांनीं कायदेमंडळाला उत्तेजन दिलें होतें. गुलामांचे दुर्दैवा-बद्दल त्यांची तरफदारी करणारांच्या दुर्बल मनोवृत्तीबद्दल त्यांना त्यांची कींव वाटली होती! परंतु पळून आलेल्या दुर्दैवी मातेच्या दुःस्थितीचें करुण दृश्य प्रत्यक्ष पाहून त्यांचें मन पालटलें व हा कायदा धाब्यावर बसवायला ते स्वतःच तयार झाले! या वेळच्या त्यांच्या वर्तनाबद्दल त्यांना कोणी सहृदय माणूस दोष देईल असें आम्हांस वाटत नाहीं.

तो रस्ता अत्यंत खडबडीत असून त्यावर मनस्वी चिखल झालेला होता. तशांत रात्रीची वेळ! आदळत आपटत एकदांची ती गाडी कशी बशी एका मोठया शेतांतील घरापुढें येऊन उभी राहिली. बराच वेळ हांका मारल्यानंतर घराचे मालक व्हॉन ट्रॅाप जागृत झाले व त्यांनीं दरवाजा उघडला. ते उतार वयाचे असून भले उंच व दणकट होते. त्यांचे अंगांत तांबडे लोंकरीचा शिकारी शर्ट होता. त्यांच्या केसांना जटांचें स्वरूप आलें असून दाढीही थोडी वाटलेली होती; यामुळें त्यांचा चेहरा गंभीर दिसत होता. त्यांची मागें केंटुकींत चांगली शेतीवाडी असून त्यांचेजवळ पुष्कळ गुलाम होते पण त्यांच्या थोर व ऋजु स्वभावाला गुलामगिरींतील कष्टमय जीवन पाहणें दिवसें दिवस असह्य होऊं लागलें. म्हणून आपल्या सर्व गुलामांना स्वातंत्र्य

देऊन त्यांच्यासह ते ओहिओ संस्थानांतील उपरिनिर्दिष्ट जागीं राहावयास आले होते.

आपलें हातांतील मेणबत्तीचे प्रकाशांत व्हॉन ट्रॅप थोडा वेळ आमचे प्रवाशांकडे विस्मयानें पहात उभे राहिले. बर्डसाहेबांनीं थोडक्यांत त्यांना आपला परिचय देऊन म्हटलें, 'या दुर्दैवी माय लेकरांना आपण आश्रय द्याल का ? त्यांचेमागें गुलामांचे पारधी लागलेले आहेत !'

'अलबत् ! खुशाल राहू देत तीं एथें ! कोणाचीही त्यांचे वाटेला जाण्याची छाती नाहीं. मी व माझीं वाघासारखीं सहा मुलं त्यांच्या रक्षणासाठीं सज्ज आहोंत !'

एलिझा श्रमानें अगदीं गळून गेलेलीं होती. आपल्या निद्रिस्त बालकाला घेऊन व्हॉन ट्रॅपचे मागोमाग ती घरांत गेली. तिला अशा स्थितींत पाहून त्यांना तिची दया आली व तिच्यासाठीं एका खोलींत हातरुणपांघरुणाची व्यवस्था करून ते म्हणाले, 'मुली ! कसलीही काळजी करूं नको बरें ! स्वस्थ ऐस. इथं कुणी आलाच तर त्याचा समाचार घ्यायला मी पूर्ण समर्थ आहे ! त्या पाहिल्यास कां बंदुका भरून तयार आहेत ! माझ्या मनाविरुद्ध इथून कांहीं नेणें फुकटची गोष्ट नाहीं ! लोकांनाहि हें चांगलं माहित आहे म्हणा ! म्हणून निश्चितपणें विश्रांति घे.' इतकें बोलून व खोलीचें दार लावून घेऊन ते बाहेर आले.

बर्डसाहेबांनीं त्यांना थोडक्यांत एलिझाच्या पूर्ववृत्तांत सांगितला. व्हॉन ट्रॅप लक्षपूर्वक ऐकत होते.

नंतर सकाळपर्यंत तेथेंच विश्रांति घेण्याबद्दल बर्डसाहेबांना व्हॉन ट्रॅपनीं विनंति केली. पण 'आपणास कोलंबसला जाण्याची घाई असल्यामुळें नाइलाज आहे' असें सांगून व एलिझाचे खर्चाकरितां

म्हणून दहा डॉलरची एक नोट त्यांना देऊन त्यांचा. निरोप घेऊन यांनीं दाखविलेल्या जवळच्या रस्त्यानें बर्डसाहेब क्यूजोसह कोलबसंकडे रवाना झाले.

---

## प्रकरण ११ वें.

### टॉमकाकाला नेलें.

ते दिवशीं सकाळपासूनच पावसाची बुरबुर सुरू असून टॉमकाकाचे झोपडींत सर्वत्र औदासीन्य पसरलें होतें. बिस्तवाजवळील लहानशा टेबलावर क्लो काकू धुऊन स्वच्छ केलेल्या टॉमच्या कपड्यांना काळजीपूर्वक इस्तरी करीत होती. मधूनमधून डोळ्यांतून येणारे अश्रु ती हातानें पुशीत होती. टॉम आपलें नव्या करारांचें पुस्तक उघडून बसला असून मुलें अद्याप उठलेलीं नव्हतीं.

टॉम अत्यंत सात्विक व मायाळू स्वभावाचा असल्यामुळें आपल्या मुलांना एकदां शेवटचें डोळे भरून पहावें म्हणून तो त्यांचे बिछान्याजवळ गेला.

'हें पाहणें बहुतकरून अखेरचेंच म्हणायेंचं!' टॉम उद्गारला.

क्लो काकू कांहीं बोलली नाहीं. टॉमचे कपड्यावरून ती जोराजोरानें इस्तरी फिरवीत होती. यामुळें ते ओबडधोबड कापडाचे कपडे लोण्यासारखे मऊ होऊन गेले! नंतर इस्त्री एका बाजूला ठेवून ती टेबलाजवळ बसली व स्फुंदून स्फुंदून रडूं लागली.

'बाईसाहेब म्हणतात कीं आपली एकदोन वर्षांत सुटका खचित करूं म्हणून. पण मला कांहीं त्याचा उपयोग होईलसें दिसत नाहीं! कारण दक्षिणेकडे गेलेला मनुष्य सहसा परत येत नाहीं. तिकडे

गुलामांना मेले छळून छळून मारतात ! अशा स्थितींत फिरून आपली भेट—'

'क्लो ! आतां आपणाला परमेश्वरावरच सर्वस्वीं भार ठेवला पाहिजे ! दीनांचें रक्षण करण्याचें त्याचें ब्रीद आहे. त्याच्या इच्छे-विरुद्ध झाडाचें पान देखील हालत नाहीं. त्याच्यावर माझा भरंवसा आहे. तो अनाथांचा नाथ खचित माझी उपेक्षा करणार नाहीं ! मला त्यांतल्या त्यांत एवढें समाधान वाटतें कीं धनीसाहेबांनीं मलाच तेवढं विकलं. तूं व मुलेंबाळें तरी इथं खुशाल आहांत !'

नवऱ्याला विकल्याबद्दल क्लो काकूला शेल्बींचा मनस्वी राग आला होता. त्यांच्यासंबंधीं ती अद्वातद्वा बोलूं लागलेली पाहून टॉम दु:खित स्वरानें म्हणाला, 'नको ग बोलूस असें ! माझ्यानें तें ऐकवत नाहीं ! निदान या शेवटच्या भेटीच्या वेळीं तरी माझें मन दुखवूं नकोस ! बाळपणापासून त्यांना मीं अंगाखांद्यावर खेळवलें असल्यामुळें त्यांच्या-संबंधीं कोणी यत्किंचित् वाकडें तिकडें बोललेलें मला खपत नाहीं! त्यांच्या थोर स्वभावाची तुला माहिती नाहीं. अगदीं जिवावर बेतल्या-शिवाय मला ते खास विकणार नाहींत ! शिवाय इतर धन्यांचे मानानें ते किती चांगले आहेत बरें !'

थोड्याच वेळांत जेवण तयार झालें. क्लोकाकूला ते दिवशीं सुट्टी मिळाली होती. तिनें टॉमला आवडणारे पदार्थ मुद्दामच तयार केले होते. मुलेंहि आतां उठलीं होतीं. सर्वांनीं मिळून जेवण केलें.

नंतर क्लोकाकू टॉमचें सामानाची बांधाबांध करूं लागली. टॉम आपले तान्हे मुलीला मांडीवर घेऊन खेळवत बसला होता. त्या अर्भकाला वस्तुस्थितीची काय कल्पना ? ती मोठ्या प्रेमानें त्याच्या मिशा ओढीत, त्याचे तोंडावर ओरखडे काढीत हंसत खिदळत होती !

याच वेळीं मिसेस शेल्बी तेथें आल्या. क्लो काकूनें घुसपुसत

त्यांना खुर्ची दिली. क्लो काकूकडे त्यांचें लक्ष होतें कोठें? त्या दुःखानें काळवंडलेल्या होत्या.

'टॉम! मी अशासाठीं आलें–' काय बोलते बिचारी! तो देखावा पाहून तिचें हृदय भरून आलें! हातरुमाल डोळ्याला लावून त्या ओक्साबोक्शीं रडूं लागल्या!

हें पाहून क्लो काकूचेंहि हृदय विरघळलें. ती म्हणाली, 'बाईसाहेब! काय करतां हें!'

तिलाही रडूं आवरेना! त्यांच्या त्या अश्रूंनीं अंतःकरणांतील खळबळ धुऊन गेली. अभागी जीवाच्या दुःखानें दुःखी होऊन डोळ्यावाटे निघणाऱ्या अश्रूच्या एका थेंबानें त्या दुःखी जीवाचें जें समाधान होतें त्याची सर दुसऱ्या कशालाही येणार नाहीं!

'टॉम! तुला खर्चाला कांहीं दिलें असतें पण त्याचा तुला स्वतःला कांहीं उपयोग व्हायचा नाहीं. तो मेला तुझ्याजवळून तें हिसकून घेईल! तुझें समाधान करायचा एकच मार्ग मला दिसतो आहे. मी सारखा तुझा तलास ठेवीन व अनुकूल वेळ येतांच तुला तांबडतोब सोडवून आणीन तोंपर्यंत देवावर भार ठेवून तूं धीरानें दिवस काढ. मिसेस शेल्बी म्हणाल्या.

इतक्यांत हेलेसाहेब येत असल्याचें टॉमच्या मुलानें सांगितलें व तात्काळ दारावर लत्ताप्रहार होऊन तें उघडलें गेलें. संतापानें हातपाय आपटीत हेले आंत आला! एलिझाला धरण्याचे कामीं यश न आल्यानें त्याची निराशा झाली होती व तो अगदीं कावला होता. त्यांतच भर म्हणून कीं काय रात्रभर घोड्यावरून त्याला रस्त्यानें रखडत पावें लागलें होतें.

'चलरे! अजून तयारी नाहीं का झाली?' हेले साहेब गुर-

गुरले. इतक्यांत मिसेस शेल्बीकडे नजर गेल्यामुळें टोपी काढून त्यानें त्यांना अभिवादन केलें.

क्लो काकूनें तत्काळ सर्व सामान पेटींत भरलें. ती पेटी खांद्यावर घेऊन टॉम हळू हळूं हेलेचे मागून चालला. मुलीला कडेवर घेऊन क्लो काकू त्याचेबरोबर निघाली व मुलें रडतरडत मागून येऊं लागलीं. मिसेस शेल्बी हेलेबरोबर बोलत पुढें चालल्या होत्या. टॉम तेथें सर्वांचा आवडता असल्यामुळें इतरहि लहानथोर मंडळींचा घोळका त्याला शेवटचा निरोप देण्यासाठीं दुःखित अन्तःकरणानें त्याचेभोंवतीं गोळा झाला.

हळूहळू ही सर्व मंडळी रस्त्यावर उभ्या असलेल्या गाडी-जवळ आली.

'हं गाडींत बैस'! हेलेसाहेब गर्जले !

टॉम गाडींत बसतांच हेलेनें भल्या जाडजूड बेड्या त्याचे पायांत ठोकल्या ! तें पाहून जमलेल्या सर्व मंडळींना अत्यंत वाईट वाटलें व चीड आली. मिसेस शेल्बी म्हणाल्या, 'मिस्तर हेले ! इतका प्रकार करण्याची गरज नव्हती !'

'बाईसाहेब ! आतांपर्यंत आपले कामांत मला पांचशें डॉलरची टोपी बसली तेवढी पुरे !'

'त्या मांगापासनें बाईसाहेबांना यापेक्षां चांगलें उत्तर कुठलें मिळायला ?' क्लो रागानें जळफळत म्हणाली. तिचीं दोन्ही मुलें बापाची ही स्थिति पाहून ओक्साबोक्शी रडत होती !

टॉमचा 'छोटा साहेब' जॉर्ज शेल्बी याला टॉमची विक्री झाल्याचें माहीत नव्हतें. आदले दिवशीं पहांटेच तो जवळच्या एका मळ्यांत आपले मित्राकडे दोन तीन दिवस राहण्यासाठीं म्हणून गेला होता. तो अजून परत आला नसल्यामुळें टॉमला त्याचे भेटीची चुटपुट

लागली. तो म्हणाला, ' छोटेसाहेबांची गांठ पडली असती तर बरें झालें असतें ! देवाची मर्जी ! त्यांना माझा सलाम सांगा ! '

हेलेचा चाबूक कडाडला व गाडी चालूं लागली. दुःखपूर्ण नजरेनें जमलेल्या मंडळीकडे व आपल्या जुन्या मालकाचे घराकडे टॉम पाहतों तोंच गाडीचे धक्कयानें तो आंत कोलमडला गेला !

हें दृश्य पाहणें टाळण्यासाठीं शेल्बी ते दिवशीं उजाडतांच कोठें निघून गेले होते !

कांहीं वेळानें वाटेंत एका लोहाराचे दुकानापुढें हेलेनें गाडी उभी केली व गाडींतील पेटींतून हातबेड्यांची जोडी काढून तो ती लोहाराकडे घेऊन गेला. ती लहान असल्यामुळें टॉमचे हाताला बसण्यासारखी नाहीं म्हणून जरा मोठी करून देण्याबद्दल त्यानें लोहाराला सांगितलें. लोहारानें टॉमला ओळखलें व त्याला त्याचे-बद्दल फार वाईट वाटलें.

टॉम खिन्नपणें बसला होता. इतक्यांत त्याला घोड्यांचे टापांचा आवाज ऐकूं आला. व तो वर मान करून पाहतो तों त्याचा छोटा-साहेब जॉर्ज शेल्बी ! घोड्यावरून तत्काळ उडी टाकून तो धांवतच टॉमजवळ आला व त्याचे गळ्याला मिठी मारून रडूं लागला !

' खरोखर हें किती अधमपणाचें कृत्य आहे ? मला हें मुळींच आवडलें नाहीं ! मी मोठा असतो तर टॉमकाका, तुला कधींही विकूं दिलें नसतें !' जॉर्ज रडत रडत म्हणाला.

' छोटेसाहेब ! आपली भेट झाली बरें झालें ! आतां मी सुखानं वाटेल तिकडे जाईन !'

टॉमच्या पायांतील बेड्या पाहून जॉर्जला मनस्वी चीड आली. तो रागानें म्हणाला, ' त्या बुढ्याच्या नीचपणाची मजल एथपर्यंत गेली अं ! थांब लेका ! तुला चांगलाच लंबा करतो !'

परंतु टॉमनें त्याचें निवारण केलें. जॉर्जनें एका डॉलरला भोंक पाडून व त्यांत दोरा घालून तो बरोबर आणला होता. टॉम नको नको म्हणत असतांही बळेंच त्यानें तो त्याचे गळ्यांत कॉलरचे आंत बांधला. टॉमला उघड रीतीनें पैसे देणें शक्य नव्हतें, कारण ते हेलेच्या मालकीचे झाले असते म्हणून जॉर्जनें हीं युक्ति योजिली. नंतर जॉर्ज म्हणाला, 'तुला सोडविण्यासाठीं मी लवकरच येतो कीं नाहीं पहा! या बाबतींत बाबांना भंडावल्यावांचून मी राहाणार नाहीं!'

टॉमनें त्याला आईबापांना पूज्य मानून सदैव त्यांची आज्ञा पाळण्याबद्दल व सद्वर्तनानें वागून जगांत भलेपणा मिळविण्याबद्दल थोडक्यांत उपदेश केला. तो आपल्या बालमित्राच्या अंतःकरणावर कोरला गेल्याचें पाहून त्याला समाधान वाटलें.

हेले हातबेड्या घेऊन तेथें आलेला पाहून जॉर्ज म्हणाला. 'मिस्तर! आपण टॉमकाकाशीं कसें वागत आहांत तें मी घरीं सांगितल्याशिवाय राहाणार नाहीं! जनावरांप्रमाणें माणसांचा क्रयविक्रय करावयाचा व त्यांना साखळदंड बांधायचे हा धंदा करायला माणसांना लाज कशी वाटत नाहीं कोण जाणें!'

'तुमच्यासारखे संभावीत लोक जोंपर्यंत माणसें विकत घ्यायला व विकायला तयार असतात तोंपर्यंत आमच्यासारख्या मध्यस्थांना या धंद्याची काय म्हणून लाज वाटावी? खरी लाज तुम्हांलाच वाटली पाहिजे!'

'मी मोठा झालों म्हणजे या दोन्हीपैकीं एकहि गोष्ट करणार नाहीं! केंटुक्कींत तरी असले प्रकार घडावेत हें मला मुळींच आवडत नाहीं!' इतकें बोलून जॉर्ज परत जाण्यासाठीं घोड्यावर बसला.

'बरें येतो आतां छोटेसाहेब! देव आपणांला सुखी राखो!'.

तो दिसेनासा होईपर्यंत टॉम तिकडे पहात होता. नंतर एक

उसासा सोडून तो स्वतःशीं म्हणाला, 'अरेरे! केंटुकींत असली नररत्नें फारच थोडीं आहेत!'

'हें बघ रे, आपल्या गुलामांशीं वाईट रीतीनें वागण्याची माझी मुळींच इच्छा नसते, पण त्यांनीं माझ्याशीं चांगल्या रीतीनें वागलें पाहिजे. दगलबाजी केल्यास मग मलाहि 'खटास महाखट' व्हावें लागतें! हें लक्षांत ठेव.' टॉमला हातबेडी दाखवीत हेले म्हणाला.

टॉमनें 'आपण चांगल्या प्रकारें वागूं, पळून जाण्याचा विचारहि मनांत आणणार नाहीं' असें हेलेला आश्वासन दिलें. हेलेनें ती बेडी तशीच परत ठेवून गाडी हांकली.

---

## प्रकरण १२ वें.

### गुलामगिरीतील जीवन!

टॉम व हेले एकाच गाडींत जवळजवळ बसले होते व दोघांचे पुढून एकाच प्रकारचा देखावा चालला होता तरी त्या दोघांच्या डोक्यांत चाललेल्या विचारांची दिशा किती भिन्न होती! हेलेचें व्यापारी डोकें टॉमची लांबी, रुंदी, उंची, त्याला खायला घालून चांगला धष्टपुष्ट केला तर त्याची किती किंमत येईल? या व आपण इतर व्यापाऱ्यांचे मानानें किती तरी दयाळूपणें आपण गुलामांशीं वागतों याची त्यांना दाद तरी असते कां या विचारांत गढलें होतें; तर 'आलिया भोगासीं असावें सादर। देवावरी भार घालुनिया!' अशा प्रकारचे विचार टॉमच्या मनांत घोळत होते. या वाक्यानें आजपर्यंत किती तरी दुःखी कष्टी जीवांचे मनाला विरंगुळा वाटून प्राप्त परिस्थितीला टक्कर द्यायला त्यांना समर्थ केलें आहे!

नंतर हेलेनें आपले खिशांतून वर्तमानपत्रांचें पुडकें बाहेर काढलें व त्यांतील जाहिरातींवरून तो नजर फिरवूं लागला. त्यांत त्याला कैंटुकींतील वाशिंग्टन गांवीं दुसरें दिवशीं कोर्टाचे आवारांत कांहीं गुलामांची जाहीर लिलांवानें विक्री व्हावयाची असल्याबद्दलची जाहिरात दिसली. जमल्यास हाही सौदा पटवून टॉमबरोबरच या लोकांना न्यूओरलिन्सकडे न्यावें असा त्यानें बेत केला व टॉमला तसें सांगून संध्याकाळचे सुमारास टॉमसह तो वाशिंगटन गांवीं आला. टॉमचा त्याला अद्याप विश्वास वाटत नव्हता म्हणून त्याला तेथील तुरुंगांत बंदोबस्तानें ठेवून हेलेची स्वारी गांवांतील एका खाणावळींत उतरली. टॉमसारख्या पापभीरु मनुष्याला गुन्हेगाराप्रमाणें तुरुंगांत बसणें आवडलें नाहीं, पण काय करतो बिचारा !

दुसरे दिवशीं सकाळीं अकरा वाजतां कोर्टाचे आवारांत लोकांची गर्दी जमली. ज्या दुर्दैवी स्त्रीपुरुषांचा लिलांव व्हावयाचा होता ते आपापसांत कुजबुजत आपल्या नशिबाची वाट पहात बसले होते. त्यांत एक साठ वर्षांची जख्खड म्हातारी असून तिचा एकुलता एक शेवटचा मुलगा तिजेजवळ बसला होता. हा पोऱ्या चेहऱ्यावरून मोठा चलाख दिसत होता. आपल्या मुलाचा व आपला वियोग होऊं नये म्हणून दोघांचा मिळून एक गट धरून लिलांव व्हावा अशी म्हातारीची इच्छा होती.

हेले गर्दीतून धक्काबुक्की करीत लिलांवाचे जागीं आला व 'माल' पाहण्यास त्यानें सुरुवात केली. त्यानें त्या लोकांची तोंडें खसदिशी उघडून त्यांचे दांत पाहिले, त्यांना आडवे तिडवे करून व उठाबशा काढायला लावून त्यांचे अवयवांच्या मजबूतपणाची खात्री करून घेतली. आपण गुरांचे बाजारांत खरेदीला गेलों म्हणजे अशीच परीक्षा

करतों नाहीं? त्यांतलाच वरील प्रकार होता व तो त्याकाळीं तेथें शिष्टसंमत होता!!

थोड्याच वेळांत लिलांव सुरू झाला. पुरुषांचा लिलांव प्रथम झाला. त्यांतील दोन हेलेनें पटकावले. नंतर म्हातारीचे मुलास पुकारलें त्यासरशीं तिनें दोघांचा मिळून एकदमच लिलांव करावा अशी विनंति केली, पण तिकडे कोण लक्ष देतो? तिचेपासून मुलाला खेचून नेत असतां तिनें जो आक्रोश केला त्यानें तेथील जिवंत पाषाणांना पाझर फुटला नाहीं! तिच्या मुलाला अतिशय वाईट वाटलें.

त्या मुलाची किंमत भराभर चढूं लागली. आमच्या हेलेसाहेबांनींच हाही 'माल' घेतला. म्हातारी हेलेचे हातांपायांपडून आपणांलाही घेण्याबद्दल त्याची परोपरीनें विनवणी करूं लागली, पण हेले 'माला'च्या किफायतशीरपणाकडेच जास्त लक्ष देत असल्यामुळें त्यानें तिला झिडकारून टाकलें व आपल्या नवीन खरेदीला साखळदंडानें जखडून तुरुंगाकडे चालविलें! बिचारी वृद्धा! धाय मोकलून रडूं लागली! दुसऱ्या एका गृहस्थानें तिला स्वस्तांत खरेदी केलें व आपणांबरोबर नेलें.

कांहीं दिवसांनीं हेलेनें आपला 'माल' ओहिओ नदींतून दक्षिणेकडे जाणाऱ्या लाबेल रिव्हिअर नांवाच्या सुंदर व भव्य बोटींत चढविला. वाटेंत ठिकठिकाणीं त्याचे अडत्यांनीं खरेदी केलेल्या गुलामांची या मालांत भर पडतच होती. या सर्व मंडळींना न्यू अरलिन्सला भरणाऱ्या गुलामांच्या बाजारांत नेण्याचा हेलेचा विचार होता.

बोटीचे दुसऱ्या मजल्यावर लहान थोर उतारू मंडळी मोठ्या आनंदानें हास्यविनोद करीत वेळ घालवीत होती; तर तळमजल्यावर हातपायांत बेड्या ठोकलेले हेलेसाहेबांचे अभागी गुलाम पडलेले होते! वरील मंडळींचे नेत्र हास्यविनोदानें उत्पन्न झालेल्या आनंदां-

श्रूंनीं भरून येत; तर तळमजल्यावरील दुर्दैवी गुलाम मंडळी आपल्या आप्तेष्टांचा वियोग झाल्यामुळें दुःखी होऊन एकमेकांच्या गळ्यांतगळां घालून मूकरोदन करीत होती ! कोण हा परिस्थितीचा दारुण विरोध!

दुसऱ्या मजल्यावरील मंडळींत काळा पोषाख घातलेले एक परान्न-पुष्ट पाद्रीबुवा असून मोठ्या गंभीर चेहऱ्यानें बायबलाचें आधारें गुलामगिरीचें त्यांनीं समर्थन चालविलें होतें ! ते म्हणाले, ‘ जेहेत्ते, आफ्रिकेंतल्या या काळ्या अदमींनीं गुलामगिरींतच रहावें अशींच मुळीं प्रभूची इच्छा आहे ! शास्त्रहि जेहेत्ते हेंच सांगतें !’

‘ अशी जर प्रभूची इच्छा आहे तर मग आतां प्रत्येकानें गुलाम विकत घेतलेच पाहिजेत म्हणायचे ! दिसला गुलाम कीं घे विकत कारण प्रभूची इच्छा ! पण काय हो पाद्रीबुवा ! ‘ तुझ्याशीं इतरांनीं जसें वागावें असें तुला वाटतें तसेंच तूंहि त्यांच्याशीं वागलं पाहिजे ’ असेंहि शास्त्रवचन आहे नाहीं ?’ श्रोत्यांपैकीं एकानें विचारलें.

पाद्रिबुवा गडबडले. इतक्यांत त्यांच्या सुदैवानें त्याच वेळीं बोट धक्क्याला लागली व मंडळींची चढण्याउतरण्याची घाई सुरू झाली.

अशा रीतीनें बोटीचा प्रवास सुरू असतां एके दिवशीं ती केंटु-कींतील लुइव्हिला बंदराचे अलीकडील मुक्कामावर थांबली. हेले कांहीं कामानिमित्त तेथें उतरला. तो परत आला तेव्हां त्याचेमागून छान-दार पोषाख केलेली एक निग्रो तरुणी आपले तान्ह्या मुलाला खांद्या-वर घेऊन आली व टॉम आदि मंडळी होती तेथें बसली.

या तरुणीचें नांव ल्यूसी असून ती जॉन फॉसडीक नांवाच्या गृहस्थाचे मालकीची होती. त्याचेकडे ती सैंपाकाचें काम करीत असे. तिचा नवरा लुइसव्हिले बंदरावरील एका इसमाकडे आचारी होता. जॉन फॉसडीकनें तिला गुपचुपपणें हेलेला विकून लुइसव्हि-लेला कांहीं कामानिमित्त पाठविण्याचे मिषाचें तिची हेलेबरोबर

रवानगी केली होती. ती दिसण्यांत चुणचुणीत, पाकशास्त्रांत निष्णात व तिचें मूलहि वयाचे मानानें मोठें चलाख असल्यामुळें हेलेनें तिला खरेदी केलें होतें. बोटीवर येतांच त्यानें तिला खरा प्रकार सांगितला; पण त्यावर तिचा विश्वास बसेना तेव्हां त्यानें प्रत्यक्ष खरेदीखतच इतर उतारूंकडून तिला वाचून दाखविलें. आपल्या मालकानें आपला विश्वासघात केल्याचें तिला कळून आलें व आतांपर्यंतची तिच्या मुखावरील टवटवी नाहींशी होऊन तें म्लान दिसूं लागलें !

बोटीवरील एका मनुष्याचे मनांत तिचें मूल भरलें व त्यानें हेलेला त्याबद्दल पंचेचाळीस डॉलर देऊन तें विकत घेतलें. बोट लुइसव्हिला बंदरावर येतांच गुपचुपपणें तें मूल नेण्याचें ठरलें. संध्याकाळीं बोट लुइसव्हिला बंदरावर आली. आपला नवरा कदाचित् कांहीं कामानिमित्त बंदरावर आला असल्यास त्याची अखेरची भेट झाली तर पहावी या उद्देशानें आपले मुलाला एका चादरींत गुंडाळून व कापसाचे गांठींतील पोकळींत सुरक्षित ठेवून ती बोटीचे कठड्याकडे गेली व वांकून बाहेर धक्क्यावरील मंडळीकडे पाहूं लागली. हेलेचे तिच्या हालचालीवर बारीक लक्ष होतेंच. त्यानें तत्काळ त्या गृहस्थास खूण करून तें मूल त्याचे ताब्यांत दिलें व तो तें घेऊन गर्दींत दिसेनासा झाला ! ल्यूसीला नवरा न दिसल्यामुळें तिची निराशा झाली व ती बोट सुटतांच परत आपले जागीं आली तों तेथें मूल नाहीं; हेलेसाहेब मात्र उभे असलेले ! हेलेनें तिला मुलाला विकल्याचें सांगून कांहीं औपचारिक शब्दांनीं तिचें समाधान चालविलें, पण अशानें अंतःकरणाला खोलवर झालेली जखम थोडीच भरून येणार ? अवघें दहा महिन्यांचें पोर ! आईची व त्याची ताटातूट करण्यांत आली ! ! गुलामांना कसली आई अन् कसला बाप ! जनावरांत आपण नातेंगोतें पाहतों का ?

ल्यूसी रडली नाहीं कीं ओरडली नाहीं. कारण रडण्यापलीकडचें तें दु:ख होतें! टॉमचे नजरेसमोरच हा सर्व प्रकार घडला. हेले जातांच तो रखडत रखडत (कारण त्याचे पायांत जाड बेड्या होत्या) ल्यूसीजवळ गेला व तिचें सांत्वन करण्यास त्यानें सुरवात केली. यावेळीं त्याचे नेत्रांतून अविरत अश्रुप्रवाह सुरू होता. त्याच्या तरी अंत:करण पिवळटून येणाऱ्या शब्दांनीं त्या अभागी मातेचें समाधान झालें असेल काय?

रात्रीं बोटीवरील सर्व मंडळी निद्रासुखांत निमग्न असतां टॉमला आपणाजवळून कांहीं काळसर पदार्थ बोटीचे कठड्याकडे हळूहळू ज़ात असल्याचा भास झाला म्हणून डोकें वर करून तो तिकडे पाहूं लागला. कठड्यावरून तो पदार्थ धप्कन् पाण्यांत पडला! ल्यूसीनें मुलाला शोधण्यासाठीं नदीचा तळ गांठला व अशा रीतीनें आपल्या तळमळणाऱ्या जीवाला जलसमाधी दिली!!

सकाळीं हेलेला ल्यूसी नाहींशी झाल्याचें दिसून येतांच त्यानें बोटीचा कानाकोपरा शोधला पण ती कुठली सांपडायला? देवाघरीं गेलेलें माणूस का परत दिसतें? शेवटीं कंटाळून तो टॉमजवळ आला. टॉमला खरा प्रकार माहीत असलाच पाहिजे अशी त्याची खात्री होती म्हणून त्यानें त्याला भीड घातली. तेव्हां टॉमनें त्याला माहीत होती, तेवढी हकीकत आपले नव्या धन्याला निवेदन केली. हेलेसाहेबांना वाईट वाटलें पण तें त्या दुर्दैवी मातेबद्दल नसून या खेपेला व्यापारांत आपणास ही दुसऱ्यांदा ठोकर बसली व असेंच चाललें तर आपल्या व्यापाराचें कसें होणार याबद्दल होय!!

मानवी सुखदु:खांची पर्वा न करतां बोट आपलें मार्गक्रमण करीत होती.

---

## प्रकरण १३ वें.

### जॉर्ज हॅरीस !

एलिझाचा नवरा जॉर्ज हॅरीस याचा आपण दुसरे प्रकरणांत निरोप घेतला होता. आतां त्याच्या पुढील हकीकतीकडे वळूं.

तो नाहींसा होतांच त्याचे मालकानें त्याचें वर्णन देऊन त्याला जिवंत धरून देणारास किंवा मेला असल्यास तशी आपली पुराव्यानिशीं खात्री करून देणारास चारशें डॉलरचें बक्षीस जाहीर केलें व संयुक्त संस्थानांतील सर्व गांवीं या मजकुराच्या नोटिसा वाटण्यांत आल्या.

जॉर्ज अत्यंत हुपार व धूर्त असल्यामुळें त्याला ही बातमी होतीच. आपणांस कोणी ओळखूं नये म्हणून त्यानें आक्रोडाचे सालीचा रंग लावून आपला मूळचा रंग पालटून टाकला व केंस काळे केले. अशा रीतीनें रूपांतर करून एक खोटेंच स्पॅनिश नांव धारण करून त्यानें मोठ्या थाटामाटानें प्रवास सुरू केला. आपणाबरोबर आपला नोकर म्हणून त्यानें जिम नांवाचा एक विश्वासू निग्रो छोकरा घेतला होता. अशा प्रकारें उघड रीतीनें मुद्दाम मोठमोठ्या लोकांत मिळूनामिसळून प्रवास करणें धाडसाचें होतें व उघडकीस आल्यास कुत्राहि आपले हाल खाणार नाहीं इतकी आपली दुर्दशा केली जाईल हें त्याला पक्कें माहीत होतें तथापि कांहीं झालें तरी कानडा गांठायचाच असा त्याचा निश्चय होता. त्याची आपले बुद्धिमत्तेवर विशेष भर होती व वेळप्रसंगीं तिनें दगा दिलाच तर आपलें संरक्षण करण्यासाठीं अगर आत्मघात करून घेण्यासाठीं दोन भरलेलीं पिस्तुलें व एक खंजीर त्यानें कोटाचे आंतील खिशांत सज्ज ठेवला होता.

याप्रमाणें प्रवास करीत असतां एके दिवशीं केंटुकींतील एका

गांवांतील हॉटेलांत तो गाडींतून आला व हाटेलांत जमलेल्या मंडळींना मोठ्या झोंकदाररीतीनें सलाम करून त्यानें हॉटेलवाल्याला आपणासाठीं एक स्वतंत्र खोली देण्याबद्दल फर्मावलें. तात्काळ त्याला एक छानदार खोली मिळाली.

हॉटेलांत जमलेल्या मंडळींत विल्सन नांवाचे वृद्ध गृहस्थ गप्पा गोष्टी करीत बसले होते. जॉर्ज हॅरीस मागें पोत्यांचे कारखान्यांत कामास होता व तेथें त्यानें ताग स्वच्छ करण्याचें एक यंत्र शोधून काढलें होतें व त्यामुळेंच त्याचे मालकाला राग येऊन त्यानें जॉर्जला कारखान्यांतून काढून नेलें हें वाचकांना माहीत आहेच. विल्सन हेच त्या कारखान्याचे मालक होत. त्यांचा जॉर्जवर फार लोभ असून त्यांनींच त्याला लिहिणें—वाचणें शिकवून तयार केलें होतें. यामुळें जॉर्जला त्यांचेबद्दल कृतज्ञता वाटे. जॉर्जनें त्यांना आपले खोलींत बोलावून आपली ओळख दिली व आपण कानडाला पळून जात असल्याचें सांगितलें. विल्सनसाहेबांना त्याचे धारिष्टाबद्दल आश्चर्य व भीति वाटली. त्याचा मालक जुलमी असून तो त्याला वाईट रीतीनें बागवतो हें त्यांना माहीत होतें, तथापि आपल्या देशांचे कायदे मोडून त्यानें मालकाचे घरून पळून जाणें त्यांना कसेसेंच वाटूं लागलें, तेव्हां जॉर्ज म्हणाला, 'साहेब! तुम्ही पाहिजे तर या देशाला आपला देश म्हणा, कारण तुम्हांला येथें सुखानें राहातां येतें, येथील कायदे तुमचें संरक्षण करतात म्हणून या देशाबद्दल तुम्हांला ' आपलेपणा ' वाटणें साहजिक आहे, पण आम्हां गुलामांना तसें काय म्हणून वाटावें ? इथं आम्हांला काडीची तरी स्वतंत्रता आहे काय ? आम्हांला देश नाहीं व धर्महि नाहीं ! आमचा देश म्हणजे थडगें ! तिथें बरीक आम्हांला सुखानें राहातां येतें ! तुमच्यासारखेच आम्ही मनुष्यप्राणी आहोंत, आम्हांला हातपाय, डोके इत्यादि सर्वच अवयव तुमच्या-

प्रमाणें आहेत. पण तुमच्या कायद्यांनीं आम्हांला गुलाम ठरवून बेजबाबदार व अरेराव लोकांनीं आमच्या जीवाचा हवातसा खेळखंडोबा करावा अशी त्यांना सत्ता दिली आहे ! हे कायदे करतांना आमची कधीं कोणी संमत्ती घेतली आहे ? या कायद्यांचा जर कांहीं उपयोग कुठे होत असेल तर तो आम्हांला चिरडण्याच्या व कायमचे नरकवासांत पिचत ठेवण्याचे कामीं! मनुष्यपणाला कलंक लावणारे असले कायदे करणाऱ्या देशाला आम्ही 'आमचा' देश म्हणावा काय ? नाहीं, केव्हांहि नाहीं ! तुमच्या या देशाजवळ माझें एवढेंच मागणें आहे कीं त्यानें निमूटपणें मला येथून जाऊं द्यावें.'

नंतर जॉर्जनें आपलें पूर्ववृत्त सांगितलें. तो म्हणाला, 'या केंटुकी संस्थानांतील एका थोर गृहस्थाचे पोटीं माझा जन्म झाला. मृत्युपूर्वी त्यानें आमची कांहीं एक व्यवस्था करून ठेवली नाहीं. त्याचे पश्चात् त्याचे कर्जफेडीसाठीं त्याचे इतर सामानाबरोबरच आम्हां सात भावंडांचा लिलांव झाला ! माझ्या आईच्या डोळ्यांदेखत माझीं सहा भावंडं एकामागून एक निरनिराळ्या लोकांना विकलीं गेलीं. मी सर्वांत लहान असल्यामुळें माझा वियोग तिला सहन होईना म्हणून मला विकत घ्यायला तयार झालेल्या गृहस्थापुढें गुडघे टेकून माझ्याबरोबर आपणालाही विकत घेण्याची तिनें विनंति केली, पण त्या निर्दयानें तिला बुटाचे ठोकरीनें उडवून दिलें व ती हंबरडे फोडीत असतांच मला आपले घोड्याच्या मानेला बांधून त्यानें घरीं नेलें ! ! कांहीं दिवसांनीं त्यानें माझ्या बहिणीला माझेजवळ आणून ठेवलें. आईला मी अंतरलोंच होतों. आतां माझ्या मायेचें माणूस म्हणजे माझी सुशील बहीण. पण तिच्या सहवासाचें सुख मला फार दिवस लाभलें नाहीं. त्याच्या नीच वासनेला बळी पडण्याचें तिनें नाकारल्यामुळें त्यानें चाबकानें तिला फोडून काढलें व साखळदंडानें जखडून

न्यू अरलिन्सला गुलामांचा तांडा घेऊन जाणाऱ्या व्यापाऱ्याला विकून टाकलें ! माझाहि त्यानें कमी छळ केला नाहीं. मरे मरे तों माझ्याकडून काम घेऊन तो माझ्या पोटालाहि पुरेसे देत नसे. जनावराच्या जिण्यानें मी त्याचेकडे दिवस काढीत होतों. आपल्या कारखान्यांत गेलेलीं माझीं सहा वर्षे काय तीं सुखाचीं गेलीं. तेथेंच आपल्या कृपा छत्राखालीं माझें शिक्षण झालें, लग्न झालें व मला मनुष्यपणाची जाणीव झाली. पुनः पूर्ववत् नरकवास माझें कपाळीं आला ! माझ्या प्रेमळ व सुशील पत्नीची व माझी ताटातूट करण्याचा त्यानें विचार चालविला. 'आतां तिच्याशिवाय जगांत कोण बरें दुसरें मायेचें माणूस मला राहिलें आहे ! तेव्हां आतां तुम्हीच सांगा अशा प्रकारें आमचा छळ करायला या लोकांना कोण समर्थ करतें ? तुमच्या या देशाचें कायदेच ना ? आणि हे कायदे आम्हीं पाळावेत व या देशाला ‘ आपला ’ देश म्हणावें असें तुमचें म्हणणें ? माझ्या स्थितींत तुम्ही असतां तर हे सगळे जुलूम व अत्याचार तुम्हीं खालच्या मानेनें सहन केले असतेत नाहीं ? ’

बिचारे विल्सन काय बोलणार ? जॉर्जचा शब्दन् शब्द खरा होता. ते उद्वेगानें म्हणाले, ‘ जळोत ते कायदे ! जा बरें बाळ, सुखानं जा ! तुझ्या बायकोची काय खबरबात ? ’

जॉर्जनें त्यांना शेल्बींनीं आपले मुलास विकल्यामुळें त्याला वांच-विण्यासाठीं त्याला घेऊन ती कोठें परांगदा झाल्याचें सांगितलें व तिनें नाताळची भेट म्हणून त्याला दिलेली पिन विलसनसाहेबांना देऊन आपली ही अखेरची आठवण म्हणून तिचेकडे पोंचती करण्या-बद्दल विनंति केली.

तो नको नको म्हणत असतांहि विल्सनसाहेबांनीं त्याला खर्चाला

कांहीं रक्कम दिली व ते गहिंवरून म्हणाले, 'जॉर्ज़ नीट काळजी घे बरें! त्यांच्या हातांत सांपडलास तर--!'

'त्याची नको काळजी! मला धरल्याचें तुमच्या कानावर पडलें तर मी मेलेलाच असलों पाहिजे असें आपण बेलाशक समजा!' असें म्हणून त्यानें कोटाचे आंतील पिस्तुलें व खंजीर त्यांना दाखविला.

तेथून ओहिओ नदीपार होऊन आपले कांहीं मित्रांचे साह्यानें ओहिओ संस्थानचे उत्तर सरहद्दीवरील लेक एरिकच्या मार्गानें कानडा गांठायचा आपला विचार असल्याचें जॉर्जनें विलसनला सांगितलें. त्यांनीं विषण्ण चित्तानें त्याचा निरोप घेतला.

पुढें थोड्याच दिवसांत जॉर्ज केंटुकीसंस्थानचे सरहद्दीवरील ओहिओ नदी उतरून ओहिओ संस्थानांत गेला.

---

## प्रकरण १४ वें.

## पुनर्मीलन.

व्हॉन ट्रॅंपच्या मळ्यांत कांहीं दिवस राहून नंतर एलिझा पुढें क्केकर पंथाचे लोकांची वस्ती असलेल्या एका खेडेगांवीं हॅलीडे नांवाच्या क्केकर कुटुंबांत राहावयास गेली. पळून येणाऱ्या पुष्कळ गुलामांना या गांवीं आश्रय मिळे. कारण क्केकर लोक हे परोपकारी व धर्मशील असत. ते एकमेकांना बरोबरीच्या दर्जाचे मानीत व बहु-मानदर्शक पदव्यांचा त्यांना इतका तिटकारा असे कीं एकमेकांशीं बोलतांना ते 'अहो, जाहो' असे बहुमानदर्शक शब्द न वापरतां 'अरे. तरे' शब्द वापरीत.

एलिझामध्यें आतां बराच फरक पडला होता. काळजीमुळें ती थोडी कृश व फिकट झाली असून पोक्त व गंभीर दिसूं लागली होती.

त्या दिवशीं ती सैंपाकघरांत विणकाम करीत बसली होती. जवळच तिचा मुलगा हॅरी आनंदानें बागडत होता व थोड्याच अंतरावर घरधनीण **राचेल हॉलिडे** ताटांत पीच फळें निवडीत बसल्या होत्या. राचेलबाई या उतार वयाच्या असून मायाळू व सात्त्विक वृत्तीच्या होत्या. त्यांच्या चेहऱ्यावरील पावित्र्याची छटा पाहणाराचे मनांत आदर उत्पन्न करी.

'अजून तुला कानडाला जावेसें वाटतेंच म्हणायचें ?' राचेलबाई एलिझाकडे पहात म्हणाल्या.

'होय बाईसाहेब मला गेलेंच पाहिजे. एथें राहून कसें चालणार?'

'मुली ! तिथें जाऊन तरी तूं पुढें काय करणार हो, कोणत्याहि गोष्टीचा आधीं विचार करणें बरें.'

राचेलबाईंच्या तोंडून आलेल्या 'मुली' या शब्दानें त्यांच्या अन्तःकरणांतील आईची वत्सलता पूर्णपणें व्यक्त होत होती.

एलिझाचे डोळे पाण्यानें भरून आले. ती उद्गारली, 'कांहीं तरी करीन झालें !'

'पण तिकडें जाण्याची एवढी घाई कां ? आमचे इथें वाटेल तितके दिवस सुखानें तुला राहातां येण्यासारखें आहे !'

'बाईसाहेब ! या माझ्या पोटच्या गोळ्याला निर्भयपणा प्राप्त होईपर्यंत मला इथें कसें चैन पडणार ? कालच रात्रीं मला एक वाईट स्वप्न पडलें. त्यांत माझ्यापासून माझ्या बाळाला हिसकून घेण्यासाठीं तो हेले इथें आलेला मला दिसला !' हें बोलत असतां एलिझाचे अंगावर कांटा आला.

'खुळी कुठली ? उगीच कांहीं तरी काळजी करीत बसते !

पळून इथं आलेल्या गुलामांपैकीं कुणालाही आजपर्यंत इथून धरून नेलें नाहीं.' राचेलबाई डोळ्यांतील अश्रु पुशीत म्हणाल्या. इतक्यांत दार उघडून त्यांचे यजमान सिमियन हॅलिडे तेथें आले. ते खूप उंच व सशक्त बांध्याचे दिसत होते.

'कांहीं नवल विशेष ?' राचेलबाईनीं त्यांना विचारलें.

"पीटर स्टेब्रिन्स म्हणाला कीं, आज रात्रीं कांहीं 'पाहुणे मंडळी' त्याचे बरोबर येथें यावयाची आहेत. (पळून येणारे गुलामांना क्केकर लोक 'पाहुणे मंडळी' या नांवानें संबोधीत असत) बोलतां बोलतां सिमीयन हॅलिडे एलिझाकडे पहात म्हणाले, "तूं आपलं आडनांव हॅरीस असेंच कायसें म्हणाली होतीस नाहीं ?"

'होय !' एलिझा भयभीतपणें उत्तरली; कारण आपणास पकडण्याकरितां जाहिराती लावलेल्या असाव्या म्हणून तर हे हा प्रश्न करीत नाहींत अशी तिला शंका आली.

सिमियननें राचेलबाईस एका बाजूस नेऊन एलिझाचा नवरा जॉर्ज हॅरीस आज येणाऱ्या पाहुणे मंडळींत आहे असें सांगितलें. तें ऐकून राचेलबाईंना आनंद झाला. त्या परत सैंपाकघरांत गेल्या व त्यांनीं एलिझाला आपले खोलींत बोलावून ही बातमी सांगितली.

'काय आज रात्रीं ! आज रात्रीं ! देवा, हें खरें असेल कां !' एलिझाला हर्षातिरेकानें मूर्च्छा आली. राचेलबाईनीं तिला आपले पलंगावर निजविलें. शुद्धिवर आली तेव्हां तिला बराच थकवा आला होता. म्हणून कांहीं वेळ तसेंच पडून राहण्याबद्दल तिला राचेलबाईनीं सांगितलें. एलिझाला आतां बराच निर्धास्तपणा वाटूं लागला. यामुळें पडल्यापडल्या तिचा डोळा लागला. शेल्बींचे घरून त्या काळ

रात्रीं मुलाला घेऊन निघाल्यापासून तिला आजच्यासारखी गाढ झोंप कधींच लागली नव्हती.

झोपेंत तिला एक स्वप्न पडलें. आपण गुलामगिरींतून स्वतंत्र झालों असून एका सुंदर प्रदेशांत असणाऱ्या आपल्या घरीं आहों, जवळच आपला मुलगा निर्भयपणें खेळतो आहे, इतक्यांत आपला नवरा हळूहळूं आपणाकडे येत आहे, तो जवळ आला व आपले गळ्याभोंवतीं हात टाकून अश्रूंनीं आपणास न्हाऊं घालीत आहे—असें स्वप्न पाहून ती एकदम जागी झाली तों काय आश्चर्य सांगावें? खरोखरीच जॉर्ज हॅरीस तिचे उशाशीं बसून आनंदाश्रुमोचन करीत होता!

ते दिवशीं आपले मित्रांचे साह्यानें जॉर्ज हॅरीस त्या गांवीं आला होता. एलिझा तेथें असल्याची खबर त्याला लागली व अशारीतीनें अनेक हालअपेष्टा सोसलेल्या या प्रेमी जीवांचीं पुन्हां भेट झाली!

दुसरे दिवशीं हॅलिडे कुटुंबांत या पाहुणेमंडळींना मेजवानी होती यामुळें घरची व बाहेरची लहान थोर मंडळी मोठ्या आनंदानें मेजवानीचे तयारींत गुंतली होती.

जेवणाची वेळ होतांच सर्वमंडळी एकत्र जमली. गोऱ्या लोकांचे कुटुंबांत बरोबरीचें नात्यानें बसून जेवण्याचा जॉर्जला हा पहिलाच प्रसंग असल्यामुळें तो थोडा गोंधळला पण इतर मंडळींचा मनमोकळेपणा पाहून त्याचा संकोच हळहळूं दूर होत गेला.

जेवतांना सिमीयन हॅलीडे व त्यांचा मुलगा यांचें जें बोलणें झालें त्यावरून सिमीयनसाहेब हे कमालीचे निःपक्षपाती असून आपले दाराशीं येणाऱ्या गुलामाप्रमाणेंच त्यांच्या मालकालाहि शक्य ती मदत करायला ते तयार असल्याचें जॉर्जला दिसून आलें व आपले सुरक्षितपणाबद्दल त्याला चिंता वाटूं लागली. तो म्हणाला, 'आमच्यासाठीं आपणाला निष्कारण तकलीफ पडते याबद्दल मला वाईट वाटतं!'

'जाऊं दे रे ! परोपकारासाठींच तर देवानें आम्हांला जन्माला घातलें आहे ! यांत कसली तकलीफ ? असल्या गोष्टी माझ्या कधीं मनांतहि येत नाहींत ! आतां दिवसभर तूं स्वस्थ विश्रांति घे. रात्रीं दहा वाजतां माझा मित्र फिनस फ्रेचर तुला व तुझ्या मंडळींना पुढल्या मुक्कामावर घेऊन जाण्यासाठीं निघेल' सिमीयन हॅलीडे म्हणाले.

'मग उगीच रात्रीं दहापर्यंत तरी कशाला थांबायचें ? आतांच निघाले तर ?' जॉर्जनें विचारलें.

'कारण दिवसापेक्षां रात्रींच निघणें सुरक्षितपणाच्या दृष्टीनें चांगलें. तुमच्या मागावर सर्वत्र शत्रू आहेत. इथें तुम्हांला दिवसां कांहीं भीति नाहीं.'

---

## प्रकरण १५ वें.

## वाटेंत.

ते दिवशीं दुपारपासून रात्रीं जाणाऱ्या पाहुण्यांच्या उपयोगी वस्तूंची बांधाबांध करण्यांत राचेलबाई गढून गेल्या होत्या. जॉर्ज व एलिझा हीं एका खोलींत बोलत बसलीं होतीं. दोघेही चिंतातुर दिसत होतें.

जॉर्ज म्हणाला, ' आपलीं बायका-मुलें हीं सर्वस्वीं आपलीं आहेत, आपणापासून त्यांना कोणीही जबरदस्तीनें नेऊं शकणार नाहीं हा नुसता विचारसुद्धां मनुष्याला किती सुखदायक वाटतो याची ह्या लोकांना कल्पना नसेल ! मला दुसरें तिसरें कांहीं नको, मला यांनीं स्वातंत्र्य द्यावें म्हणजे पुरे. माझे हातपाय धट्टेकट्टे आहेत, मी हवें तसें काम करून पैसे मिळवीन व ते तुमच्या मालकाकडे पाठवून तुमची सुटका करीन. माझ्या धन्याचें मात्र मी कांहीं एक देणें लागत नाहीं कारण

माझ्यासाठीं त्याच्या खर्च झालेल्या पैशाची मीं काम करून सव्याज फेड केली आहे.'

इतक्यांत खोलीचा दरवाजा उघडून सिमियन हॅलीडे व त्यांचा मित्र फिनिअस फ्लेचर आंत आले. फिनिअस हा उंच, काटकोळा पण महाधूर्त दिसत होता.

'फिनिअसनें एक फारच महत्त्वाची बातमी आणली आहे' सिमियन हॅलिडे म्हणाले.

फिनियस सांगूं लागला, 'गेल्या रात्रीं मी मागील मुक्कामीं रात्रीं एका लहानशा खानावळींत उतरलों होतों. अतिशय थकल्यामुळें जेवण करून तेथेंच कोपऱ्यांत धान्याचीं पोतीं ठेवलेलीं होतीं त्यांवर मी कसाबसा पसरलों. कांही वेळानें मी जागा झालों तों कांहीं माणसांचें बोलणें मला ऐकूं येऊं लागलें. त्यांच्या भाषणांत क्वेकर वसाहत, जॉर्ज हॅरीस वगैरे शब्द येऊं लागल्यामुळें मीं नीट कान देऊन ऐकूं लागलों. जॉर्ज हॅरीस, एलिझा हॅरीस व त्यांचा मुलगा हॅरी, जॉर्ज बरोबरचा निग्रो छोकरा जिम व त्याची म्हातारी यांना पकडण्याचा त्यांचा बेत चालला होता. जॉर्ज, हॅरी, व जिम व त्याची म्हातारी यांना परत मालकाकडे पाठवून ते एलिझाला न्यू अरलिन्सला नेऊन विकणार आहेत. दोन पोलीस शिपाई बरोबर घेऊन ते आम्ही जाणार त्याच रस्त्यानें येणार आहेत. तीं बहुधा ७।८ मंडळी आमच्या मागोमाग येतीलसें दिसतें. मग कसें काय ?'

जॉर्जनें आपलीं पिस्तुलें काढलीं व तो बेपर्वाईनें म्हणाला, 'कांहीं हरकत नाहीं. येऊं देत. त्यांनीं तसा प्रसंगच आणला तर माझी तयारी आहे ! माझी बहीण त्यांनीं न्यूअरलिन्सला कशासाठीं नेऊन विकली तें मला पुरतें माहीत आहे ! देवानें मला चांगले मजबूत हात दिले असतांना माझ्या बायकोला त्यांनीं ओढून न्यूअरलिन्सला

नेऊन विकावें व तिच्या जन्माचें वाटोळें करावें हें मी निमूटपणें पाहीन होय ? नाहीं, केव्हांही नाहीं ! मी जिवंत असे तों त्यांना माझ्या बायको-पोराला हात लावूं देणार नाहीं ! माझ्या मुडद्यावरून चालत येऊनच त्यांना हें काम करावें लागेल ! मला वाटतें आतां आपण लवकर निघावें हें बरें ! '

' मी तेथून पहांटे चारलाच इकडे येण्यासाठीं निघालों व ते जरी ठरविलेल्या वेळीं तेथून निघाले असले तरी अजून पुष्कळ मागें असले पाहिजेत. रात्र पडेपर्यंत आपण येथून निघणें बरें नव्हे. कारण वाटेंत इथल्या कांहीं खट्याळ लोकांशीं उगीच हुजत घालत बसावी लागून निष्कारण विलंब व्हायचा, म्हणून आणखी दोन तासांनीं सर्वत्र सामसूम होऊन काळोख पडला म्हणजे आपण निघूं. माझा मित्र मायकेल क्रॉस याचें तट्टू मोठें चपळ आहे. त्याला मी मागोमाग आमच्या गाडीच्या रस्त्यावर ठेवतों व तो शत्रूची चाहूल लागतांच त्वरित येऊन आपणांस बातमी देईल. त्यांनीं कितीही घाई केली तरी आपण त्यांच्या आधीं निघत आहोंत. तुम्ही आतां झटपट जेवणें आटपून तयार रहा. '

फिनिअस फ्लेचरचें हें भाषण ऐकून सिमियन हॅलिडे म्हणाले, ' फिनिअसची ही योजना किती छान आहे ! आमचा फिनिअस तसाच हुषार आहे मुळीं ! जॉर्ज ! तूं सर्वस्वी त्याच्या तंत्रानें वाग. पाहा तर खरें तो तुम्हां मंडळींना कसा सुरक्षित नेतों तें ! '

' आमच्यासाठीं तुम्हांला हा निष्कारण त्रास होतो आहे—

जॉर्जला पुढें बोलूं न देतांच सिमियन हॅलीडे म्हणतात, ' पुनः तेंच ! माफ कर बुवा ! मघाशीं तुला मीं सांगितलेंना कीं, हें सारें आम्हीं आमचें कर्तव्य म्हणून करतों, यांत त्रासबिस कांहीं नाहीं !

नंतर सर्व मंडळीचीं जेवणें होतांच निघण्याची तयारी झाली

एक मोठी गाडी दाराशीं येऊन उभी राहिली. फिनिअस फ्लेचरकडे कोचमनचें काम होतें. त्यानें सर्व मंडळींना गाडींत व्यवस्थितपणें बसविलें. त्यावेळीं आकाश निरभ्र असून स्वच्छ चांदणें पडलें होतें.

'जिम, तुझीं पिस्तुलं तयार आहेत ना? आपल्या पाठीवर शत्रू आहेत. ते पकडायला आले तर तूं काय करशील?'

'वाटेल तें करीन! माझ्या आईला व मला पकडायची गोष्टच बोलूं नका!'

जिम हा निग्रो छोकरा व त्याची म्हातारी आई गुलाम असून जॉर्जबरोबर पळून आलेली होती.

सर्व मंडळींचा निरोप घेऊन जॉर्ज, एलिझा, हॅरी, जिम व त्याची म्हातारी आई गाडींत बसलीं व फिनिअसनें गाडी हाकली.

तो रस्ता चढउताराचा व खराब असून त्यावर बर्फ पडलेलें होतें; यामुळें गाडी खडबडत व आदळत आपटत चालली होती. गाडींतील सर्वमंडळी स्तब्ध होती. कांहीं वेळानें छोटा हॅरी एलिझाचे मांडीवर झोपीं गेला. जिमची म्हातारी व एलिझा यांनाही डुलक्या येऊं लागल्या. जॉर्ज व जिम जागरूकतेनें इकडे तिकडे पहात होते, तर फिनिअस एका लावणीवजा गाण्याची शीळ घालीत घोडे जोरानें हांकीत होता.

रात्रीं तीन वाजण्याचे सुमारास जॉर्जला घोड्यांच्या टापांचा आवाज ऐकूं आला. त्यानें फिनिअसला सूचना करतांच त्यानें गाडी थांबवून मागें वळून पाहिलें तों त्याचा स्नेही मायकेल क्रॉस मोठ्या वेगानें आपले तट्टू दामटीत येत असलेला त्यास दिसला. तो गाडीजवळ येतांच जॉर्ज व जिम एकदम उडी टाकून खालीं आले व एलिझा व जिमची म्हातारी सावध होऊन उत्सुकतेनें मायकेलकडे पाहूं लागल्या.

धांपा टाकीत मायकेल म्हणाला,' ते मागोमाग दौडत येत आहेत.

चांगले आठ दहाजण असून बेटे दारू पिऊन अगदीं तर्र झालेले आहेत ! '

वाऱ्याच्या झुळुकीनें दूरवर घोड्यांच्या टापांचा आवाज त्यांना ऐकूं येऊं लागला.

फिनिअस जॉर्ज व जिमकडे पहात म्हणाला 'हं ! आधीं गाडींत बसा. त्यांच्याशी सामना द्यायला पुढें चांगली जागा आहे तिथें आपणाला झटपट गेलें पाहिजे. मायकेल, तूं गाडी मागोमाग रहा. व आम्ही पुढें गाडींतून उतरतांच तूं आपलें तट्टू गाडीला बांधून गाडी अमळ पुढें ने.'

जॉर्ज व जिम परत गाडींत बसतांच फिनिअसनें जोरानें घोडे पिटाळले. मागील घोड्यांच्या टापांचा आवाज जवळजवळ ऐकूं येऊं लागला. बायकामंडळी चिंतातुरपणें मागें पाहूं लागली. त्यावेळीं पहांट होत आली होती व त्या अंधुक प्रकाशांत त्यांच्या शत्रूंनीं आपली शिकार सांपडल्याबद्दल आनंदानें ठोकलेली आरोळी त्यांचे कानीं पडली. एलिझानें भयभीतपणें हॅरीला आपलें छातीशीं धरलें व जिमची आई भराभर देवाला नवस करूं लागली. जॉर्ज व जिम आपापलीं पिस्तुलें सरसावून तयार होते.

गाडीनें एक वळण घेतलें व ती थांबली. तेथून थोड्या अंतरावर लहानमोठ्या खडकांची रांग लागत असून त्यांतील एक खडक तर खूप उंच व एखाद्या किल्ल्याचे तटबंदीसारखा होता. त्या खडकाकडे जाण्याचा मार्ग अगदीं चिंचोळा—सरासरी एक मनुष्य एकावेळीं जाऊं शकेल इतका अरुंद असून मध्यंतरी एक मोठें भगदाड होतें. जॉर्ज व त्याचेबरोबरीची मंडळी त्या मोठ्या खडकामागें येऊन लपून बसली. इतक्यांत त्यांचे शत्रू खडकाचे पायथ्याशीं आलेच. हे लोक म्हणजे ओहिओ नदीकांठच्या खानावळींत हेलेशीं करार मदार करणारे गुला-

यांचे पारधी टॉम लॉकर व त्याचा भागीदार मार्क्स हे होत. त्यांचे-बरोबर दोन सरकारी शिपाई व खानावळींत दारू पाजून मदतीस घेतलेले तेथलेच दोन गुंड अशी आठ मंडळी होती. टॉम लॉकर सर्वांच्या अग्रभागीं असून त्याचे मागोमाग ते सर्वजण खडकाकडे येऊं लागले.

जॉर्जनें खडकावर उभें राहून विचारलें, 'तुम्हांला काय पाहिजे?'

'आम्ही पळपुट्या गुलामांना पकडण्याकरितां आलों आहों. जॉर्ज हॅरीस, त्याची बायको व मुलगा व जिम नांवाचा निग्रो पोरटा व त्याची बुढ्ढी यांना आम्हांला पकडायचें आहे. हे आमचेबरोबर सरकारी शिपाई असून पकड वारंटहि आहे. पण कायरे, तूं तो जॉर्ज हॅरीस तर नाहींस, टॉम लॉकर उत्तरला.

'होय, मीच जॉर्ज हॅरीस व इतरहि तुम्हांलाहि पाहिजेत ती मंडळी इथेंच आहेत. आमच्याजवळ हत्यारें असून आम्ही शेंवटपर्यंत लढणार आहों. हीं पिस्तुलें पाहिलींत? ज्याची छाती असेल त्यानें आम्हांला पकडायला पुढें यावें!'

हें ऐकतांच एक शिपाईबुवा पुढें येऊन म्हणाले, 'अरे, हें पहा उगीच कटकट लावूं नको. आम्ही सरकारी शिपाई असून कायद्या-प्रमाणें तुला धरायला आलों आहों. सरकारी मनुष्य कायद्याची अंमलबजावणी करीत असतांना त्याला अडथळा करणें फार वाईट! कायद्याला केव्हांही तुला मान वांकवलीच पाहिजे! निमूटपणें आमच्या-स्वाधीन हो कसा!'

'कायदा तुमच्या बाजूला आहे हें मला कबूल आहे! माझ्या बायकोला न्यूअरलिन्सला नेऊन तुम्ही विकणार व माझ्या पोराला त्या व्यापाऱ्याच्या दावणीला वांसराप्रमाणें बांधणार; जिमच्या या वृद्ध मातेला तिच्या क्रूर धन्याकडे फटके खाण्यासाठीं पाठविणार व मला व बिचाऱ्या

जिमला, आमच्या धन्याकडे रवाना करून आमच्या पाठीचीं चामडीं लोळवणार ! हीं सगळीं सत्कृत्यें तुम्ही कायद्याच्या नांवाखालीं करणार अं ? धिक्कार असो असल्या कायद्याला ! तुमचा हा कायदा व तो करणारा देश यांना आम्ही साफ ओळखत नाहीं ! ! काय तुम्हांला करायचें असेल तें करा ! स्वातंत्र्यासाठीं आपल्या प्राणाहुति द्यायला आम्ही तयार आहों !

जॉर्जचें हें आवेशपूर्ण भाषण ऐकून टॉम आदीकरून मंडळी क्षणभर तटस्थ झाली. इतक्यांत मार्क्सनें आपलें पिस्तूल जॉर्जचे रोखानें झाडलें तो म्हणाला, 'ह्या जॉर्जला जिवंत अगर मेलेला कसाही धरून दिला तरी बक्षीशी मिळणारच आहे मग उगीच कटकट कशाला ?'

जॉर्ज सावध होताच. त्यानें मार्क्सची गोळी चुकविली. तथापि ती त्याचे डोक्याचे केसास चाटून गेली. एलिझानें तें पाहून घाबरून किंकाळी फोडली ! जॉर्ज म्हणाला 'हरकत नाहीं, तुमच्याकडून सुरवात झालीच आहे. जिम तयार रहा ! जो पहिल्यांदा पुढें येईल त्याचा मी समाचार घेतों. मागून येणाराला तूं अस्मान-स्वर्ग दाखव !'

खालील मंडळी क्षणभर विचार करीत उभी होती. इतक्यांत टॉम म्हणाला, 'चलारे माझ्या मागोमाग या. मीं असले कैक गुलाम बघितले आहेत !'

तो पुढें पुढें येऊं लागला. जॉर्जनें त्याचेवर नेम धरून पिस्तुल झाडलें. गोळी त्याच्या बगलेंत शिरली तरी तो पुढें येतच होता. तो त्या भगदाडाजवळ येतांच फिनीअस फ्लेचर पुढें आला व त्यानें त्याला भगदाडांत ढकललें. मग काय विचारतां ? टॉमची स्वारी कोलमडत खोल काट्याकुट्यांत जाऊन पडली. सर्वांग ठेचून निघाल्यामुळें तो मोठमोठ्यानें इवळूं लागला !

हें पाहतांच मार्क्सनें मागच्यामागें पळ काढला व त्या दोन गुंडा-

नींही त्याचेंच अनुकरण केलें. शिपायांनीं टॉमला कसाबसा बाहेर काढून त्याच्या घोड्यापर्यंत नेलें पण घोड्यावर बसण्याइतकी ताकद त्याच्यांत होती कोठें? तो पुनः धाडकन् खालीं पडला. शिपाई त्याला तसाच खालीं टाकून पळून गेले!

आपले शत्रूंनीं पळ काढतांच जॉर्ज आदीकरून मंडळी खाली आली. त्यांना टॉमची दया येऊन त्यांनीं त्याच्या जखमा बांधल्या व त्याला गाडींत घालून आपलेबरोबर पुढील मुक्कामीं नेलें. तेथें डोरकस नांवाच्या सेविकेकडे त्याच्या शुश्रूषेचें काम सोपवून ते सर्वजण दुसऱ्या एका घरीं उतरले. लवकरच तेथें त्यांच्या न्याहारीची सोय झाली.

---

## प्रकरण १६ वें.

### स्वातंत्र्य!

डोरकसबाईनें टॉमलॉकरची शुश्रूषा फारच काळजीपूर्वक चालविली. ती केकर पंथाची असून नर्सिंगचे कामांत वाकबगार होती. यामुळें टॉमलॉकरला लौकरच आराम पडला. तिच्या सदुपदेशानें व मायाळू वर्तनानें त्याच्या वृत्तींत पालट होत चालला. एक दिवस त्यानें जॉर्ज हॅरीस व त्याचे बरोबरची मंडळी यांचेबद्दल डोरकसबाईजवळ चौकशी केली व ते सर्व तेथेंच असल्याचें त्यास कळतांच तो म्हणाला, ‘ त्यांचे मागावर आमचे एजंट असून त्यांचें वर्णन सँडुस्कीला केव्हांच पोचलेलें आहे. तेथूनच एरी सरोवरांतून कॅनडा देशाकडे बोट निघते. मार्क्स व आमची इतर मंडळी तेथें बोटीवर या लोकांचा कसून तपास केल्याशिवाय राहणार नाहींत. कारण सँडुस्की हेंच त्यांना पकडण्याचें शेवटचें ठिकाण होय. येथून ते गेले

कीं गेलेच ! म्हणून म्हणतें कीं त्यांना वेषांतर करून विभक्तपणें शक्य तों लौकर जायला सांगा. ते पकडले जावेत अशी माझी आतां इच्छा नाहीं. या युक्तीनें त्यांना आमचे लोकांचे हातावर सहज तुरी देऊन जातां येईल ! '

टॉम लॉकरचा हा निरोप डोरकसबाईनें जॉर्ज हॅरीसकडे पोंचविला. टॉम लॉकर पुढें चांगला बरा झाल्यावर गुलाम पकडण्याचा आपला नीच धंदा सोडून देऊन ओहिओ संस्थानांतीलच नवीन वसाहतीपैकीं एका भागांत राहून त्यानें तेथील लोकांना उपद्रव देणाऱ्या रानटी पशूंची शिकार करण्याचें काम पत्करलें व आपलें राहिलेलें आयुष्य चांगल्या रीतीने घालविलें. आतां त्याला केकर लोकांबद्दल अत्यंत आदर वाटूं लागला.

टॉम लॉकरचे उपदेशाप्रमाणें विभक्तपणें व वेषांतर करून जाण्याचें जॉर्ज हॅरीसनें ठरविलें. त्याप्रमाणें जिम व त्याची आई यांची पुढें रवानगी झाली व एक दोन दिवसांनीं जॉर्ज, एलिझा व हॅरी गुप्तपणें सँडुस्को गांवीं येऊन आपले स्नेह्यांचे घरीं उतरले.

एलिझानें पुरुषाचा वेष परिधान केला होता व हातांत कात्री घेऊन व आरशासमोर उभी राहून ती आपले केस कातरीत होती. स्वातंत्र्याच्या सुखमय विचारांत तल्लीन झालेला जॉर्ज जवळच बसला होता.

' मी आतां सुरेख दिसतें नाहीं ? ' एलिझानें जॉर्जकडे पहात हंसत हंसत विचारलें.

' तूं मुळांतच देखणी आहेस ! ' जॉर्ज गंभीरपणें म्हणाला.

परंतु त्याचा गंभीरपणा एलिझाला आवडला नाहीं. ती म्हणाली, ' इतका विचार कसला चालला आहे ? कॅनडाला पोंचायला आतां फक्त चोवीस तासांचाच अवधी आहे म्हणें !

' होय, तुझें म्हणणें खरें आहे, पण मोझे नशीब मोठें शिकंदर आहे ना? आयत्या वेळीं तें नेमकें गोता देतें! म्हणून मला जरा काळजी वाटत आहे.' जॉर्जनें उत्तर दिलें.

' आतां काळजी करायचें कांहीं कारण नाहीं. कारण आमचें कांहीं बरें वाईट व्हायचें असतें तर देवानं आम्हांला इथवर आणलेंच नसतें! तो आपला पाठिराखा आहे.'

' तुझ्या तोंडांत साखर पडो! खरंच देवा असं होईल कां? आमच्या कपाळाचा हा वनवास संपून आम्हीं स्वतंत्र होऊं का?'

' खात्रीनं तसें होणार! आजच्या आज आम्ही गुलामगिरींतून मुक्त होणार अशी माझी मनोदेवता मला सांगत आहे!' हें बोलत असतां एलिझाचे नेत्रांत आनंदाश्रु आले.

'एलिझा! तुझ्या बोलण्यावर माझा विश्वास आहे. तूं म्हणतेस तसेंच घडो! जॉर्ज तिचेकडे पहात म्हणाला.

दरवाजा उघडून एक कुलीन व मध्यम वयाची स्त्री मुलीचा पोषाख घातलेल्या हॅरीसह तेथें आली. या स्त्रीचें नांव मिसेस स्मिथ असून ती कॅनडांत रहात असे. जॉर्ज व एलिझा यांचेबरोबर छोट्या हॅरीची मावशी बनून ती कॅनडाला परत निघाली होती. आपल्या शत्रूंना फसविण्यासाठींच जॉर्जनेंही युक्ति केली होती. हॅरीला गेले दोन दिवस तिनें सारखा आपणाजवळ ठेवून घेतला होता व त्याला वरचेवर खाऊ देऊन व चिऊकाऊच्या गोष्टी सांगून तिनें त्याला आपला लळा लावला होता.

हॅरीला मुलीचे वेषांत पाहून एलिझा विनोदानें म्हणाली, 'अरे वा! किती तरी सुरेख मुलगी दिसते ही! हिचें नांव काय बरें? हं, आपण आपले हिला हॅरिअट म्हणूं! हें नांवसुद्धां किती गोड आहे!'

आपल्या आईचा तो विचित्र पोषाख पाहून हॅरी गोंधळून गेला

होता. त्याला आपणाकडे ओढीत एलिझा म्हणाला, ‘कायरे गुलामा, तुला आपले आईची ओळख पटते का ?

हॅरी एलिझाला बिलगला. तें पाहून मिसेस स्मिथ म्हणाली, एलिझा ! त्यानें आतां तुझ्यापासून दूरच असलें पाहिजे. त्याला असं कुरवाळीत जाऊं नको ! नाहींतर सगळेंच बंड बाहेर पडायचं !’

‘अरेच्या ! विसरलेंच कीं ! त्याचा वियोग मला सोसवत नाहीं हो ! बरें, पुनः मी नाहीं असें करणार हं ! सावधगिरीनें वागेन ’ एलिझा थोडी ओशाळून म्हणाली. नंतर तिनें नवऱ्याकडून ओव्हर-कोट घालायची माहिती घेऊन त्याप्रमाणें तो घातला.

अशा रीतीनें सर्व तयारी होतांच ते सर्व जण गाडींतून बंदरा-वरील धक्क्यावर आले. जॉर्ज हॅरीस, त्याचे बरोबरचा दुसरा तरुण गृहस्थ ( अर्थात् एलिझा ), मिसेस स्मिथ व मुलगी हॅरिअट फळी-वरून बोटींत चढली. मिसेस स्मिथचा हात धरून एलिझा मोठ्या ऐटीनें चालली होती व जॉर्जनें सामान बरोबर घेतलें होतें !

जॉर्ज बोटीचे कप्तानाचे ऑफीसजवळ उभा असतां दोन मनु-ष्यांचें संभाषण त्याला ऐकूं आलें.

‘ मीं बोटीवर येणारा प्रत्येक उतारू पाहिला. मला वाटतं ते बोटीवर अद्याप आले नसावे. ’

हें बोलणारा मनुष्य बोटीवरील कारकून असून तो ज्याला उद्देशून बोलला तो टॉम लॉकरचा एके काळचा भागीदार मार्क्स असून जॉर्ज आदिकरून मंडळींना पकडण्यासाठीं मुद्दामच तो सँडुस्किला आलेला होता.

‘ ती बाई इतकी गोरी आहे कीं ती गुलामांपैकीं असावी अशी शंकाही येणें कठीण आहे. त्याचप्रमाणें तो म्युलॅटो तरूण मोठा धूर्त असून त्याच्या हातावर सांडसाचा डाग आहे ! ’

मार्क्सचें हें भाषण ऐकून जॉर्जच्या हाताला थोडा कंप सुटला पण लगेच सावरून व मार्क्सकडे दृष्टिक्षेप करून तो शांतपणें एलिझा उभी होती तिकडे निघून गेला.

मिसेस स्मिथ हॅरिअटसह बायकांचे विभागांत जाऊन बसल्या होत्या. तेथील स्त्रियांनीं हॅरिअटच्या सौंदर्याची स्तुति चालविली.

बोट सुटायची घंटा होतांच मार्क्स बोटीवरून खालीं उतरला. तें पाहून जॉर्जनें एक मुक्ततेचा सुस्कारा सोडला व लवकरच बोट सुटली.

त्यावेळीं हवा स्वच्छ व आल्हादकारक असून एरी सरोवरांतील निळसर लाटांचें सूर्यप्रकाशांत नृत्य सुरू होते! त्यांचा खळखळाट व चकचकीतपणा किती मोहक होता? वाराहि अनुकूल वहात असून ती भव्य बोट मोठ्या डौलानें मार्गक्रमण करीत होती.

कित्येक तासांचे प्रवासानंतर कॅनडाचा किनारा दिसूं लागला. कॅनडा देश इंग्लिशांचे ताब्यांत असून इंग्रजी राज्यांत कोठेंहि गुलामगिरीला कायद्यानें मज्जाव होता अर्थात् कॅनडांतहि गुलामगिरी नव्हती. इंग्लिश किनाऱ्यावर पाऊल टाकतांच, कुठल्याहि देशचा गुलाम असो, त्याच्या पायांतील गुलामगिरीच्या शृंखला तटातट् तुटल्या जाऊन तो स्वतंत्र होई. म्हणूनच युनायटेड स्टेट्समधील गुलाम कॅनडाकडे पळून जाण्याचा प्रयत्न करीत.

बोट ॲमहर्स्टबर्ग बंदरावर थांबतांच जॉर्ज आपले मंडळीसह तेथें उतरला. त्यावेळच्या त्यांच्या आनंदाचें काय वर्णन करावें? जॉर्ज व एलिझा यांनीं गुडघे टेकून मनोभावानें परमेश्वराची प्रार्थना केली. त्यांच्या डोळ्यांतून आनंदाश्रु वहात होते!!

नंतर मिसेस स्मिथनें त्यांना एका दयाळू व थोर मिशनरी गृहस्थांचे घरीं नेलें. कांहीं उदारचरित ख्रिस्ती गृहस्थांनीं तेथें आश्रयार्थ येणाऱ्या

असहाय व दुःखी कष्टी गुलामांना मदत करण्यासाठींच या मिशनरी गृहस्थाला तेथें ठवलें होतें.

स्वातंत्र्यांतील त्या पहिल्याचे मंगल दिवसाची थोरवी कोणाला वर्णन करतां येणार? स्वातंत्र्य! स्वातंत्र्य!! स्वातंत्र्य!!! या शब्दांत कोण विलक्षण जादु आहे! जॉर्ज व एलिझा यांना इथें आपलें म्हणायला काय होतें? घर ना दार! पैसा म्हणाल तर जवळ एकहि डॉलर शिल्लक नव्हता! पण स्वातंत्र्य प्राप्तीमुळें झालेल्या आनंदातिशयापुढें त्यांना कशाचीच पर्वा वाटली नाहीं! मनुष्यप्राण्याचें स्वातंत्र्य हिरावून घेणाऱ्या लोकांनो, देवाजवळ तुम्ही आपल्या कृत्याचा काय जाब द्याल?

---

## प्रकरण १७ वें.

### इव्हाताई

टॉम काका, त्याचेबरोबरीची इतर गुलाम स्त्रीपुरुष मंडळी व त्यांचें मालक हेले यांचा ओहिओ नदींतील प्रवास संपून ते आतां मिसिसिपी नदींतून चालले होते. मिसिसिपी ही नदी दक्षिणेकडील संस्थानांतून वहात जाऊन न्यू आरलिन्सजवळ मेक्सिकोचे आखातास मिळते. हेलेसाहेब न्यू आरलिन्सला भरणाऱ्या गुलामांचे बाजारास जात होते.

प्रथम प्रथम हेलेची टॉमवर बारीक नजर असे. रात्रींही त्याला बेड्या घातल्याशिवाय तो निजूं देत नसे. पण टॉमचा शांत, सरळ स्वभाव व त्याचा नम्रपणा पाहून हेलेच्याहि मनांत विश्वास उत्पन्न होऊं लागला. त्यानें त्याच्या बेड्या आतां काढून टाकल्या व त्याला बोटीवर इकडे तिकडे हिंडण्याची परवानगी दिली.

टॉमचा स्वभाव परोपकारी व कष्टाळू असल्यामुळें बोटीवरील खलाशांना तो त्यांच्या लहान मोठ्या कामांत निरलसपणें मदत करी. कष्टाळू मनुष्याची कोठेंही चहा होतेच. टॉम लवकरच सर्व खलाशी मंडळीचा आवडता झाला.

बोट न्यू आरलिन्सपासून सुमारें शंभर एक मैलांवर आली होती. नदीचे भोंवतालचा प्रदेश सखल असल्यानें बोटीवर उभें राहिलें असतां खूप लांबवरचा देखावा दिसे. जिकडे तिकडे उंच उंच शेतें, मळे व बगीचे पसरलेले असून त्यांतून गुलाम काम करीत. यावेळीं टॉम कापसाच्या गांठी ठेवायच्या जागीं उभा राहून सभोंवार पहात होता. जिवापाड कष्ट करणारे गुलाम, त्यांच्या झोपड्या व त्या पलीकडे त्यांच्या मालकांचे बंगले इत्यादि देखावा टॉमचे नजरेसमोरून क्रमाक्रमानें जात होता. त्याला केंटुकींतील आपल्या जुन्या धन्याचे घराचा व बायको–मुलांची आठवण झाली. आपलें गत आयुष्य एखाद्या दीर्घ स्वप्नाप्रमाणें त्याला वाटलें; आतां फिरून ते दिवस दृष्टीस पडतील काय? टॉमचें हृदय दुःखानें व्याकुळ झालें व त्याच्या डोळ्यांतून अश्रुप्रवाह सुरूं झाला! त्यानें आपलें बायबल उघडलें व त्यावरून तो दृष्टि फिरवूं लागला. आपलें दुःख विसरण्याचा टॉमजवळ एवढाच मार्ग होता!

बोटीवरील उतारूंत न्यू आरलिन्सचे एक बडे गृहस्थ होते. त्यांचें नांव ऑगस्टीन सेंट क्लेअर. न्यू आरलिन्सला त्यांचा टोलेजंग वाडा असून त्यांचे पदरीं पुष्कळ गुलाम होते. त्यांची पत्नी मेरी ही अलीकडे बरेच दिवस दुखण्यानें आजारी असून घरांतील कामकाजाकडे लक्ष देणें तिला कठीण होत चाललें होते व सेंटक्लेअरसाहेब इतर श्रीमंत लोकां-प्रमाणें आळशी व खुशालचंद असल्यामुळें त्यांच्या गृहराज्यांत अव्यवस्था माजली होती. त्यांची एकुलती एक लहान मुलगी इव्हेंजलीन ही अतिशय

नाजुक प्रकृतीची असल्यानें तिची काळजी घेण्यास कोणीतरी मायेचे माणूस जवळ असणें जरूर होतें म्हणून आपली चुलत बहीण मिस आफेलिया हिला कांहीं दिवस आपले घरीं आणण्यासाठीं ते मुलीला-बरोबर घेऊन व्हरमॉंट संस्थानांतील तिचे गांवीं गेले होते व तिच्यासह आतां परत न्यूआरलिन्सला चालले होते. व्हरमॉंट हे संयुक्त संस्थानांपैकीं उत्तरेकडील संस्थान असून त्याला व त्याचे आसपासच्या चार पांच संस्थानांचे समुदायास 'न्यू इंग्लंड संस्थानें' म्हणतात. या संस्थांनांपैकीं कांहीं गांवांतील लोकांची व्यवस्थितपणा व टापटीप याबद्दल प्रसिद्धी असून अशाच एका गांवीं मिस आफेलियाचे आयुष्याचीं आतांपर्यंतचीं पंचेचाळीस वर्षे गेलीं होतीं. *मिस आफेलिया म्हणजे मूर्तिमंत घड्याळ! तिची प्रत्येक गोष्ट अगदीं ठराविक वेळीं व्हायचीच! त्याचप्रमाणें ती शिस्तीची अतिशय भोक्ती असून गबाळेपणा अगर आळशीपणा तिला मुळीं म्हणजे मुळींसुद्धां खपत नसे. ती सुसंस्कृत, मायाळू व धार्मिक प्रवृत्तीची होती.

सेंट क्लेअरसाहेबांची मुलगी इव्हेजलीन ही मोठी मोहक, खेळाडू व अतिशय कोमल मनाची होती. दुःखी कष्टी लोकांबद्दल तिला फार हळहळ वाटे व त्यांना सुखी करण्यासाठीं आपणाकडून होईल तितका ती प्रयत्न करी. तिच्या मुखावरील दैवी–स्मित पाहून कोणालाही आनंद वाटल्यावांचून रहात नसे. तसें पाहिलें तर तिचें वय केवढें अवघें चार पांच वर्षांचें पण किती उदात्त! थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे कोणी शापभ्रष्ट देवतांच तिच्यारूपानें मृत्युलोकीं अवतरली होती!

बालोचित स्वभावाप्रमाणें ती क्षणभरहि एके ठिकाणीं ठरत नसे. घटकेंत तळमजल्यावरील गुलामांचेजवळ ती जाई, त्यांच्या हातांपायां-

*इंग्लंड अमेरिका वगैरे देशांत अनेक स्त्रिया जन्मभर अविवाहित राहतात.

तील बेडया आपल्या चिमुकल्या हातांनीं तोलून पाही व अश्रूपूर्ण नेत्रांनीं एक सुस्कारा सोडून तेथून चालू लागे; तर घटकेंत काम करणाऱ्या खलाशांकडे जाऊन ते काम कसे करतात तें ती निरखून पहात राही; क्षणांत आपल्या वडिलांशीं अगर आत्याबाईशीं लडिवाळपणानें हास्यविनोद करी; तर दुसऱ्या क्षणीं बोटींवरील समवयस्क मुलांमुलींत मिसळून खेळूं लागे. तिच्यावर लक्ष ठेवतां ठेवतां ऑफी आत्याबाईंना पुरेवाट झाली !

आमचे टॉमकाकाचा व या चिमुकल्या देवतेचा हळूंहळूं स्नेह जमत चालला. चिऊमाऊच्या गोष्टी सांगून व कागदाच्या नावा, चेंडू व इतर विविध खेळणीं करून देऊन बाल–बालिकांना आपणाकडे आकर्षण करण्याची कला टॉमला चांगली अवगत होती. त्यांच्याशीं समरस होऊन तो खेळूं लागे व यामुळें तो त्यांचा अगदीं जिगर दोस्त होऊन जाई.

एक दिवस टॉमनें विचारलें, ‘ आमच्या छोट्या ताईसाहेबांचें नांव आम्हाला कळेल कां ? ’

‘ इव्हेजलीन सेंटक्लेअर. पण मला किनई सगळीं जणं इव्हा म्हणतात. बरें तुमचें हो काय नांव ? ’

‘ माझें नांव टॉम. मागें मी केंटुकींत असतांना लहान मुलें मला टॉमकाका म्हणत. ’

‘ मग मीही तुम्हांला टॉमकाकाच म्हणेन; टॉमकाका, तुम्ही मला भारी आवडतां. तुम्ही कोणच्याहो गांवाला जाताहांत ? ’

टॉमनें एक सुस्कारा सोडला व तो म्हणाला ‘ इव्हाताई ! मला तें काय माहीत ? ’

‘ म्हणजे ! तुम्ही कोणत्या गांवाला जाणार तें तुम्हांला ठाऊक नाहीं ? भारीच आश्चर्य आहे बाई ! ’

'मी स्वतंत्र मनुष्य नाहीं; गुलाम आहे ! मला ज्याला विकतील याच्याबरोबर गेलें पाहिजे! कोण मला विकत घेतो आहे कोण जाणे.'

'कां बरं ? माझे बाबा तुम्हांला विकत घेतील. आणि असं झालं तर किती किती चांगलं होईल नाहीं; मी आज त्यांना विचारतेंच.

'आमच्या ताईसाहेब किती चांगल्या आहेत !'

बोट यावेळीं एका लहानशा बंदरांत कोळसा घेण्यासाठीं थांबली. इव्हाला तिच्या बापानें बोलावल्यामुळें ती धावत गेली. टॉम उठला व खलाशी मंडळींना मदत करायला गेला.

इव्हा व तिचे वडील सेंटक्लेअर बोट सुटत असतां कठड्याला टेकून उभे होते. इतक्यांत बोटीचे धक्क्यानें तोल जाऊन इव्हा पाण्यांत पडली. या अनपेक्षित प्रकारानें सेंटक्लेअर गोंधळून गेले. तिच्या मागोमाग ते पाण्यांत उडी टाकणार तोंच इतर कांहीं उतारू मंडळींनीं त्यांना मागें ओढून या साहसापासून परावृत्त केलें.

जिकडे तिकडे मुलगी पाण्यांत पडल्याबद्दल आरडाओरड व गोंधळ सुरू झाला. इव्हा जेथून पडली त्याच्या खालील मजल्यावर टॉम काम करीत होता. आवाज ऐकण्याबरोबर त्यानें दचकून पाण्याकडे पाहिलें तों पाण्याचे हबक्यानें त्याची लाडकी इव्हाताई एकदम पाण्यावर आलेली त्याला दिसली ! क्षणाचाही विलंब न लावतां टॉम तीराप्रमाणें पाण्यांत घुसला व त्यानें इव्हाला वर काढलें. तिला घेऊन पोहत पोहत तो बोटीकडे आला व त्यानें तिला बोटीवरील मंडळीचे स्वाधीन केलें. कांहीं वेळानें इव्हा शुद्धीवर आली.

टॉमनें आपले मुलीस वांचविल्याबद्दल सेंटक्लेअरना त्याचेविषयीं कृतज्ञता वाटत होती त्यांतच त्यांचे मुलीचा आग्रह पडला यामुळें त्यांनीं टॉमला दीडपावणे तीनशें डॉलरला विकत घेतलें.

'तुला कोचमनचें काम येतें का?' सेंटक्लेअरनीं टॉमला विचारलें.

‘ होय साहेब, मला त्या कामाची संवय आहे ’ टॉम उत्तरला.

‘ ठीक मला एक चांगला कोचमन हवाच आहे. पण असें पहा, तूं दारू मात्र जरा बेतानं पीत जा हं ! ’

हें ऐकून टॉमला फार खेद झाला. आश्चर्यचकित मुद्रेनें तो म्हणाला, ‘ धनी साहेब ! मी दारू कधींच पीत नाहीं ! ’

‘ तें मला माहीत आहे म्हणा ! सगळे प्रथम असेंच सांगत असतात जाऊं द्या झालें, तुझें म्हणणें मी खरें धरून चालतों. ’

‘ देवाशपथ धनीसाहेब मी कधीं दारूला शिवत नाहीं ! ’

‘ टॉमकाका ! तूं किनई आमच्या इथं अगदीं सुखांत राहशील. बाबा फारच चांगले आहेत. ते कुणाला त्रास द्यायचे नाहींत ! ’

‘ होय बरं ताईसाहेब ! आपल्या या सर्टिफिकिटाबद्दल आम्ही आपले भारी आभारी आहोंत. सेंटक्लेअर मुलीकडे प्रेमळपणानें पहात हंसत हंसत तेथून निघून गेले.

कांहीं वेळानें बोट न्यूअरलिन्सच्या धक्क्याला लागली. उतारूंची एकच तारंबळ उडाली. मिस आफेलिया आपलें सामान व्यवस्थितपणें जवळ घेऊन उतरण्याच्या तयारीनें केव्हांपासून बसल्या होत्या. हमालांनीं त्यांचें सामान गाडींत नेऊन ठेवलें व सर्व मंडळी सेंटक्लेअर साहेबांच्या भव्य प्रासादाकडे निघाली.

---

## प्रकरण १८ वें.

### सेंट क्लेअरच्या घरीं

ऑगस्टीन सेंटक्लेअर हे आनंदी, थट्टेखोर व उदारमनाचे गृहस्थ होते. ते आपल्या नोकरचाकर व गुलाम मंडळीशीं सलगीनें व प्रेमळ-

रणानें वागत, यामुळें 'प्रेमावांचुनि फेड कशानें प्रेमाची व्हावी' या न्यायानें त्यांनाही त्यांचेबद्दल जिव्हाळा वाटे. गाडी दाराशीं उभी राहतांच सर्व लहान थोर गुलाम मंडळी बऱ्याच दिवसांनीं प्रवासाहून आलेल्या आपल्या मालकांचें स्वागत करण्यासाठीं दारांत जमली. इव्हा म्हणजे तर सर्वांचा जीव कीं प्राण! तिला पाहून त्यांना अत्यानंद झाला. त्या सर्वांचें कुशल विचारीत व त्यांना बक्षिसें देत सेंटक्लेअर आपले पत्नीचे महालांत गेले. आईला पाहतांच इव्हानें तिच्या गळ्याला मिठी मारली. सेंटक्लेअरनीं आपले बहिणीची व टॉमची पत्नीशीं ओळख करून दिली.

तो भव्य प्रासाद, त्यांतील ते मोठमोठे सुंदर गालिचे, आरसे, मखमलीचीं कोचें वगैरे बादशाही थाटमाट पाहून टॉमला आश्चर्य व आनंद वाटला.

'टॉम तुला आमचें घर कसें काय वाटतें? सेंटक्लेअरनीं विचारलें.

''फारच चांगलं आहे धनीसाहेब! आपणासारख्यांना शोभण्यासारखाच हा वाडा आहे.' टॉम नम्रपणें उत्तरला. निग्रोलोक जात्याच थाटमाट व ऐश्वर्यप्रिय असल्यामुळें टॉमला आनंद वाटणें साहाजिक होतें.

सेंटक्लेअरसाहेबांची पत्नी मेरी ही श्रीमंतींत वाढलेली असून तिच्या तोंडचा प्रत्येक शब्द झेलायला नोकरा चाकरांची गर्दी असे. कोणतेंहि काम स्वतः करायची तिला माहिती नव्हती. ती अतिशय नाजूक आप्पलपोटी, असंतुष्ट व किरकिऱ्या स्वभावाची होती. आपणांला नेहमीं कांहींना कांहीं होत आहे असें तिला वाटे व त्याबद्दल तिची सारखी कुरकुर सुरू असे. विशेषतः डोकें दुखण्याचा ती फारज बाऊ करी.

एक दोन दिवसांनीं सेंटक्लेअर मिस आफेलियाला बरोबर घेऊन पत्नीचे महालांत गेले व म्हणाले, 'मेरी! आपली एक मोठी काळजी दूर झाली. ऑफीआक्का घर कामांत फार हुषार आहे. ती सगळी

व्यवस्था चोख पाहील. तुला आतां अगदीं काळजी करायला नको. तुझी प्रकृतीही सुधारेल व तूं पहिल्या सारखी होशील. मग गृहराज्याचा चार्ज अक्काला केव्हां देतां ?

'बरं झालं बाई ! त्यांना तरी एकदां कळूंदे इथली स्थिति ! लोक म्हणतात कीं आम्ही गुलामांना आमच्या सुखासाठीं जवळ बाळगतों पण मेले आमचा कसा छळवाद मांडतात हें कुठं त्यांना दिसतं !

नंतर ती मिस ऑफीकडे वळून म्हणाली 'वन्स ! तुम्हांला ठाऊक नाहीं ! ही मेली गुलामांची जातच मोठी अरबूज ! उठतां लाथ आणि बसतां बुक्की असंच त्यांना वागवलं पाहिजे ! तर ते सरळ वागतात. आमच्या घरांतल्या घळेपणामुळें ते भारीच शेफारले आहेत ! त्यांच्याकडून कामं घ्यायचें म्हणजे कोरड्याशीं गांठ ठेवली पाहिजे. दया माया अगदीं म्हणजे अगदीं उपयोगाची नाहीं. भलत्याच गोष्टींत कसली दया माया ? असं वागलांत तर घरांत कांहीं तरी शिस्त राहील. नाहींतर आपलं चाललंच आहे झालं ! '

भावजयीचा हा 'कानमंत्र' ऐकून मिस आफेलियाला जरा आश्चर्यच वाटलें. ती उत्तरेकडील संस्थानांतील असून तिकडे गुलमांचें फारसें काम पडत नसे. यामुळें तिकडे गुलामगिरी जवळजवळ नव्हतीच म्हटलें तरी चालेल. शिवाय उत्तरेकडील संस्थानांतील लोक गुलामगिरीला नांवें ठेवीत. मिस आफेलियाला काळ्या लोकांचा जरी तिटकारा वाटे तरी तीं आपणासारखींच माणसें आहेत, त्यांना भावना आहेत, त्यांच्या सुखदु:खांची जबाबदारी परमेश्वरानें त्यांच्या मालकांवर टाकली आहे व ती चांगल्या तऱ्हेनें पार पाडण्यासाठीं त्यांनीं आपल्या गुलामांना शिकवून सवरून तयार केलें पाहिजे व हें काम हाणामारीपेक्षां त्यांच्याशीं गोडीगुलाबीनें वागूनच चांगलें साधेल असें

तिचें मत होतें. तथापि ती यावेळीं कांहीं बोलली नाहीं. तिनें मुकाट्यानें भावजयीनें केलेल्या सर्व सूचना ऐकून घेतल्या.

एक दिवस रविवारीं मेरीबाईसाहेब चांगला पोषाख करून मिस आफेलिया व इव्हा यांच्यासह चर्चमध्यें उपासना आटोपून परत आल्या होत्या. पाद्रीबुवांचीं लोकमताला अनुसरून होणारीं प्रवचनें सेंटक्लेअरसारख्या सरळ व स्पष्टवक्त्या मनुष्याला आवडणें शक्य नव्हतें; म्हणून ते फार करून अशा उपासनांना जात नसत. त्याचप्रमाणें ते आज गेले नव्हते, नंतर सर्व मंडळी जेवावयास बसली असतां मेरी बाईसाहेब पतीकडे पहात म्हणाल्या, 'आजचें डॉक्टरसाहेबांचें प्रवचन फारच छान झालें. अगदीं माझ्याच मतांचं त्यांनीं स्पष्टीकरण केलें म्हणाना? समाजांतील उच्चनीच भेद ईश्वरानेंच मुळीं लोककल्याणासाठीं निर्माण केले आहेत, कांहींनीं सुस्थितींत राहावं व इतरांवर अधिकार गाजवावा; तर कांहींनीं काबाडकष्ट करून व दुसऱ्यांची सेवाचाकरी करून मिळेल त्यांत संतोष मानून राहावं, अशीच प्रभूची योजना आहे हें त्यांनीं कसं अगदीं स्पष्ट करून दाखविलं. गुलामगिरीविरुद्ध जी हल्लीं उगाच हाकाटी सुरू आहे तिची त्यांनीं चांगलीच हजेरी घेतली! हो, बायबलांतच जर गुलामगिरीला आधार आहे तर आणखी काय म्हणणं? आज खरोखर आपण यायला पाहिजे होतं.'

'खरे! असल्या या अलभ्य लाभाला मी मुकलों म्हणायचा!' सेंटक्लेअर चेष्टेनें म्हणाले.

'भाऊ! तुझा असल्या गोष्टींवर विश्वास नाहींसं दिसतं!' मिस आफेलियानें विचारलें.

'विश्वास! भलत्याच गोष्टींवर कसा विश्वास बसावा बुवा! मी आपला धोपटमार्गी मनुष्य आहे. या गुलामगिरीसंबंधीच पहाना.

गुलामगिरीच्या समर्थनासाठीं बायबलाकडे कशाला धाव घ्ययला पाहिजे ? ' गुलामगिरी आमच्या फायद्याची बाब आहे म्हणून आम्हांला ती पाहिजे ' म्हटलें म्हणजे झालें ! त्यांत देवाला कशाला आपल्या मदतीला ओढतां ? लोकांना खूष ठेवण्यासाठीं त्यांना आवडत असेल तें बोलायचें व त्याला शास्त्राधार दाखवायचे असलीं भिक्षुकी कसबें आपणाला कांहीं पटत नाहींत ! माझी खात्री आहे, उद्यां जर गुलामगिरी आंतबट्ट्याचा व्यवहार होऊन बसली व लोकांना ती नकोशी झाली तर हेच पाद्रीबुवा टोपी फिरवून गुलामगिरी विरुद्ध शास्त्राधार दाखवूं लागतील ! ! जाऊंद्या झालं !

मेरीबाईसाहेबांना नवऱ्याचें हें भाषण ' नास्तिकपणाचें ' वाटलें, पण मिस आफेलियाला मात्र त्यांत बरेंच तथ्य दिसून आलें.

---

## प्रकरण १९ वें.

### ( पुढें चालू )

सेंटक्लेअरचे घरीं आल्यापासून टॉम सुस्थितींत होता असें म्हणावयास हरकत नाहीं. इव्हाताईनें त्याला आपले खास तैनातीस घेतलें होतें व इतर सर्व कामें बाजूला ठेवून इव्हाचें काम आधीं करण्याबद्दल त्याला धन्याची आज्ञा होती. व टॉमला हेंच पाहिजे होतें. त्याचेकडे जरी कोचमनचें काम होतें तरी त्याला घोड्यांची प्रत्यक्ष चाकरी करावी लागत नसे. त्या कामाला दुसरा मनुष्य होता. आपले मंडळींनीं घाण व फाटके तुकडे कपडे घालणें सेंटक्लेअरना पसंत नव्हतें. यामुळें टॉमला उत्तम पोषाख मिळालेला होता. अशा प्रकारें सुग्रास भोजन, उंची उंची कपडे, काम बेताचें व मालकाचा

लोभ. यामुळें टॉम गुलामगिरींतील जीवनांतहि हल्लीं स्वतःला भाग्य-वान् समजे.

आतांपर्यंत घरांतील बाजारहाट ॲडाल्फ नांवाच्या एका निष्काळजी व उधळ्या मनुष्याकडे होता. तो हवातसा खर्च करी. सेंटक्लेअरना पैशाचें कांहींच वाटत नसे पण टॉमला उघड्या डोळ्यांनीं धन्याचें नुकसान पाहवेना. त्यानें हलकेंच ही गोष्ट त्यांचे नजरेस आणली. यामुळें बाजारहाटाचें काम त्याचेच गळ्यांत पडलें. तो तें अत्यंत दक्षतेनें व प्रामाणिकपणें करी. त्याची हुषारी व सचोटी पाहून सेंटक्लेअरची त्याचेवर जास्त जास्तच मर्जी बसू लागली. टॉम मागेल तेवढे पैसे ते चटकन् देत व उरलेले पैसे त्यानें परत आणून दिले तर ते मोजूनहि पाहण्याची ते तसदी न घेतां तसेच खिशांत घालीत. पैशांचा हिशेब टॉमला ते कधींच विचारीत नसत. अशा स्थितींत दुसऱ्या एखाद्या मनुष्याला पैसे खाण्याचा मोह पडला असता, पण टॉमच्या साध्या व सरळ स्वभावाला खिस्ती धर्मावरील आत्यंतिक श्रद्धेची जोड मिळाल्यामुळें तो मोहवश झाला नाहीं. आपले धनी कधीं बायबल वाचीत नाहींत, रविवारीं चर्चमध्यें उपासनेला जात नाहींत, ख्यालीखुशालींत व चैनींत आपला सारा वेळ घालवितात व मधूनमधून मद्यपानगृहांना भेटी देतात, ह्याबद्दल टॉमला फार हळहळ वाटे तो त्यांचेबद्दल देवाची प्रार्थना करी. एका रविवारीं सेंटक्लेअर रात्रीं एकदोनचे सुमारास घरीं आले. अतिशय दारू प्याल्यामुळें टॉम व ॲडॉल्फ यांना त्यांना गाडींतून उचलून आणावें लागलें. ती सारी रात्र टॉम आपल्या तरूण मालकाचें हें दुर्व्यसन सुटावें म्हणून देवाला आळवीत होता !

दुसरे दिवशीं सकाळीं त्यानें मोठ्या सौम्यपणानें सेंटक्लेअरना रात्रीचे प्रकाराची जाणीव दिली व त्यांचेपुढें गुडघे टेकून तो अत्यंत

कळवळ्यानें म्हणाला, ‘ धनीसाहेब ! या दुष्ट व्यसनानें शरीराची–पशाशी सर्वस्वाची–होळी होते हो !! ’

टॉमचा गळा दाटून आला व त्याच्या नेत्रांतून अश्रुप्रवाह सुरू झाला. तें पाहून सेंटक्लेअर विरघळून गेले. त्यांना आपले वर्तनाची लाज वाटू लागली. आपण इत:पर दारू पिणार नाहीं असें त्यांनीं टॉमला वचन दिलें !

मेरीबाईसाहेबांचें बालपण श्रीमंत व ऐदी आईबापांचे सहवासांत गेल्यानें टापटीप, शिस्त दक्षता इ. सुगृहिणीला आवश्यक असणारे गुण त्यांच्यांत बेतानेंच होते व ‘ यथा राजा तथा प्रजा, या न्यायानें त्यांच्या नोकराचाकरांतही वरील गुणांचा अभावच होता. सामानासुमानाची हवीतशी उधळपट्टी व नासधूस सैंपाकघरांत सुरू असे. यामुळें सेंटक्लेअरचे घरीं शिस्त लावण्यासाठीं आलेल्या मिस आफेलिया या लोकांपुढें लवकरच हात टेकायची पाळी आली. तिनें घरांतील या सर्व अव्यवस्थेबद्दल तुम्ही जबाबदार आहां म्हणून सेंटक्लेअरची कानउघाडणी करण्याचा प्रयत्न केला. तेव्हां त्यांनीं नेहमींप्रमाणें हंसण्यावारीच तिचें बोलणें नेलें !

त्या दिवशीं प्रू नांवाची एक निग्रोगुलाम स्त्री सेंटक्लेअरचे घरीं पाव बिस्कुटें देण्याकरितां आली. धन्याचे पैसे चोरून ती मनमुराद दारू पीत असे व त्यानें याबद्दल किती ही मारझोडा केली तरी ती आपला उपक्रम सोडीत नसे. यामुळें तिच्याजवळ मालाचे पैसे न देतां तिकिटें देण्याबद्दल त्यानें आपले गिऱ्हाइकांकडे कळवून ठेवलें होतें. ही हकीकत ऐकून मिस आफेलियाला प्रूचा तिटकारा आला व तिनें प्रूला दारू सोडण्याचा उपदेश केला. तेव्हां प्रू म्हणाली, ‘ बाईसाहेब ! दु:खानें होरपळलेल्या अन्त:करणाचा भडका दारूनें येणाऱ्या विस्मृती शिवाय शांत होत नाहीं त्याला मी तरी काय करूं ! मला या

जन्माचाच वैताग आलेला आहे, केव्हां देव सोडवील तेव्हां खरं !' इतके बोलून ती चालूं लागली.

टॉमनें हा संवाद ऐकला होता. प्रूबद्दल त्याला वाईट वाटलें व तो हलकेंच तिचे मागोमाग गेला. दारू सोडण्याबद्दल त्यानें तिला कळकळीनें उपदेश केला. तेव्हां प्रू म्हणाली, 'दारू पिणं चांगलं नाहीं हें मलाहि समजतं, पण त्याशिवाय आतां इलाज नाहीं. पूर्वी मी दारूबाज नव्हतें. माझं एकुलतं एक तान्हं पोर माझ्या मालकिणीनं दुधावांचून तडफडून मरूं दिलं ! तिनं त्याला माझ्यापासून हिसकून दूर माळ्यावर नेऊन टाकलं व मला तिकडे जाण्याची बंदी केली ! त्याच्या अन्तकाळच्या किंकाळ्या ऐकत असतां माझ्या हृदयाच्या कशा चिंधड्या होत होत्या त्याची कल्पना दुसऱ्याला काय होणार ! त्या दुःखाचा विसर पडण्यासाठीं मीं हें दारूचं व्यसन लावून घेतलं !'

टॉम जड अन्तःकरणानें परत फिरला. त्याला प्रूबरोबर बोलतांना इव्हानें पाहिलें होतें. म्हणून तिचा फारच आग्रह पडल्यावरून नाइ-लाजानें प्रूची हकीकत त्यानें इव्हाला सांगितली. ती ऐकून ती अगदीं खिन्न होऊन गेली.

कांहीं दिवसांनीं प्रूबद्दल दुसरीच एक बाई पाव बिस्कुटें द्यायला आली. तिचे कडून दुर्दैवानें प्रूच्या मृत्यूची हकीकत मिस आफेलिया ला कळली. प्रू अतीशय दारू पिऊन झिंगल्यामुळें तिच्या मालकानें तिला झोडपून खाली गालि' तळघरांत फेकून दिलें. सर्व दिवसभर ती तेथेंच पडली होती. त्या जागेंतील माशा, मुंग्या, चावून तिच्या जीवनाचा शेवट केला ! ही हकीकत ऐकून मिस आफेलियाचे अंगा-वर कांटाच आला. इतरहि मंडळींना वाईट वाटलें. इव्हा तर मूर्छितच पडावयाच्या घाईला आली इतका तिला धक्का बसला. जगांतील दुःख, हालअपेष्टा पाहून इव्हाच्या कोमल मनाला विलक्षण यातना होत.

मिस आफेलिया भावाच्या खोलींत गेली. त्याला ही हकीगत सांगून संतापानें म्हणाली, ‘ असल्या अघोर पातकाबद्दल देव तुम्हा लोकांना कोणती शिक्षा करणार आहे कोण जाणें ! तुमच्या डोळ्यांदेखत असल्या गोष्टी घडत असतां तुम्ही त्यांचा यत्किंचितही प्रतिकार करण्याचा प्रयत्न करूं नये ? मोठ्या शरमेची गोष्ट आहे ! ’

‘ कांहीं पाशवी वृत्तीच्या हलक्या लोकांनीं असले अत्याचार केले तर त्याला मी तरी काय करणार ? कायद्यानं त्यांना हवं तसं वागायची मुभा दिली आहे. आमच्या सारख्याच्या मध्यस्तीला कोण विचारतो ? साऱ्या समाजाला जिथं कीड लागली आहे तिथं माझ्याए-कट्याच्या हातून काय होणार बरं ! म्हणून डोळ्यांवर कातडं ओढून निमूटपणें हें सारं पहात बसणें भाग आहे ! ’

यानंतर या बाबतींत त्या दोघांचा बराच वादविवाद झाला. व्यक्तिशः आपणाला कितीही वाईट वाटलें व चीड आली तरी परिस्थितीपुढें आपला नाइलाज आहे हें सेंटक्लेअरनी निरनिराळें उदाहरणें देऊन बहिणीच्या मनावर ठसविण्याचा प्रयत्न केला. नंतर त्यांनीं आपला पूर्वेतिहास तिला सांगितला. त्यांचा जुळा भाऊ आल्फ्रेड व ते एकाच प्रेमळ व सद्गुणी मातेच्या उदरीं जन्माला आले होते तरी त्या दोघांच्या स्वभावांत किती फरक होता ! त्यांचा भाऊ आल्फ्रेड हुषार, बापा-सारखा अभिमानी व गुलामांशीं सर्वसामान्य माणसाप्रमाणें निष्ठुरपणें वागणारा होता; तर सेंटक्लेअर आईप्रमाणें अत्यंत कोमल मनाचे होते. यामुळें आईबापांचे पश्चात् स्वभावभिन्नत्वामुळें या दोन भावांचें पटेना. म्हणून त्यांनीं इस्टेटीची वाटणी केली. मळे व त्यांतील गुलाम आल-फ्रेडनें घेतले व तो तिकडेच राहिला; न्यू अरलिन्समधील वाडा व इतर जंगम इस्टेट सेंटक्लेअरचे वांट्यास आली. त्यांना गुलामगिरी

आवडत नव्हती पण गुलामांना छळण्यापेक्षां चैनींत राहूं दिलें म्हणजे झालें असें त्यांना वाटे.

चहाची वेळ झाल्यामुळें सेंटक्लेअर व आफेलिया यांचें बोलणें तितकेंच राहिलें. पुढें सर्व मंडळी फराळास बसली असतां बोलतां बोलतां कोणापुढेंहि मान न लवविणाऱ्या एका धटिंगण गुलामाला निवळ प्रेमळपणानें वागून आपण कसें आपल्या भजनीं लावलें याची हकीगत सेंटक्लेअरनीं सांगितली. ते म्हणाले, 'माझ्या भावाजवळ एक मला दांडगेश्वर गुलाम होता. त्याला स्वतंत्रता फार प्रिय असल्या-मुळें तो आपले मालकाशीं कधींच नमून वागत नसे. कितीही मार-हाण केली तरी त्याचा ताठरपणा गेला नाहीं. मी भावाकडे चार दिवस राहण्यासाठीं गेलों असतां त्याची ही वृत्ति माझे नजरेस पडली. एक दिवस आपले मुकादमालाच उलट चोप देऊन तो पळून गेला. त्याला नरम करण्याचे बाबनींत मी भावाशीं पैज मारली. शिकारी लोकांनीं एखाद्या जंगलीश्वापदाप्रमाणें त्याचा पाठलाग केला व जखमी करून त्याला पकडलें. मीं त्याला आपले खोलींत आणून त्याची चांगली व्यवस्था ठेवली व त्याची सेवाशुश्रूषा आरंभिली. तो बरा होतांच मीं त्याच्या मुक्ततेचे कागद त्याच्या हातांत देऊन म्हटलें, 'तूं आजपासून स्वतंत्र आहेस मनाला येईल तिकडे जा.' काय आश्चर्य सांगावें ? तो मला सोडून मुळींच गेला नाहीं. एखाद्या पाळीव कुत्र्याप्रमाणें तो सदैव माझ्यामागें असे. त्याचा माझ्यावर एवढा लोभ बसला होता कीं मी कॉलऱ्यानें अत्यवस्थ असतां व इतर सर्व मंडळी मला सोडून गेली असतां त्यानें जिवापाड श्रम करून माझी शुश्रूषा केली व त्यांतच त्याचा अंत झाला ! त्याची मला राहूनराहून आठवण होते !

अशाप्रकारें या बड्या लोकांचें खाणेंपिणें व गप्पा सुरू असतां

आमचे टॉमकाका आपल्या खोलींत फारा दिवसांनीं आपल्या मोडक्या तोडक्या अक्षरांनीं आपले पत्नीस पत्र लिहीत बसले होते. इतक्यांत इव्हा तेथें आली. तिच्या मदतीनें त्यांनीं पत्र पुरें केलें व सेंटक्लेअरनीं स्वतःच तें पत्र नीट लिहून पोस्टात टाकण्याची व्यवस्था केली.

---

## प्रकरण २० वें.

### टॉप्सी

एक दिवस सकाळीं सेंटक्लेअर एक सात आठ वर्षांची काळी-कुळकुळीत निग्रो मुलगी बरोबर घेऊन मिस आफेलियाकडे आले व म्हणाले, 'आक्का! आम्ही गुलामांना शिक्षण देत नाहीं याबद्दल आम्हांला तूं उठल्यासुटल्या दोष देत असतेस, म्हणून हा तुझ्यासाठीं अगदीं 'ताजा मासला' आणला आहे. हिला तूं शिक्षण देऊन तयार कर.'

त्या उघड्या नागड्या घाणेरड्या मुलीला पाहून मिस आफेलिया म्हणाली, 'आधींच तुझ्या घरांत काय कमी पोरटीं आहेत म्हणून ही नवी ब्याद तूं आणलीस! मेल्यांनीं अगदीं उच्छेद मांडला आहे! मला मुळींच हीं नको. असल्या पोरांना शिक्षण देत बसायला वेळ आहे कुणाला?'

'आतां कसें? तुम्हांला या लोकांची कींव येतेना? मग स्वतःच कां नाहीं यांना शिकवण्याचा प्रयत्न करीत? आमची आपली शाब्दिक कळकळ! तुम्हांला ही अनायसें संधि आली आहे, मग प्रत्यक्ष काम करून दाखवाना आतां!'

मिस आफेलियानें नाइलाजानें त्या मुलीला ठेवून घेतलें. मुलीचें नांव टॉप्सी होतें. मिस आफेलियानें तिला न्हाऊं घालून तिला

चांगले कपडे दिले व तिला तिचें वय, आईबाप वगैरे संबंधीं माहिती विचारली. टॉप्सीनें दांत विचकीत प्रत्येक प्रश्नाचे नकारार्थी उत्तर दिलें. तें पाहून आफेलियाला आश्चर्य वाटलें. तथापि ती निराश झाली नाहीं. टॉप्सीला चांगले शिकवून सवरून तयार करावयाचें असें तिनें ठरविलें व त्याचप्रमाणें तिनें तिला प्रथम आपले खोलींत नेऊन झाडलोट, हांतरूण घालणें वगैरे कामें शिकविलीं. नंतर तिला लिहा-यला वाचायलाहि शिकविण्यास तिनें सुरवात केली. टॉप्सी जात्या हुषार होती. तिला या गोष्टी भराभर येऊं लागल्या. पण ती अति-शय व्रात्य स्वभावाची होती. खोड्या केल्याशिवाय तिला क्षणभर चैन पडत नसे. तिनें आपल्या खोड्यांनीं घरांतील सर्व मंडळींना व मिस आफेलियाला अगदीं भंडावून सोडलें. आफेलियानें तिची कैक वेळ कानउघाडणी केलीं, नाइलाजानें तिला चार रट्टेहि लगावून पाहिलें पण रामाशिवा गोविंदा! ती आपला व्रात्यापणा कांहीं सोडीना. चेष्टेखोर सेंटक्लेअरची मात्र यामुळें भरपूर करमणूक होत असे.

टॉप्सी बद्दल इव्हाला फार कळवळा वाटे. तिला उगीच कोणी बोललेले तिला खपत नसे. एक दिवस टॉप्सीनें कांहीं जिन्नस चोर-ल्याबद्दल मिस आफेलिया तिला बोलत होत्या. इव्हा तेथें आली व तिला ही हकीगत समजली. तिला अतीशय वाईट वाटलें. ती टॉप्सी-कडे वळून म्हणाली, 'टॉप्सी! तूं कां बरं अशी वागतेस? माझ्या-जवळ माग, मी तुला वाटेल तें देईन, पण असं नको वागूं गडे!'

टॉप्सीनें प्रेमळ शब्द आजच प्रथम ऐकला. त्या वेळच्या गुलामांना वागविण्याच्या पद्धतीप्रमाणें आजपर्यंत अपशब्द व मार हींच तिच्या वांट्याला येत. यामुळें ती कोडगी बनली होती. इव्हाच्या प्रेमळ शब्दांनीं क्षणमात्र तिची चलबिचल झाली पण लवकरच ती तें विसरून गेली.

---

## प्रकरण २१ वें.

### सिंहावलोकन

टॉमकाका हेलेबरोबर गेल्यापासून त्याचे जुनें मालक शेल्बी यांचे घरची हकीगत आपणांस कांहींच कळली नाहीं. ती आतां आपण पाहूं या.

उन्हाळा सुरू असल्यामुळें फार उकडत होतें. तिसरे प्रहरचे सुमारास दिवाणखान्याचीं सारीं दारें व खिडक्या उघड्या टाकून शेल्बी एका आरामखुर्चीवर पडले होते. थोड्या अंतरावर त्यांच्या पत्नी आपलें विणकाम करीत बसल्या होत्या.

'क्लोला म्हणे टॉमचं पत्र आलं आहे. आपल्याला कळलं का ? मिसेस शेल्बी म्हणाल्या.

'हं असं का ? कसं काय आहे त्याचं ?'

'तो हल्लीं एका चांगल्या कुटुंबांत पडला आहे. तो तिथं सुखांत असून त्याला कामहि बेताचंच असतं म्हणे.'

'छान ? छान ! बरं झालं बुवा ! बहुत करून टॉमचं आतां तिकडेच मन रमेलसं दिसतं.'

'तसंच कांहीं नाहीं अगदीं. आम्ही त्याला लौकर सोडवून आणावं अशी त्याची इच्छा आहे.'

'पण हें कसं काय जमायचं बुवा ? हल्लीं व्यापाराची स्थिति समाधानकारक नाहीं. त्यांतून एकदा मनुष्य घसरगुंडीला लागला म्हणजे त्याचं बस्तान बसणं कठीण जातं !'

'तें कांहीं जरी असलं तरी आतां याबाबतींत चालढकल करणं बरं नाहीं. मला वाटतं आपले कांहीं घोडे व एखादी जमीन विकली तर ही रकम सहज उभी करतां येईल !'

'खुळी आहेस झालं ! तशा आपण हुषार आहांत, पण आमच्या व्यवहारांत तुम्हांला काय कळतंय ! बाकी बायकांना इतकंच कळायचं म्हणा !'

'पण हा मेला 'व्यवहार, व्यवहार' तरी कसला आहे. मला सांगा पाहूं, म्हणजे यांतून पार पडायची मला कांहीं तोड सुचते का पाहतें !

'भलतंच ! तुला काय त्यांत कळायचं आहे ? आमचीं कामं म्हणजे चुलीपुढं बसून सैपाक करणं नव्हे !' शेल्बी जरा आवाज चढवून म्हणाले.

आपले पतिराज गरम झालेले पाहून मिसेस शेल्बी एक उसासा टाकून थोडा वेळ गप्प बसल्या. नंतर त्या पुन: हलकेच म्हणाल्या, 'पण टॉमच्या सुटकेची कांहीं तरी तजवीज करायला नको का ? बिचाऱ्या क्लोनं त्याचा अगदीं ध्यास घेतला आहे.

'मला त्याबद्दल वाईट वाटतं, पण करायचं काय ? ही आपल्या हातची गोष्ट थोडीच आहे ? आतां तिनं टॉमची आशा सोडावी हें बरं. मला वाटतं तिला एकदां चक्क सांगून टाकावं कीं टॉम तिकडं दुसरी बायको करील व तूंहि इथं एखादा—'

'त्यांचीं व आमचीं लग्नबंधनं सारखींच पवित्र आहेत असं मीं त्यांना मागंच शिकवलं आहे त्याची काय वाट ?'

'ही तुझी चूकच झाली ! भलत्याच गोष्टी त्यांच्या डोक्यांत भरवायला तुला कुणी सांगितलं होतं ?'

'मी बायबलांतल्या शिकवणीप्रमाणें वागलें. या बिचाऱ्या दुर्दैवी लोकांना दिलेली वचनं मोडणं मला आवडत नाहीं. या पैशाची आपण कांहीं सोय करीत नसाल तर मग गाण्याच्या शिकवण्या धरून पैसे जमवणें मला भाग आहे.'

'अशानं आमची नाचक्की होईलना ? मला हें मुळींच पसंत नाहीं !'

'वचनभंगाचं पातक करण्यापेक्षां असली नाचक्की पत्करली !'

त्यांचें बोलणें तितकेंच राहिलें. कारण क्लो काकूनें दरवाजाजवळ येऊन मिसेस शेल्बींना सैंपाकघराकडे बोलावल्यामुळें त्या तिचे मागोमाग गेल्या.

क्लो काकूनें त्यांना आपण केलेले कांहीं पदार्थ दाखविले व नंतर हळूच गोष्ट काढली. ती म्हणाली, 'बाईसाहेब इतर लोक आपले गुलाम दुसरीकडे कामाला पाठवून पैसे मिळवितात. आपण तसं केलं तर नाहीं का चालायचं ? लुइव्हिल गांवीं एका खानावळींत चांगल्या स्वयंपाक्याची गरज आहे. पगार दर आठवड्याला चार डॉलर मिळतो असं सॅम सांगत होता. माझं इथल काम सॅली सहज संभाळील. मी ती नोकरी पत्करावी म्हणतें. माझ्या पगाराच्या पैशांतून त्यांची सुटका करतां येईल. आपलं व धनीसाहेबांचं भाषण मीं ओझरतां ऐकलं. आमच्यासाठीं शिकवण्या पत्करायचं हलकं काम आपण करण्यापेक्षां माझी ही युक्ति किती तरी चांगली आहे ! मग मी जाऊं का ?'

मिसेस शेल्बींना तिचा विचार पसंत पडला. तथापि तो आपल्या नवऱ्याला कितपत आवडतो याची शंका असल्यामुळें ती म्हणाली, मी त्यांना विचारून काय तें सांगतें ?'

मिसेस शेल्बी परत दिवाणखान्याकडे गेल्या व क्लो आपले झोपडीकडे वळली.

कांहीं वेळानें छोटे साहेब, जॉर्ज शेल्बी, क्लोचे झोपडींत आले. क्लोनें त्याला आपला बेत सांगितला व टॉमला पाठविण्याकरितां आपल्या क्षेमसमाचाराचें पत्र त्याचेकडून लिहवून घेतलें.

---

## प्रकरण २२ वें.

### कांहीं अवांतर हकीगत

दिवसा मागून दिवस जात चाललें. टॉमला सेंटक्लेअरचें घरीं येऊन आतां दोन वर्षें होऊन गेलीं. त्यानें पाठविलेल्या पत्राला त्याचा छोटा साहेब जॉर्ज शेल्बी याचेकडून नुकतेंच विस्तृत उत्तर आलें होतें. त्यांत त्यानें आपली व टॉमच्या मंडळींची खुशाली कळवून क्लो काकू टॉमचे सुटकेकरितां पैसे जमविण्यासाठीं लुइव्हिल गांवीं नोकरीसाठीं जात असल्याचें लिहिलें होतें. टॉमला त्या पत्राचें फार कौतुक वाटे व वारंवार तो त्याची पारायणें करी.

दिवसेंदिवस इव्हाताई व टॉम यांचेमधील स्नेह वाढत चालला. टॉम तिला एखाद्या स्वर्गीय देवतेप्रमाणें पूज्य मानी. बाजारांतून तो तिला हरतऱ्हेचे पुष्पगुच्छ, खेळणीं वगैरे तिच्या आवडीचे जिन्नस मुद्दाम आणून देई. इव्हाला आतां चांगलें वाचतां येऊं लागलें होतें. ती सहृदय असून बायबल इतक्या तन्मयतेनें वाची कीं टॉम तें ऐकून अगदीं तल्लीन होऊन जात असे.

उन्हाळ्यामध्यें सेंटक्लेअर आपलीं सर्व माणसें बरोबर घेऊन न्यू-अरलिन्सपासून कांहीं अंतरावर असलेल्या पॉटचार्टेन सरोवराचे कांठच्या आपले बंगल्यांत राहावयास गेले होते. बंगल्याचे सभोंवार सुंदर बगीचा होता. एक दिवस रविवारीं सूर्यास्ताचे सुमारास टॉम व इव्हा बागेंतील एका लताकुंजांत बसलीं होती. इव्हाचे मांडीवर बायबल असून नुकतांच तिनें त्यांतील एक उतारा टॉमला वाचून दाखविला होता.

नंतर आकाशाकडे बोट दाखवून इव्हा म्हणाली, ‘ टॉमकाका ! मी थोड्याच दिवसांत तिथं देवबाप्पाकडं जाणार ! ’

हें ऐकून टॉमचें काळीज चर्र झालें! गेलें सहा महिने इव्हा सारखी झिजत चालली असून तिच्यांतील उत्साह कमी कमी होत चालल्याचें त्यास दिसत होतें. व मिस आफेलिया इव्हाचे प्रकृती-संबंधीं साचिंतपणें बोलत असतांना त्यानें ऐकलें होतें, तथापि इव्हाचें कांहीं बरें वाईट होईल ही कल्पना त्याला आतांपर्यंत नव्हती.

'इव्हा! अग अशा थंडीची बाहेर बसत जाऊं नको. घरांत ये' ऑफी आत्याचा शब्द ऐकतांच इव्हा व टॉम उठून घरांत गेले.

मिस आफेलिया अनुभवशीर बायको होतीं; इव्हाला अलीकडे कोरडा खोकला येऊं लागलेला पाहून व इतर लक्षणांवरून तिचें दुखणें क्षयावर जात चाललें आहे हें तिनें ओळखलें. तिनें आपली भीति सेंटक्लेअरजवळ बोलून दाखविली. तेव्हां ते हंसून म्हणाले, 'तुम्ही बायका भारीच शंकेखोर बुवा! मुले वाढीला लागलीं म्हणजे जरा कृश दिसायचींच! उघड्यावर खेळल्यानं थोडा खोकला येत असेल झालं, आहे काय अन् नाहीं काय? त्यांत एवढं भ्यायला कशाला पाहिजे!'

सेंटक्लेअरनीं बहिणीचें म्हणणं अशाप्रकारें हंसण्यावारी नेलें खरें, पण अन्तर्यामीं त्यांना इव्हाबद्दल काळजी वाटूं लागली व त्यांनीं तिच्यावर सारखें लक्ष ठेवलें.

याच सुमारास सेंटक्लेअरचें बंधु आलफ्रेड आपल्या वडील मुलाला हेनरीकला—बरोबर घेऊन एक दोन दिवस भावाचा पाहुणचार घ्यायला आले होते. हेनरीक सुमारें बारा वर्षांचा असून राजबिंडा होता. इव्हावर त्याचें अत्यंत प्रेम होतें.

एक दिवस इव्हा व हेनरीक आपले तट्टांवरून फिरायला जाव-यास निघाले. टॉमनें इव्हाचें तट्टू सज्ज करून आणलें व हेनरीकचें तट्टू त्याच्याच वयाचा त्याचा पाणीदार म्युलॅटो हुजऱ्या डोडो यानें सज्ज

करून आणलें;नुकतेच आपले मुलासाठीं हेनरीकचे वाडिलांनीं डोडोला खरेदी केलें होतें. हेनरीकनें आपला धनीपणा दाखवण्यासाठीं 'तट्टाच्या पायावर धूळच आहे, त्याला नीट पुसलाच नाहीं ' अशी कांहीं तरी कुरापत काढून डोडोला मार दिला व त्याला परत तट्टाला नीट पुसून आणायला सांगितलें. डोडोचे डोळ्यांत पाणी आलें. पण काय करतो बिचारा ! मुकाट्यानें धन्याचे तट्टाला तेथून घेऊन जाणें त्याला भाग पडलें. टॉम जवळच उभा होता. त्यानें डोडोबदल रदबदली करण्याचा प्रयत्न केला. तेव्हां हेनरीकनें त्याचा धि:कार करून त्याला अगदीं गप्प बसाविलें.

इव्हा दुरून हा प्रकार पहात होती. हेनरिकचें वर्तन तिला मुळींच आवडलें नाहीं. तिनें त्याबद्दल हेनरीकची चांगलीच हजेरी घेतली. तेव्हां हेनरीकनें इत:पर डोडोला न मारतां त्याच्याशीं चांगल्या-प्रकारें वागण्याचें कबूल केलें.

इतक्यांत डोडो हेनरीकचा घोडा स्वच्छ करून घेऊन आला. हेनरीकनें त्याला खाऊसाठीं कांहीं पैसे दिले. इव्हाला घोड्यावर बस-ण्याचे कामीं डोडोनें मदत केली तेव्हां ती म्हणाली, ' भलेशाबास ! डोडो, तूं किती चांगला आहेस ! '

तट्टांवरून दौडत जाणाऱ्या त्या दोघांमुलांकडे डोडो विस्मयानें पहात होता. हेनरीकनें त्याला खाऊसाठीं पैसे दिले; तर इव्हानें नुसते प्रेमळ शब्द उच्चारले होते पण त्या प्रेमळ शब्दांची थोरवी पैशापेक्षां त्याला जास्त वाटली !

माडीवरून हा सर्व प्रकार ऑगस्टीन सेंटक्लेअर व त्यांचे बंधु आलफ्रेड पहात होते तथापि तसें न दाखवितां ते म्हणाले, 'आलफ्रेड ! आपल्या प्रजासत्ताक राज्यांतल्या मुलांना असंच शिक्षण मिळतं म्ह-णायचं !'

' हेनरीक थोडा हूड आहे. राग आला म्हणजे त्याला सुमार रहात नाहीं. बाकी हा डोडोहि कांहीं कमी नाहीं म्हणा. पुरा खमंग आहे ! ' अल्फ्रेड तुच्छतेनें उत्तरला.

' पण ' सर्व जण जन्मतःच समान दर्जाचे आहेत ' असं प्रजासत्ताक राज्याचं तत्त्व आहे ना ? ' सेंटक्लेअरनीं विचारलें.

' उंः ! कोण असल्या तत्त्वांना विचारतो ! तें कांहीं तरी खूळ आहे झालं ! आमच्या इथं तरी त्याला कोणी उचलून धरणार नाहीं ! समळीं माणसं समान दर्जाचीं व स्वतंत्र असणं शक्य तरी आहे काय ? फक्त बुद्धिमान्, श्रीमंत व सुशिक्षित लोकांनाच फार झालं तर हें तत्त्व लावतां येईल; इतर हलक्या लोकांना नाहीं. त्यांनीं निरंतर आमच्या दास्यांतच राहिलं पाहिजं ! त्यांना म्हणें शिक्षण व समान दर्जा पाहिजे ! पण तें कांहीं एक मिळायच नाहीं ! '

सेंट क्लेअरनीं भावाशीं थोडा वेळ वाद करून पाहिला पण अल्फ्रेडसारख्या हटवादी मनुष्यावर त्याचा कांहीं परिणाम झाला नाहीं तेव्हां त्यांनीं तो नाद सोडला. नंतर दोघेही बंधु करमणुकीसाठीं बुद्धीबळें खेळायला बसले.

यानंतर दोन दिवसांनीं हेनरीक व त्याचे वडील आलफ्रेड परत आपले गांवीं गेले, हेनरीकशीं खेळण्या बागडण्यामुळें इव्हाला जास्तच थकवा वाटूं लागला होता. तेव्हां सेंट क्लेअरनीं तिला औषधोपचार सुरू करण्याचें ठरवून डॉक्टरला बोलावून आणलें.

मेरी बाईसाहेबांना स्वतःच्या काल्पनिक दुखण्यापुढें इव्हाचे दुखण्याची कांहींच मातब्बरी वाटली नाहीं. मिस आफेलियानें त्यांना इव्हाचे प्रकृतीबद्दल सांगून पाहिलें पण त्यांनीं तिकडे फारसें लक्ष दिलें नाहीं. यामुळें इव्हाच्या सुश्रूषेचें काम मिस आफेलियानें आपले अंगावर घेऊन तें काळजीपूर्वक चालविलें.

---

## प्रकरण २३ वें.

### इव्हाचें दुखणें

इव्हाचे प्रकृतींत सारखा चडउतार होत होता. मधून मधून तिला पुष्कळ हुषारी वाटे त्यामुळें ती आतां लवकरच बरी होत जाणार अशी सर्वांना आशा वाटूं लागली. फक्त मिस आफेलिया व वैद्यराज यांना मात्र तशी आशा वाटत नव्हती. खुद्द इव्हालाहि आपण लवकरच या जगाचा त्याग करून जाणार याबद्दल शंका नव्हती. तिला आज जगांत काय कमी होतें? सर्व प्रकारचीं सुखें तिचेपुढें हात जोडून तयार होतीं व आपण लवकरच या सर्वांना अंतरणार हें कळत असून देखील ती शांत व प्रसन्न चित्त होती. फक्त आपल्या जाण्यानें आपल्या प्रेमळ पित्याला व इतर मंडळींना फार दुःख होईल एवढाच विचार तिला त्रास देत असे.

एक दिवस ती टॉमला बायबल वाचून दाखवीत असतां म्हणाली-
'टॉम काका, येशूनें आत्मार्पण (देहदान) कां केलें तें मला कळलें आहे व आपणहि तसंच करावं असं मला वाटतं!'

'म्हणजे!' टॉमनें घाबरून विचारलें.

'बोटीवरील साखळदंडानें जखडलेले व आप्तइष्टांपासून ताटातूट करून आणलेले दुर्दैवी गुलाम ते दिवशीं पाहिले, प्रूची हृदयद्रावक हकीगत ऐकली व अशाच दुसऱ्या कित्येक गोष्टी पाहून मला असं वाटूं लागलं आहे कीं हीं सारीं दुःखं नाहींशीं करण्याकरितां आपणहि आत्मार्पण करावं!'

तिचें हें भाषण ऐकून टॉम भयचकीत मुद्रेनें तिचेकडे पहात राहिला. इतक्यांत सेंटक्लेअरनीं हाक मारल्यांमुळें इव्हा येथून निघून

गेली. दृष्टीपुढून जाणाऱ्या त्या चिमुकल्या देवतेकडे टॉम अश्रुपूर्ण नययांनीं पहात होता.

व्हरांड्यांत सेंटक्लेअर बसले होते.त्यांचेकडे इव्हा येतांच ते तिला म्हणाले ' इव्हा; आतां तूं बरी होत चाललीस नाहीं ? हें पाहिलंस का कसं सुरेख चित्र तुला खेळायला मी आणलं आहे ! '

परंतु इव्हाची मुद्रा गंभीर होती. ती म्हणाली, ' बाबा ! पुष्कळ दिवस तुमच्याशीं बोलावं बोलावं म्हणतें ! '

' काय बरं बाळ ? '

इव्हा स्फुंदत म्हणाली, ' बाबा ! मी लवकरच तुम्हांला सोडून जाणार आहे ! आतां मला असलीं खेळणीं बिळणीं घेऊन काय करायचीं आहेत ? '

हें ऐकून सेंटक्लेअरना अत्यंत दुःख झालें. ते म्हणाले, ' बाळ ! तुला इथं काय कमी आहे ? मग तूं जायची गोष्ट कां काढतेस ? '

' बाबा ! इथल्यापेक्षां मला स्वर्गांत राहणं बरं असं वाटतं. माझ्या अन्तःकरणाची द्विधा वृत्ति झाली आहे ! इथलीं दुःखं पाहण्यापेक्षां स्वर्गांत जावं असं मनांत येतं तर आपणाला सोडून जाण्याचा विचार कसासाच वाटतो ! आमच्या अभागी गुलामांबद्दल तर मला अतीशय काळजी वाटते ! '

' कां बरं ? ते तर सुस्थितींत आहेत ! '

' होय, सध्यां आहेत, पण आपल्या पश्चात् बाबा ! त्यांची काय हो दशा होईल ! आई व आलफ्रेड काका त्यांना आपणासारखंच मायाळूपणानं वागवतील का ? प्रूच्या धन्यानं तिची कशी स्थिति करून टाकली ! अरेरे ! लोक कसे हो इतके निष्ठुर असतात ! '

' तूं भारीच हळव्या मनाची बुवा ! तुला असल्या गोष्टी कळूं दिल्या हीच माझी मुळीं चूक झाली !

'बाबा ! हें काय बरं बोलतां तुम्हीं ? मी खावं–प्यावं–मजा मारावी–नेहमीं आनंदांत असावं–दुःखाचा नुसता विचारसुद्धां चुकून माकून कधीं माझ्या मनांत येऊं नये म्हणून तुम्ही जपतां, पण आपणा-सभोंवार हाल अपेष्टांत काळ कंठणाऱ्या गुलामांची तुम्हांला का बरं आठवण होत नाहीं ? हा अप्पलपोटेपणा नव्हे काय ? मला या लोकांबद्दल अतिशय कळवळा वाटतो. बाबा, या साऱ्या गुलामांना स्वातंत्र्य देण्याचा कांहींच मार्ग नाहीं का हो ?'

'इव्हा ! मलादेखील सर्व लोक स्वतंत्र असावेत असं फार वाटतं, पण काय करावचं ? तें आपल्या हातांत थोडंच आहे ?'

बाबा ! तुम्ही कितीतरी थोर मनाचे आहांत. गुलामगिरीविरुद्ध लोकांचीं मनं वळवण्याचा तुम्हाला खचीत प्रयत्न करतां येईल ! माझ्या पश्चात् माझी आठवण म्हणून तरी तुम्ही एवढं काम कराल कां?'

नको ! बाळ, जायची गोष्ट पुनः बोलूं नको. तुझा वियोग मला सहन व्हायचा नाहीं. माझं जीवनसर्वस्व काय तें तूं आहेस !' सेंट-क्लेअर दुःखावेगानें म्हणाले.

'बाबा ! प्रूचं मूलहि असंच तिचं जीवन–सर्वस्व होतं ! तथापि त्याच्या अन्तकाळच्या किंकाळ्या तिला ऐकाव्याच लागल्या ना ! तुमचं जसं माझ्यावर प्रेम आहे तसंच–अगदीं तसंच–या गुलामांचंहि आपल्या पोरांवर प्रेम असतं हो !! आपल्या टॉमकाकाचं देखील आपल्या पोरांवर असंच प्रेम आहे ! बाबा, टॉमला तरी मुक्त करण्याचं मला वचन द्या ! माझी ही अन्तकाळची शेवटची इच्छा—

'बाळ ! पुन्हां पुन्हां नकोग असं बोलूं ! तुझ्यासाठीं मी हवं तें करायला तयार आहे ? पण मला सोडून जायचं बोलूं नको.'

इव्हा बापाचें चुंबन घेत म्हणाली 'बाबा, आपण दोघंहि एक-दम तिथं गेलों तर कित्ती छान होईल नाहीं ?

‘ तिथं ? तिथं कुठं ?’

‘ देवबापाच्या घरीं. तिथं दुःख शोक चिंता कांहीं नाहीं ! सारा आनंदी आनंद आहे ! मग बाबा, तुम्ही तिथं नाहीं का येणार ? नाहीं कसें ? माझ्या मागोमाग तुम्ही तिथं आल्याशिवाय मुळींच राहणार नाहीं !

---

## प्रकरण २४ वें.

### परिवर्तन

एका रविवारीं मिस आफेलिया, टॉम व इव्हा चर्चमध्यें प्रार्थनेला जाऊन आलीं. सेंटक्लेअर मेरीबाईसाहेबाशीं बोलत व्हरांड्यांत बसले होते. मिस आफेलिया आपली शाल व टोपी ठेवण्यासाठीं आपले खोलींत गेली व इव्हा बापाकडे जाऊन त्याचे मांडीवर बसली.

थोड्याच वेळांत आफेलियाचे खोलींतून कावणें—कदरणें ऐकूं येऊं लागलें व ती टॉप्सीला ओढीतच बाहेर सेंटक्लेअर बसले होते तेथें घेऊन येऊन म्हणाली, ‘ शर्थ झाली बाई या पोरीपुढें ! भाऊ, मला कांहीं ही ब्याद नको ! तुझी तूं संभाळ ! माणसानं सहन तरी मेलं किती करायचं ! हिच्या खोड्यांपुढं करूं तरी काय म्हणतें मी !!

‘ वन्सं ! पाहिलंत, मी सांगत होतें त्याचं प्रत्यंतर आलं ना ? अहो, असं नरमाइनं वागून कां कुठं हे लोक तळ्यावर यायचे आहेत ? माझ्या ताब्यांत त्या पोरटीला द्या म्हणजे अशी झोडपून काढतें कीं पुनः खोड्या करील तर शपथ !’ मेरीबाईसाहेब उद्गारल्या.

‘ आपण आहातच तशा ! आपणापुढं कां कुणाची मात्रा चालायची आहे ?’ सेंटक्लेअर बायकोकडे पहात मिस्किलपणें म्हणाले.

इव्हानें टॉप्सीला आपणाबरोबर येण्याबद्दल खूण करून तिला आपले खोलींत नेलें. तें पाहून सेंटक्लेअर हलकेंच इव्हाचे खोलींजवळ गेले व खिडकीचा पडदा बाजूला करून त्यांचा संवाद ऐकूं लागले. मिस आफेलियालाहि त्यांनीं तिकडे येण्याबद्दल खूण केली.

इव्हा टॉप्सीकडे पहात दुःखित स्वरानें म्हणाली, 'टॉप्सी! तूं असं का बरं वागतेस? तुला कोणीच कसं आवडत नाहीं?'

'कां बरं? मला तर खडीसाखर फार आवडते! आणखी काय आवडायचं?'

'तसं नव्हे ग, तुला तुझे आईबाप आवडत नव्हते का?'

'आईबाप! मला हो कुठले आईबाप? मला आई नाहीं न बाप हि नाहीं!'

'तुला भाऊ, बहीण, आत्या कुणीच मायेचं माणूस नाहीं?'

'छे: कुण्णी नाहीं!'

'पण टॉप्सी तूं जर चांगल्यारीतीनं वागशील तर—

'ताईसाहेब! मी आपणसारखी गोरी थोडीच आहे चांगलेपणानं वागायला? आम्ही काळ्या लोकांनीं असंच वागायचं!'

'तूं जर नीट वागशील तर सगळींजणं तुझ्यावर माया करतील. ऑफीआत्यांना देखील तूं आवडूं लागशील!'

टॉप्सी हंसून म्हणाली, 'मला नाहीं हें खरं वाटत. एखाद्या बेडकीप्रमाणें त्या मला दूर दूर राखतात! अहो, आम्हां निगर लोकां-वर कोण माया करावला बसलंय? उगीच कांहीं तरी बोलतां झालं!'

इव्हानें आपला हात टॉप्सीचे खांद्यावर ठेवला व ती गहिंवरून म्हणाली 'टॉप्सी! दुसऱ्या कुणीं नाहीं तुझ्यावर माया केली तरी मी करीन बरं! तुला आई नाहीं, बाप नाहीं, कुणी मायेचं माणूस नाहीं! अरेरे, टॉप्सी, मला तुझी फार दया येते ग! निदान माझ्यासाठीं तरी

तूं चांगल्या रीतीनं नाहीं का वागणार ? मी आतां थोड्या दिवसांची सोबती आहे तुझ्या खोडया पाहून मला किती वाईट वाटतं म्हणून सांगूं ? '

इव्हाच्या या प्रेमळ शब्दांनीं टॉप्सीचें हृदय भरून आलें ! इतक्या आपलेपणानें उच्चारलेले शब्द तिनें कधींच ऐकलें नव्हतें. ती स्फुंदुं लागली.

' टॉप्सी, माझ्यावर—तुझ्यावर—सर्वांवर देवाचं सारखंच प्रेम आहे. त्याच्या ठिकाणीं उच्च नीच भाव नाहीं. तूं चांगलेपणानं वागलीस तर तो तुझ्यावर कृपा केल्याशिवाय खचीत राहायचा नाहीं ! '

' ताईसाहेब ! वागीन बरं, मी आजपासून अगदीं चांगली वागेन, कध्धीं कध्धीं खोडया करायची नाहीं ! '

सेंटक्लेअरनीं खिडकीचा पडदा पूर्ववत् सोडला व ते बहिणीकडे वळून म्हणाले ' माझी आई अशीच प्रेमळ होती. ती नेहमीं म्हणत असे कीं तुम्हांला दुसऱ्यांचीं दुःखं हलकीं करायचीं असतील तर त्यांच्यांत मिळून मिसळूनच वागलं पाहिजे व त्यांचा लोभ संपादन केला पाहिजे. लांबून लांबून हें काम होणार नाहीं. '

' तुझं म्हणणं खरं आहे, पण मला या घाणेरडया निग्रोंचा भारचि तिटकारा वाटतो बाई ! त्यांना कसं शिवायचं ? त्या कारटीला इतकं कळतं अं ! बाकी इव्हासारख्या एका मुलीनं या बाबतींत आज मला धडा शिकवला एवढं खरं !

## प्रकरण २५ वें

### इव्हाचें स्वर्गलोकीं प्रयाण !

एक दिवस इव्हा आपले आईकडे येऊन म्हणाली, ' आई, माझे थोडे केंस कापावे म्हणतें. कांहीं मंडळींना ते भेट म्हणून मी देणार आहे. आत्याबाईंना बोलावतेस का ? '

मेरीबाईसाहेबांची हांक ऐकून मिस आफेलिया तेथें आली. तिचे कडे जाऊन इव्हा विनोदानें म्हणाली, ' आते, या कोंकराची लोंकर जरा पातळ कर. '

मिस आफेलिया तिचे केंस कातरूं लागली, इतक्यांत सेंटक्लेअर कांहीं फळफळावळ घेऊन तेथें आले. ते बहिणीला म्हणाले ' जरा बेतानं हं. आम्हांला लौकरच आलफ्रेडचे गांवीं जायाचं आहे. इव्हाचें सौंदर्य कमी होतां उपयोगाचें नाहीं. '

' बाबा, मी कांहीं तुमच्याबरोबर तिकडं येऊं शकत नाहीं, कारण मला त्यापेक्षां चांगल्या ठिकाणीं जायचं आहे ! ' इव्हा म्हणाली.

इव्हाचे लांबसडक केंस कातरल्यामुळें भराभर तिचे मांडीवर पडत असून सेंटक्लेअर त्यांकडे खिन्नपणें पहात उभे होते. नंतर इव्हा बापाकडे वळून म्हणाली, ' बाबा, मी आतां फार थोडया दिवसांची सोबती आहे. मला कांहीं गोष्टी करायच्या आहेत. आपल्या साऱ्या माणसांना बोलावतां कां ? '

सेंटक्लेअर अत्यंत कष्टी झाले. मिस आफेलियानें घरांतील सर्व लहानथोर मंडळींना तेथें बोलावून आणलें. तो एकंदर देखावा पाहून ते सर्वजण भांबावून गेले. सर्वत्र स्मशान–शांतता पसरली.

इव्हानें उठून सर्वांकडे नजर टाकली व ती म्हणाली, ' तुम्ही सारींजणं मला अत्यंत प्रिय आहांत. लवकरच मी इथून जाणार

म्हणून तुमचा शेवटचा निरोप घेण्यासाठीं मीं तुम्हांला बोलावलं आहे!'

हें ऐकून ती सर्व मंडळी स्फुंदूं लागली त्यांच्या रडण्यांत तिचा आवाज मिसळून गेला. तेव्हां इव्हा म्हणाली, असं काय बरं करतां? मला जरा बोलूं द्या. तुमच्यापैकीं पुष्कळजण इथल्याच सुख दुःखांत गुरफटून गेले आहेत. पारलौकिक कल्याणाची तुम्ही कांहींच काळजी करीत नाहीं. मी स्वर्गलोकीं देवबाप्पाकडे जाणार व तुम्हांलाहि तिथं येतां येईल. पण तसं करायचं म्हणजे तुम्हांला चांगल्या प्रकारें वागलं पाहिजे, नेहमीं प्रार्थना केली पाहिजे. तुम्हांला बायबल वाचतां येत नाहीं, तर निदान श्रवण तरी करीत चला. असं वागलांत तर तुम्हांला स्वर्ग प्राप्ति करून घेतां येईल व तिथं माझी तुमची गांठ पडेल. मी तुम्हांला आवडते ना?'

'होय ताईसाहेब! तुम्ही आमच्या जीवाच्या कलिजा आहांत!' सर्वजण उद्गारले.

'माझी आठवण म्हणून या केसांचे बटांपैकीं एकेक मी आतां तुम्हांला देतें त्याकडे पाहतांच आतांच्या माझ्या भाषणाची स्मृति तुम्हांला होईल. तुम्हीं सर्वांनीं स्वर्गलोकीं माझ्या भेटीला यावं अशी माझी फार फार इच्छा आहे!'

त्या वेळच्या देखाव्याचं वर्णन करणें कठीण आहे. सर्वत्र अश्रु, हुंदके, दुःखोद्गार सुरू होते. इव्हानें दिलेल्या केसांच्या बटा घेऊन एका मागून एक सर्वांनीं मोठ्या दुःखानें प्रयाण केलें. शेवटीं गुलाम मंडळीपैकीं फक्त टॉम व मेरी बाईसाहेबांची आवडती दासी मॅमी एवढींच राहिलीं. त्यांना एकेक बट देऊन इव्हा म्हणाली, 'तुम्ही दोघंजणं मला स्वर्गांत भेटणारच याबद्दल मला मुळींसुद्धां संशय नाहीं!'

सर्व जण गेल्यावर मिस आफेलियानें दार लावून घेतलें. इतका

वेळ ती सारखी अश्रु पुशीत उभी होती. इव्हा सेंटक्लेअर जवळ जाऊन म्हणाली, ' बाबा !—'

सेंटक्लेअर दुःखावेगानें म्हणाले, ' छे ! मला हें नाहीं सहन होत ! देवा, तूं कितीरे निष्ठुर आहेस ! '

' भाऊ ! देवाला आपल्या मनाप्रमाणं वागायचा हक्क नाहीं का ?' मिस आलेफियानें विचारलें.

' असेल पण मी हें कसं सहन करूं ? '

' बाबा ! नका हो असं बोलूं ! आपल्या मनोगतासाठीं देवाला बोल लावणं चांगलं नाहीं ! इव्हा स्फुंदत स्फुंदत म्हणाली.

' बरं आहे, नाहीं बरं बाळ मी पुनः असं बोलायचा ! ' नंतर खिन्नपणें हंसून ते म्हणाले, 'आम्हांला नाहीं तूं केसांची बट दिलीस ?'

' बाबा, ते तर सगळेच तुमचे आहेत ! त्यावर तुमचा व आईचा हक्क आहे. आत्याबाईना लागतील तेवढे द्या. ह्या गरीबांना माझी आठवण रहावी म्हणून मीं स्वतःच त्यांना दिले इतकंच ! '

या प्रसंगानंतर इव्हा जास्त जास्तच थकत चालली. तिच्या जाण्या-बद्दल आतां कुणालाच संशय राहिला नाहीं. मिस आफेलिया रात्रं-दिवस तिची शुश्रूषा करीत होती. टॉम सदैव इव्हाचे आसपास असे. ती वरचेवर दुखण्यामुळें अस्वस्थ होई; तेव्हां टॉम तिला आपले हातावर अलग घेऊन इकडून तिकडून फिरवून आणी; कधीं कधीं सकाळीं चांगली हवा असतांना तिच्या हाताला धरून तो तिला बागेंत फिरावयास नेई, एखाद्या लताकुंजांत बसवून गाणीं व अभंग म्हणून दाखवून तो तिची करमणूक करी. अशा प्रकारें तो तिच्या सेवेला आनंदानें तयार असे. इव्हाचें कांहीं कमी जास्त झालें तर आपणांस चट्दिशीं समजावें म्हणून रात्रीं तो इव्हाचे खोलीबाहेरील फरशीवर निजे.

शेवटीं इव्हाचे जाण्याचा दिवस उजाडला. त्या दिवशीं इव्हाला

सर्व दिवसभर पुष्कळच हुषारी वाटत होती, पण मध्यरात्रीचे सुमारास तिची चर्या पालटली. मिस आफेलियानें एकदम दार उघडलें. टॉम बाहेर जागाच होता त्याला तिनें तत्काळ डॉक्टरला बोलावून आणण्यासाठीं पाठविलें व ती सेंटक्लेअरचे खोलीकडे येऊन त्यांना हाक मारून म्हणाली, ' भाऊ ? अमळ इकडे येतोस का ? '

सेंटक्लेअर दचकून जागे झाले व तिचेबरोबर इव्हाचे खोलींत गेले. इतक्यांत टॉम डॉक्टरना घेऊन आला. डॉक्टरसाहेबांचे आगमनानें सर्व मंडळी जागृत झाली व इव्हाचे खोलीभोंवतीं जमलीं.

सेंटक्लेअर इव्हाजवळ जाऊन म्हणाले ' बाळ इव्हा ! एक तरी शब्द माझ्याशीं बोल ग ! '

इव्हानें आपले डोळे उघडले, मधुर स्मिताची छटा त्या रम्य मुखमंडलावर चमकून गेली, बोलण्यासाठीं ओठ हलूं लागले !

' बाबा ! ' मोठ्या प्रयासानें इव्हानें हे शब्द उच्चारून बापाचे गळ्याभोंवतीं हातांचा विळखा घालण्याचा प्रयत्न केला पण लगेच तिचे हात खालीं पडले. व तिला एक आचका येऊन चेहरा काळवंडला. श्वासोच्छ्वासासाठीं तिची धडपड सुरूं होऊन हातापायाला झटके येऊं लागले.

' टॉम ! माझ्यानें नाहींरे हे बघवत ! ' सेंटक्लेअर टॉमचा हात धरून म्हणाले.

टॉमचे कृष्णकपोलावरून गंगायमुनांचा प्रवाह वहात होता. त्यानें वर मान करून मनांतल्या मनांत देवाचा धांवा चालविला.

थोडयाच वेळांत इव्हाची धडपड थांबली. तिचा आत्मा या नश्वर कलेवराला सोडून स्वर्गीं *प्रभूच्या स्वरूपांत मिळण्यासाठीं निघून गेला !

---

*प्रभूच्या—ईश्वराच्या.

# प्रकरण २६ वें.

## वज्राघात !

इव्हा गेल्यापासून सेंटक्लेअर उदासीन झाले. बाह्यतः त्यांचे सर्व व्यवहार इतर माणसांसारखेच चालत, पण अंतर्यामीं सर्वत्र नैराश्य पसरलें होतें. टॉमच्या लक्षांत त्यांची ही मनस्थिति आली असल्यामुळें तो सदैव त्यांचे आसपास असे.

नंतर थोड्याच दिवसांत ही सर्व मंडळी परत न्यूअरलिन्सला रहायला आली.

मेरीबाईसाहेबासारखे सेंटक्लेअर उठल्या सुटल्या आपल्या दुःखाचें प्रदर्शन करीत नसत यामुळें त्यांना मुळीं दुःखच झालें नसावें असें मानण्यापर्यंत व तसें बोलून दाखविण्यापर्यंत बाईंची मजल गेली. तेव्हां त्यांची दासी मॅमी म्हणाली, ' बाईसाहेब ! असं कसं म्हणतां ? धनी-साहेब सारखे वाळत चालले असून अलीकडे त्यांचें जेवणहि तुटत चाललें आहे. ! '

' असेल ग, तसं असेल, पण माझ्याबद्दल त्यांना कांहींच वाटत नाहीं ! मी तर प्रत्यक्ष इव्हाची आई ना ? माझं त्यांनीं सान्त्वन करायाला नको होतं का ? त्यांना मुळींच माया नाहीं ! माझी लाडकी इव्हा गेली ! ' असें बोलून मेरीबाईसाहेब रडूं लागल्या. इव्हा जिवंत असतां त्यांनीं तिची कधींच काळजी घेतलीं नाहीं पण आतां मात्र यांना तिच्याबद्दल हळहळ वाटूं लागली !

सेंटक्लेअरना टॉमच्या भोळ्या भावाचें व त्यामुळें त्याच्या अन्तःकरणाला मिळणाऱ्या समाधानाचें कौतुक वाटे. आपली खरी स्थिति समजणारा व आपल्या सुखदुःखांशीं समरस होणारा एवढाच

काय तो प्रोणी आहे असें त्यांना कळून आल्यामुळें त्यांचा त्याचेवर दिवसेंदिवस जास्तच लोभ बसत चालला. त्याच्या सहवासांत आपला वेळ स्वर्गीय आनंदांत जातो असें त्यांचे अनुभवास येऊं लागलें. ते त्याला बायबल वाचून दाखवीत व तें ऐकत असतां त्याची होणारी तन्मयता पाहून त्यांना आनंद होई. एक दिवस त्याला स्वातंत्र्य देण्याचें ठरवून वकिलाला त्याप्रमाणें कायदेशीर कागद तयार करायला त्यांनीं सांगितलें. नंतर ते टॉमला म्हणाले, ‘ टॉम ! तुझी गुलामगिरी संपली ! तुला मी माझ्यासारखाच स्वतंत्र मनुष्य करणार आहे. केंटुकीला जाण्यासाठीं आपल्या सामानाची बांधाबांध कर ! ’

हें ऐकून टॉमला अत्यानद झाला. आकाशाकडे पहात हात जोडून तो म्हणाला ‘ प्रभो ! तुझी लीला अतर्क्य आहे ! ’

परंतु टॉमची ही उत्सुकता सेंटक्लेअरना आवडली नाहीं. आपणां-कडे तो इतक्या चैनींत असतां त्यानें घरीं परत जायला इतकें उत्सुक कां व्हावें हें त्यांना कळेना. तेव्हां टॉम म्हणाला, ‘ धनीसाहेब ! पारतंत्र्यांतल्या तूपपोळीपेक्षां स्वातंत्र्यांतल्या शिळ्या तुकड्यांची योग्यता फार मोठी आहे ! ‘ स्वातंत्र्य ’ ही चीजच अशी आहे कीं तिच्यासाठीं लागतील त्या हालअपेष्टा कोणीही आनंदानें सहन करील ! स्वतंत्र-पणानं वागत असतां माझ्या अंगावर फाटकीं लक्तरं असलीं, रहायला चंद्रमोळी घर असलं व अन्नाची भ्रांत असली तरी ‘ मी स्वतंत्र आहे ’ या नुसत्या विचारानं मनाला जें अनिर्वचनीय सुख होत असतं, त्याची सर कशालाहि येणार नाहीं ! कांहीं झालं तरी स्वातंत्र्य तें स्वातंत्र्य व पारतंत्र्य तें पारतंत्र्य ! ! ’

सेंटक्लेअरना त्यांचें म्हणणें पटलें. नंतर ते म्हणाले, ‘ तूं मला अशा स्थितींत सोडून जाणार तर ? ’

‘ नाहीं, धनीसाहेब मी इतका कृतघ्न नाहीं ! आपणासाठीं वेळ

पडल्यास प्राणहि द्यायला माझी तयारी आहे ! आपली प्रकृति सुधारून आपण पूर्ववत् होईपर्यंत मी आपणाला सोडून जाणार नाहीं !'

टॉप्सीवर मिस आफेलियाचें प्रेम बसत चाललें कारण इव्हाच्या उपदेशानें ती फार निवळली होती. इव्हा तिला जीव कीं प्राण वाटे यामुळें इव्हाचे मृत्यूनें तिला अत्यंत दु:ख झालें. इव्हाची आठवण काढून ती ओक्साबोक्शी रडत बसे. मिस आफेलिया तिचें कसें बसें समाधान करीत. सेंटक्लेअरजवळून तिनें टॉप्सीचें आपल्या नांवचें बक्षीस करून घेतलें. व तिला गुलामगिरींतून मुक्त करून सुसंस्कृत करावयाचें असें तिनें ठरविलें.

एक दिवस मिस आफेलिया सेंटक्लेअरना म्हणाली, 'भाऊ ! आपल्या पश्चात् या गुलामांची तूं काय तजवीज करून ठेवली आहेस ?'

'अजून नाहीं कांहीं केली—'

'मग केव्हां करणार, तुझ्या पश्चात् त्यांचे हाल कुत्रा देखील खाणार नाहीं !'

होय, लवकरच करीन म्हणतों.'

'विलंब का ? कोणतंहि चांगलं काम मनांत येतांच ताबडतोब करून टाकावं. घटकेचा भरंवसा नाहीं. पुढं काय होईल कुणी सांगावं ?'

'म्हणजे ! मी कांहीं तुला आजारीबिजारी दिसतो कीं काय ?'

'तसं नाहीं कांहीं, पण मृत्यु पाठीशीं उभा आहे हें माणसानं सदैव मनांत बाळगावं हें बरं !'

सेंटक्लेअरना या मरणाच्या गोष्टी फारशा आवडण्यासारख्या नव्हत्या म्हणून तेथून उठून ते सज्ज्यांत गेले व चौकांत उडणाऱ्या कारंजांतील जलतुषाराकडे पहात उभे राहिले. तथापि मृत्यूची कल्पना त्यांचे

मनांतून कांहीं केल्या जाईना. ते तसेच टॉमचे खोलीकडे आले व त्याला त्यांनीं बायबल वाचून दाखवायला सुरवात केली.

संध्याकाळीं सेंटक्लेअर एकटेच फिरावयास निघालेले पाहून टॉम त्यांचे मागोमाग जाऊं लागला. तेव्हां ते म्हणाले, 'टॉम, मी लवकरच परत येतों, तूं कशाला माझ्याबरोबर येतोस?'

टॉम परत फिरला व कारंजांतून उडणाऱ्या पाण्याकडे पहात व्हरांड्यांत बसला. ते दिवशीं स्वच्छ हवा पडली होती. टॉमचीं मनोराज्यें सुरू झालीं. थोड्याच दिवसांनीं स्वतंत्र मनुष्य म्हणून आपण केंटुकीला परत जाऊं, बायको–मुलांना स्वतंत्र करण्यासाठीं तेथें जिवापाड कष्ट करून पैसे मिळवूं व त्यांना गुलामगिरींतून मुक्त करून त्यांच्यासह प्रामाणिकपणें काम करून मिळणारी भाजीभाकरी आनंदानें खात स्वातंत्र्याचा उपभोग घेत राहूं! त्याला आपल्या छोट्या साहेबाचें–जॉर्ज शेल्बीचें–स्मरण झालें. आतां तो किती–तरी उमदा तरुण दिसत असेल, आपल्याला पाहून त्याला किती आनंद होईल? नंतर त्यांचे विचार इव्हाकडे वळले व त्या शुभ्र जलतुषारांतून इव्हा सुहास्यवदनानें आपणाकडे पहात आहे असा त्याला भास झाला.

हाय! टॉमची ही सुखसमाधि एकाएकी भंगली! दरवाजाजवळ माणसांचा गलगा चाललेला त्याला ऐकूं आला. तो धावतच तिकडे गेला. कांहीं माणसांनीं एका मनुष्याला दुकानचे फळीवर निजवून आणिलें होतें. दिव्याचा उजेड त्या माणसचे चेहऱ्यावर पडतांच टॉमनें भीतीनें किंकाळीच फोडली! कारण ते सेंटक्लेअर असून मरणोन्मुख स्थितींत होते! टॉमची किंकाळी ऐकून वाड्यांतील सर्व मंडळी तेथें जमा झाली. सेंटक्लेअरना दिवाणखान्यांत नेण्यांत आलें.

सेंटक्लेअर टॉमला परतवून एका कॉफिहाऊसमध्यें संध्याकाळचें वर्तमानपत्र पाहण्यासाठीं गेले. तें वाचीत असतां जवळच दोघा

गृहस्थांची मारामारी सुरू झाली. ती सोडविण्याचा प्रयत्न करीत असतां त्यांपैकीं एकानें जवळच्या सुऱ्यानें भोसकून त्यांना भयंकर जखमी केलें ! कांहीं वेळानें तेथील मंडळींनीं त्यांना रक्तबंबाळ स्थितींतच जवळच पडलेल्या दुकानच्या फळीवर निजवून बेशुद्ध स्थितींत त्यांचे घरीं आणलें !

वाड्यांत जिकडेतिकडे रडारड सुरू झाली. टॉम व आफेलिआ यांनीं प्रसंगावधान राखून सेंटक्लेअरच्या जखमा बांधल्या व त्यांची शुश्रूषा चालविली. लवकरच डॉक्टरहि आले. त्यांच्या चेहऱ्यावरून त्यांना रोग्याचे जीवीताची आशा नसल्याचें दिसत होतें तथापि जखमा बांधण्याचे कामीं ते मिस आफेलियाला मनोभावानें मदत करीत होते. जमलेली मंडळी स्फुंदत स्फुंदत रडत होती तें पाहून डॉक्टर म्हणाले, ' हा गलगा बंद केल्याशिवाय रोग्याला स्वस्थता मिळणार नाहीं. या सर्व मंडळींना बाहेर घालविलें पाहिजे. '

मिस आफेलिया व डॉक्टरसाहेब गुलाम मंडळींना तेथून बाहेर घालविण्याचा प्रयत्न करीत असतां सेंटक्लेअरनीं डोळे उघडले व त्या दुःखीकष्टी लोकांकडे दृष्टिक्षेप करून ते म्हणाले, ' अरेरे ! गरीब बिचारे ! '

नंतर टॉमकडे पहात ते म्हणाले, ' टॉम ! मी चाललों ! माझ्या-साठीं प्रार्थना कर. '

' पाद्री भटजींना बोलावूं का ? ' डॉक्टरनीं विचारलें.

सेंटक्लेअरनीं नकारार्थी मान हलविली व पुनः टॉमलाच त्यांनीं प्रार्थना करायला सांगितलें.

आपणाकडे उत्सुकतेनें पहात असलेल्या आपल्या धन्यासाठीं टॉमनें सद्गदितपणें शेवटची प्रार्थना केली.

लवकरच सेंटक्लेअरचें प्राणोत्क्रमण झालें !

## प्रकरण २७ वें

### दैवदुर्विपाक !

आपल्या गुलामांना दयाळूपणानें वागविणारे धनी फार थोडे; या मुळें अशा धन्याचा मृत्यु त्याचे गुलामांना अतिशयच जाणवतो. सेंट-क्लेअर यांच्या मृत्यूनंतर त्यांच्या गुलामांना भीतीनें धडकीच भरली ! कारण मेरीसाहेबांचा स्वभाव त्यांना पुरता माहीत होता. नवरा जिवंत असतांना त्यांचें फारसें चालत नव्हतें पण आतां सर्व इस्टेटीची मालकी त्यांचेकडे आली असल्यामुळें घरांत त्या म्हणतील तो कायदा व करतील ती शिक्षा असा दंडक सुरू झाला ! इतके दिवस लाडा-वलेल्या गुलामांना चांगली जरब बसावयाचें त्यांनीं ठरविलें व त्या तसें बोलूनहि दाखवूं लागल्या.

मिस आफेलियानें लवकरच तेथून टॉप्सीला बरोबर घेऊन आपले घराकडे परत जाण्याचें ठरविलें.

सेंटक्लेअरना वारून सुमारें पंधरा दिवस झाले असतील. एक दिवस घरांतील गुलामांपैकीं रोझा नांवाची एक सुंदर म्युलॅटो तरुणी मिस आफेलियाचे खोलींत आली. तिचे केस अस्ताव्यस्त झाले असून डोळे रडून रडून सुजले होते.

मिस आफेलियाचे पाय धरून ती म्हणाली, 'अक्कासाहेब ! बाई-साहेबांना सांगून मला या बेअब्रूंतून वांचवा हो ! फोडून काढ-ण्यासाठीं त्या मला शिक्षागृहांत पाठवीत आहेत ! ह्या बवितलांत त्यांचा हुकूम ?'

तिनें दिलेला कागद मिस आफेलियानें वाचला. नाजूक मेरीबाई-साहेबांनीं रोझीला पंधरा फटके देण्याबद्दल शिक्षागृहाचे मुख्यास लिहिलें होतें !

आपल्या गुलमांपैकीं तरुण मुलें—मुलो व स्त्रिया यांना वठणीवर आणण्यासाठीं शिक्षागृहांकडे ( Whipping-houses ) मार देण्यासाठीं पाठविण्याचा त्याकाळीं रिवाज होता. हीं शिक्षागृहें म्हणजे यमपुरीची छोटीशी आवृत्तीच होती म्हणाना ! मार देण्याचें काम क्रूर व हलकट लोकांकडे असून ते हवेतसे निर्लज्जपणानें वागत. यामुळें अशा शिक्षागृहांत जावयाचें म्हणजे कोणाही सभ्य स्त्रीच्या अंगावर कांटाच उभा राही ! मिस आफेलियाला हें माहीत होतें; ती कळवळून म्हणाली, ' पोरी ! तूं असं केलंस तरी काय ?'

' आक्कासाहेब, माझ्याकडून बोलण्यांत थोडी चूक झाली हो ! मला त्याबद्दल आतां भारी वाईट वाटतं आहे. मी मघांशीं बाईसाहेबांना पोषाक घालीत होतें. काय चुकलें कोण जाणें, त्यांनीं एकदम माझ्या श्रीमुखांत भडकावली ! मी गप्प बसावं कीं नाहीं ? पण अविचारानं माझा राग व्यक्त केला. झालं ! बाईसाहेब तेवढ्यानं गरम झाल्या व त्यांनीं हा कागद खरडला ! मला मारायचं असलं तर बाईसाहेबांनीं, नाहीं तर तुम्हीं मारलं तर चालेल, पण मला शिक्षागृहांतल्या त्या मांगांच्याकडं नका पाठवूं ! माझ्या अब्रूचे धिंडवडे निघतील ! '

मेरी बाईसाहेबांचें हें कृत्य मिस आफेलियाला निर्लज्जपणाचें व क्रूरपणाचें वाटलें. रोझीला तेथें बसावयास सांगून तिच्याबद्दल रदबदली करावयासाठीं ती मेरीबाईसाहेबांचे खोलीकडे गेली.

मेरीबाईसाहेब ईझी चेअरवर बसल्या असून मॅमी त्यांचे केस विंचरीत होती. कांहीं औपचारिक प्रश्नानंतर आफेलिया म्हणाली, ' मी गरीब बिचाऱ्या रोझीबद्दल बोलण्यासाठीं आलें आहे. तिला आपले वर्तनाचा पश्चात्ताप होतो आहे—'

' अस्सं ! अजून कुठं पुरा पश्चात्ताप झाला आहे ! आजपर्यंत

भारी मेली दिमाखानं वागत होती. पण आतां म्हणावं माझ्याशीं गांठ आहे. कशी एकेकाला नरम करतें तें नुसतं पहा तर खरं!'

'पण तिला दुसरी कांहीं शिक्षा नाहीं का करतां यायची? यांत तिची बेअब्रू होते आहे!'

'बेअब्रू! होऊं दे झाली तर. तसं व्हायलाच पाहिजे आहे! बोलून चालून गुलामांची जात! त्यांना हो कसली अब्रू नी बेअब्रू! तिच्या डोक्यांतलीं हीं भलतींच खुळं मला काढूनच टाकायचीं आहेत मुळीं!'

'पण या निर्दयपणाबद्दल देवापाशीं तरी तुम्हांला जाब द्यावा लागेल हें लक्षांत ठेवा!'

'निर्दयपणा? यांत कसला हो निर्दयपणा? हलक्या हातानं तिला फक्त पंधराच फटके द्यायचे! तुम्ही या लोकांना आपणांसारखे समजतां म्हणून तुम्हाला हा निर्दयपणा वाटतो पण तुम्हांला त्यांचा अनुभव नाहीं. त्यांच्याशीं असंच वागलं पाहिजे, म्हणजे ते सरळ असतात!'

मेरीसाहेबाशीं आतां या बाबतींत जास्त बोलण्यांत कांहीं अर्थ नाहीं हें मिस आफेलियाला चक्क दिसून आलें. पण परत जाऊन रोझीला आपल्या शिष्टाईस यश आलें नाहीं हें सांगायचें तिच्या जिवावर आलें. थोड्याच वेळानें एका नोकरानें रोझाला खेचून शिक्षा-गृहाकडे नेलें!

यानंतर कांहीं दिवसांनीं सेंटक्लेअरचा हुजऱ्या ॲडॉल्फ टॉमला म्हणाला 'टॉम! लवकरच बाईसाहेब आपणा सर्वांना विकून टाक-णार आहेत!'

'तें कसं काय?' टॉमनें आश्चर्यानें विचारलें.

'बाईसाहेबांचें वकिलाशीं चाललेलें खलबत मीं आडून ऐकलें.

लवकरच लिलांवाच्या बाजारांत आपली रवानगी होईलसं दिसतं ! बाकी असल्या बाईच्या हाताखालीं दिवस काढण्यापेक्षां लिलांवानें विक्री झालेली कांहीं वाईट नाहीं म्हणा !'

'काय प्रभूची इच्छा असेल तसं घडेल !' टॉम एक दीर्घ सुस्कारा सोडून म्हणाला.

नंतर टॉम तेथून निघून गेला त्याचें हृदय दुःखानें व्याप्त झालें ! थोड्याच दिवसांपूर्वी आपण लौकरच आपले बायकामुलांत जाऊन पडणार अशीं सुखस्वप्नें त्याला पडत होतीं. ही बातमी ऐकून त्या सर्वांचा चक्काचूर झाला ! तान्हलेल्याला महत्प्रयासानें पाणी प्यायला मिळावें व तें पिण्यासाठीं मोठ्या अधाशीपणानें त्यानें तोंडाजवळ न्यावें तोंच दुर्दैवानें तें सांडून जावें म्हणजे त्याची जशी अवस्था होते तशी टॉमची स्थिति झाली. त्यानें आपले अश्रु पुसले व हात जोडून तो म्हणाला, 'देवा ! काय तुझी इच्छा आहे तें कळत नाहीं !'

मिस आफेलिया टॉमशीं सहानुभूतीनें वागे. तिच्याकड जाऊन धन्यानें आपणास स्वतंत्र करण्याचें वचन दिलें होतें हें मेरीबाई-साहेबांना सांगून त्यांचें मन वळविण्याबद्दल टॉमनें विनंति केली.

'टॉम ! तुझ्यासाठीं मी शक्य ती खटपट करीन. परंतु हें जर सर्वस्वीं मेरीच्याच मर्जीवर अवलंबून असेल तर बरीक कठीण आहे रे बाबा ! कांहीं असलं तरी माझ्याकडून मी आपली शिकस्त करतें.'

इतकें बोलून मिस आफेलिया हलकेंच मेरीबाईसाहेबांचे खोली-कडे गेली मागील खेपेपेक्षां यावेळीं जरा दमानें घ्यायचें तिनें ठरविलें.

मेरीबाईसाहेबांनीं आपण वकिलाचे व सेंटक्लेअरच्या बंधूंचे सल्ल्या-वरून सर्व इस्टेटीची निरवानिरव करून लवकरच माहेरीं राहावयास जाण्याचें ठरविलें असल्याचें मिस आफेलियाला सांगितलें. तेव्हां आफेलिया म्हणाली, 'मला एका बाबतींत बोलायचं आहे—'

'काय ?'

'भाऊनें टॉमला स्वातंत्र्य देण्याचें वचन दिलें होतें व वकिलाकडे कायदेशीर कागद करायलाहि पाठविले होते. त्याच्या आकस्मिक मरणानें तें काम तसंच राहून गेलं आहे. तेवढं तुम्ही पुरं करून टाकावं अशी माझी इच्छा आहे.'

'भलतंच ! टॉम तर आमच्या साऱ्या मंडळींत मूल्यवान जिन्नस ! त्याला सोडून कसं चालेल ? हल्लींची त्याची स्थिति काय वाईट आहे ? त्याला स्वतंत्रता हवी कशाला ?'

'पण त्याला स्वातंत्र्याची आवड आहे. शिवाय भाऊनं त्याला तसं वचनही दिलं होत--!'

'अस्सं ! ही मेली गुलामांची जातच भारी असंतुष्ट ? त्यांच्यासाठीं कांहीं करा, त्यांची म्हणून तृप्ति कधीं झाली आहे ? त्यांना स्वतंत्रता पाहिजे ! कशाला माहीत आहे ? हवंतसं वागायला नी दारू पिऊन गोंधळ घालायला ! दुसरं काय ? छेः मला हें मुळींच पसंत नाहीं ! या लोकांना कोणी तरी धनी पाहिजेच ! तस्च ते चांगले वागतात. यांना स्वतंत्र केलं कीं मग काय विचारतां ? गाढवांचा गोंधळ नी लाथांचा सुकाळ !'

'पण टॉम कांहीं इतरासारखा नाहीं. तो किती कष्टाळू व सद्गुणी आहे बरं !'

'असेल, अहो असे कैक मीं पाहिले आहेत. कांहीं झालं तरी त्याला धनी पाहिजेच !'

'त्याला विकायला काढायचं म्हणजे त्याला कसला धनी मिळतोय कोण जाणें ! एखादा दुष्ट क्रूर धनी मिळाला तर त्याची कशी दुर्दशा होईल बरं ?'

'कांहीं तरी बोलतां झालं ! अहो, या लोकांची धन्याविरुद्ध नेह-

मींच तक्रार चालायची ! आपणाला नीट वागायला नको, तिथं बिचारा धनी काय करील ? माझा सारा जन्म इथं दाक्षिणेंतच गेला ना ? एकहि वाईट धनी मीं कधीं पाहिला नाहीं ! शिवाय गुलाम जर चांगला असेल तर त्याला धनी तरी वाईट रितीनं वागविल कसा ?'

मेरीबाईसाहेबांची समजूत कशी करायची हेंच आफेलियाला कळेना. शेवटीं ती म्हणाली, 'तें कांहीं जरी असलं, तरी तुमच्या पतीची ही शेवटची इच्छा अपुरी राहिली आहे. इव्हाच्या अंतकाळीं त्यानं तिला याबद्दल वचन दिलेलं आहे. म्हणून म्हणतें निदान आपल्या लाडक्या मुलीसाठीं व नवऱ्यासाठीं तरी टॉमला मुक्त करणं तुमचं कर्तव्य आहे.

झाले, आफेलियाचे भात्यांतले सर्व बाण संपले ! आपल्या या भाषणानें मेरीला द्रव येईल व ती अतिशय आढेवेढे घेणार नाहीं असें तिला वाटलें, पण मेरी कसली वस्ताद ! ती एकदम स्फुंदून रडूं लागली व म्हणते, 'सगळं जगच जर माझ्याविरुद्ध उठलं आहे तर तिथं तुम्ही तरी कां कमी कराल ? त्यांच्या आठवणीनं मला किती दुःख होतं तें एक माझ्या जिवालाच माहीत ! माझी एकुलती एक लाडकी इव्हा व सोन्यासारखे पति मला टाकून गेले ! त्यांचं स्मरण नको, ती दुःखद आठवण नको !—देवा ! मी हें सहन तरी कसं करूं म्हणतें !! वन्सं ! मी तें दुःख विसरण्याचा कसाबसा प्रयत्न करतें तर तुम्ही मुद्दाम त्यांची आठवण करून देऊन माझ्या दुःखावर डागण्या कां देतां ? तुमचा हेतु चांगला असेल, पण त्यामुळं माझ्या काळजाला घरें पडतात हो ? अग मॅमी ! मेली गेली तरी कुठं ? ती खिडकी उघड. माझा जीव कसा गुदमरून गेला आहे ! अन् ती मेंथालची बाटली आण, आटप, मला नाहीं हें सहन होत !

या आरडा ओरडींत बिचारी आफेलिया हळूंच तेथून निसटली.

टॉमबद्दल तिला फार वाईट वाटलें. तिच्याकडून होण्यासारखी आतां एकच गोष्ट होती ती म्हणजे टॉमची जुनी मालकीण मिसेस शेल्बी यांना या साऱ्या हकीगतीचं पत्र पाठवून टॉमला लौकर सोडवून नेण्याबद्दल कळविणें व ती तिनें केली. मिसेस शेल्बीकडे पत्र रवाना झाले, मिस आफेलिया टॉप्सीला घेऊन आपले घराकडे परत जाण्यासाठीं निघाली व दुसरेच दिवशीं अॅडॉल्फ टॉम वगैरे विकाऊ गुलामांना गुलामांचे वखारीकडे लिलांवासाठीं पाठविण्यांत आलें !

---

## प्रकरण २८ वें.

### गुलामांचा बाजार.

आपला माल चांगला खपावा अशी इच्छा असेल तर आपले दुकानची जागा हवाशीर व स्वच्छ पाहिजे, मालहि गिऱ्हाकाचे डोळ्यांत भरण्यासारखा झाडून पुसून नीट ठेवला पाहिजे व गिऱ्हाइकांशीं सभ्यपणानें वागून आपला माल घेण्याबद्दल त्यांच्यांत आवड उत्पन्न केली पाहिजे हें व्यापाराचें आद्यतत्त्व गुलामांचे वखारवाल्यांना चांगलें अवगत होतें, यामुळें गुलामांचे वखारीची जागा प्रशस्त, हवाशीर व कोणाहि मनुष्यास येण्याजाण्यास सोईची अशी असे. त्या ठिकाणीं आई, बाप, मुलें, बहिणभाऊ इ. सर्व प्रकारचा माल पाहिजे तर गटागटानं किंवा सुटा जसा पाहिजे असेल तसा लिलांवानें विकला जाई. आपला चालता बोलता माल गिऱ्हाइकाला पसंत पडून जास्त किंमत येण्यासाठीं वखारवाले गुलामांना आनंदी राखण्याचा प्रयत्न करीत.

गुलामांची पैदास करून त्यांची वाढ करण्याचा कांहीं लोकांचा

धंदा होता. हे लोक उत्तरेकडील संस्थानांत–विशेषत: व्हर्जिनिया व केंटुकी संस्थानांत गुलाम विकत घेत, त्यांना खाऊपिऊ घालून धष्ट-पुष्ट बनवीत व त्यांना सक्तीनें आनंदी मुद्रा धारण करायला लावून व त्यांच्यातील कोमल भावनांचा शक्य तों चुराडा करून त्यांना विक्रीसाठीं न्यूअरलिन्सला पाठवीत.

न्यूअरलिन्समधील अशाच एका गुलामांचे वखारींत टॉम, अॅडाल्फ वगैरे सेंटक्लेअरचे गुलाम संध्याकाळीं लिलांवासाठीं येऊन पडले. दुसरे दिवशीं त्यांचा लिलांव व्हायचा होता. टॉमनें इतरांप्रमाणेंच आपले सामानाची ट्रंक बरोबर आणली होती. पुरुष मंडळी असलेले दालनांत गाणें–बजावणें व हास्यविनोद चालला होता. तेथें एका बाजूला टॉम व अडॉल्फ खिन्नपणें बसले होते; तेथील मंडळीपैकीं कोणीही दु:खी कष्टी असूं नये अशी वखारवाल्याची इच्छा असल्यामुळें तो त्यांना हास्यविनोद करून करमणूक करून घ्यायला उत्तेजन देत असे.

टॉमचा खिन्नपणा वखारवाल्याचे एका बगलबच्चास आवडला नाहीं. त्यानें टॉम व अडॉल्फ यांची कानउघाडणी करण्याचा प्रयत्न केला. टॉम कांहीं बोलला नाहीं पण तापट स्वभावाच्या अॅडॉल्फला तें कुठलें सहन व्हायला ? त्यानें त्या बगलबच्च्याची कणीक चांग-लीच तिंबली.

मंडळींची आरडाओरड ऐकून वखारवाला तेथें आला व आपले हस्तकाचे सांगण्यावरून टॉम व अडॉल्फ यांना लाथाबुक्यांचा प्रसाद देऊन व सर्वांना आनंदी राहण्याबद्दल बजावून तेथून निघून गेला.

पलीकडील दालनांत स्त्रियांना ठेवलें होतें. तेथें लहान बालिके-पासून जख्खड थेरडीपर्यंत सर्व वयाच्या अगदीं काळ्याकुळकुळीत, थोड्याशा काळ्या, गौरवर्णाच्या इ. विविध रंगाच्या स्त्रिया होत्या. एका कोपऱ्यांत खानदानींच्या घराण्यांतील स्त्रियांप्रमाणें दिसणाऱ्या

दोघी मायलेकी बसल्या होत्या. त्यांपैकीं आईचें नांव सूरून व मुलीचें एमिलिन होतें. सूरून वयानें सुमारें चाळीस पंचेचाळीस वर्षांची व किंचित् काळसर असून तिनें चांगला पोशाख केला होता. एमिलीन सुमारें चवदा पंधरा वर्षें वयाची असून गौर वर्णाची, नाजूक व सुस्वरूप होती. या दोधीही मायलेंकी न्यू अरलिन्समधील एका थोर स्त्रीचें घरीं गुलाम होत्या. तिनें यांना चांगल्याप्रकारें वागवून व लिहावयास शिकवून सुशील बनविलें होतें. त्या स्त्रीचे पश्चात् तिच्या चिरंजीवाकडे या स्त्रियांची मालकी आली. उधळेपणामुळें ते कर्जबाजारी झाले व या स्त्रियांवर लिलांवानें विकले जाण्याची पाळी आली. दुसरे दिवशीं टॉम आदि मंडळीबरोबरच यांचाहि लिलांव व्हायचा होता.

एमिलीन आईला निजण्याचा आग्रह करीत होती पण तिला झोप कुठून येणार ? उद्या आपल्या एकुलत्या एक मुलीची व आपली ताटातूट होणार, कसला मालक आपणाला मिळतो कोण जाणे इत्यादि विचार तिला अस्वस्थ करीत होते. तिला स्वतःपेक्षां आपल्या मुलीचीच जास्त काळजी वाटत होती. कसल्याहि नीच मनुष्याला निवळ पैशांच्या जोरावर आपल्या मुलीला विकत घेतां येऊन तिच्या जन्माचें मातेरें करतां येईल हा विचार मनांत येतांच ती इतकी सुंदर नसती तर बरं होतं असेंहि तिला वाटलें. आपण किती चांगल्या स्थितींत दिवस काढले पण आतां काय आपल्या नशिबीं काय आहे कोण जाणें !

दुसरे दिवशीं सकाळीं वखारींत एकच गडबड उडून गेली. माल पाहण्यासाठीं लोकांचे थवेच्या थवे जमूं लागले. लिलांव सुरू झाला. सेंटक्लेअरचे गुलामांचा गट प्रथम लिलांवास निघाला. अडॉल्फला घेण्याचें एका गृहस्थाचे मनांत आलें, तेव्हां 'हा सेंटक्लेअरचे घरचा असून त्यानें याला भलभलत्या संवयी लावल्या आहेत, संभाळा' असा

त्याचे स्नेह्यानें त्याला इषारा दिला. तेव्हां तो म्हणाला' ' जाऊं ह्या हो, सेंटक्लेअरचे घरचा असूं दे नाहींतर सैतानाचे घरचा असूं दे; शिक्षागृहाकडे एकदोनदां पाठवून साफसूफ करून आणला कीं कसा वागतो तें पहा ! ' अखेर याच गृहस्थानें अँडाल्फला विकत घेतलें.

टॉम जमलेल्या मंडळीचे चेहऱ्याकडे बारकाईनें पहात होता. परंतु त्यांत त्याला सेंटक्लेअरसारखा मायाळू चेहऱ्याचा एकहि मनुष्य दिसला नाहीं; इतक्यांत गर्दीतून वाट काढीत एक भला धटिंगण तेथें आला. त्याची मुद्रा क्रूर असून कपडे घाणेरडे होते. त्याला पाहतांच टॉमला धडकीच भरली ! हे सद्गृहस्थ आपले मालक न होतील तर बरें असें त्याला वाटलें, पण भवितव्यता टाळणें त्याचे हातीं थोडेंच होतें ? या गृहस्थाचें नांव सायमन लेग्री असून ताम्र (Red River) नदीच्या काठावरील एका कापसाचे मळ्याचा तो मालक होता.

सायमन लेग्रीनें टॉमची तपासणी चालविली. त्यानें टॉमचा जबडा उघडून त्याचे दांत पाहिले, अस्तन्या वर करून हात मजबूत असल्या-बद्दल खात्री करून घेतली, त्याला आडवा तिडवा फिरवून उड्या मारायला व चालायला लावलें. नंतर त्यानें टॉमला त्याची माहिती विचारली व तो पुढें सूरुन व एमिलीन उभ्या होत्या तिकडे गेला. एमिलीनला पाहतांच त्यानें आपले राकट हातानें तिला खसदिशीं आपणाकडे ओढलें व टॉमप्रमाणेंच तिची परीक्षा चालविली. या प्रकारानें घाबरून एमिलीन रडूं लागली ! वखारवाल्याचे मनुष्यानें तिला आनंदी राहण्याबद्दल बजावलें ! बिचारी सूरुन भग्नदंत सर्पा-प्रमाणें सुस्कारे सोडीत खाली मान घालून उभी होती !

टॉमचा लिलांव सुरू झाला. लिलांववाला त्याचे गुणवर्णन करूं लागला. भराभर किंमत चढूं लागली. लिलांव पुरा झाला. लेग्रीमहाश-यांनींच टॉमला विकत घेतलें नंतर सूरुनचा लिलांव झाला. तिला ज्या

गृहस्थानें घेतलें त्यालाच आपले मुलीलाहि विकत घेण्याबद्दल तिनें कळवळून विनंति केली. त्याला तिची दया येऊन त्यानें तें कबूल केलें परंतु एमिलीन सायमन लेग्रीचे डोळ्यांत भरली असल्यामुळें त्याच्याशीं चढाओढींत या गृहस्थाचा निभाव लागला नाहीं व अखेर एमिलीन लेग्रीचेच मालकीची झाली ! अशा रितीनें लेग्रीनें न्यू अर-लिन्समध्यें एकंदर आठ गुलाम विकत घेतले व त्यांना साखळ-दंडानें जखडून ताम्रनदींतील बोटींतून आपले मळ्याकडे चालविले.

---

## प्रकरण २९ वें.

### सायमन लेग्री

बोटींतील तळमजल्यावर हातपायांत बेड्या असलेला टॉम विष-ण्णपणें बसला होता. बेड्यांच्या वजनापेक्षांहि त्याच्या अन्तःकरणावर पडलेलें निराशेचें दडपण मोठें होतें ! केंटुकींतील घर, बायका-मुलें, शेल्बी कुटुंब, नंतर सेंटक्लेअरचे घरांतील सुखमय आयुष्य, व सेंटक्लेअर व इव्हा या आनंदी व मायाळू पितापुत्रींचा प्रेमळ सहवास—हीं सर्व आपल्याला कायमचीं अंतरलीं व आपल्या वांट्याला आतां काय येणार आहे ?—

गुलामगिरीच्या अनेक दोषांत मोठा दोष हा कीं, एखाद्या सुसंस्कृत कुटुंबांत सुखानें दिवस काढलेल्या गुलामाला जर दुर्दैवानें नीच क्रूर माणसांच्या पदरीं पडावें लागलें तर त्याची स्थिति अत्यंत वाईट होते. देवालय बांधण्याचे कामीं उपयोगांत आणलेल्या दगडाची कालांतरानें शौचकूपांत स्थापना व्हावी त्यांतलाच हा प्रकार असतो. फरक इतकाच कीं दगडाला भावना नसल्यामुळे सुखदुःखाची जाणीव नसते !

सायमन लेग्री म्हणजे मनुष्य वेषधारी राक्षस होता. तो टॉम-जवळ आला व त्याची ट्रंक उघडून घोड्याला खरारा वगैरे करतांना घालण्यासाठीं टॉमनें ट्रंकेंत ठेवलेली जुनीपुराणी तुमान व तसलाच कोट त्यानें बाहेर काढला व टॉमला ते कपडे घालायला लावून त्याचे अंगांतील चांगले कपडे त्यानें काढून घेतले. त्याचप्रमाणें टॉमचे पायांतील पॉलीश केलेले चकचकीत बूट काढून घेऊन त्याबद्दल भिकार व टाकाऊ बूट त्यानें त्याला घालायला दिले. कपडे घालतां काढतांना त्यानें टॉमच्या हातबेड्या काढल्या होत्या. तेवढ्यांत संधी साधून लेग्रीला कळूं न देतां टॉमनें आपलें बायबल कोटाचे खिशांत लपविलें. तरी त्याचें स्तोत्रांचें पुस्तक लेग्रीला ट्रंकेंत सांपडलेंच तें पाहून तो म्हणला, ‘ तूं मोठा धार्मिक दिसतोस. पण माझ्या इथं धर्म-बिर्म कांहीं नाहीं समजलास ! आजपासून मीच तुझा देव ! माझीच तूं मनोभावानें उपासना केली पाहिजेस ! ’

टॉमचे अन्तःकरणाचा सूर सांगत होता कीं, “ नाहीं ! लेग्री केव्हांहि तुझा देव होणं शक्य नाहीं ! तुला तारणारा प्रभू निराळाच असून तो सदैव तुझ्या पाठीशीं उभा आहे. भिऊं नको. त्याच्यावर निश्चित रहा ” !

लेग्रीसारख्या नरपशूला टॉमचे हृदयांतील ही देववाणी कोठून ऐकायला येणार ? टॉमच्या अवनत मुखाकडे त्यानें एकवार पाहिले व त्याचे ट्रंकेंतील सामानाचा व त्या ट्रंकेचा टॉमचे डोळ्यांदेखत लिलांव करून आलेले पैसे त्यानें आपले खिशांत घातले ! तो टॉमला म्हणाला, ‘ उगीच फालतूक सामान संभाळायच्या कटकटींतून मीं तुला मोकळा केला आहे. आतां हे कपडे नीट वर्षभर पुरीव, मध्यंतरीं मी कोणाला कपडे देत नसतो. ’

इतकें बोलून तो एमिलिन होती तिकडे गेला. तिला व ल्यूसी नांवाच्या एका पोक्त म्युलॅटो स्त्रीला साखळदंडानें एकत्र जखडलें होतें. एमिलीन भीतीनें थरथर कांपत होती व ल्यूसी खिन्नपणें बसली होती. त्या दोघींकडे पहात तो म्हणाला, 'हें पहा, माझ्याजवळ असलं चालायचं नाहीं ! मी येईन तेव्हां तुम्ही दोघांनीं सस्मित मुद्रेनें माझ्याकडं पाहिलं पाहिजे !' नंतर आपल्या सर्व गुलामांकडे पहात लेग्रीसाहेब गरजले, 'अरे मी काय सांगतो तें नीट ऐका ! ही बघितलीत का माझी वज्रमुष्टी ! गुलामांना कुबलून कुबलून कशी ही टणक बनली आहे ! कसलाही खट्याळ गुलाम असो, हिच्या एका प्रहारानं मी त्याला गोगलगाय करून सोडतों. माझ्या तोंडून शब्द निघतांच मी म्हणेन तें काम उठलंच पाहिजे. नाहींतर माझ्याशीं गाठ आहे हें लक्षांत ठेवा ! दयामाया माझ्याजवळ कांहीं एक नाहीं !'

नंतर थोड्या अंतरावर आपलें भाषण ऐकत उभ्या असलेल्या एका गृहस्थाकडे जाऊन लेग्री त्याला म्हणाला, 'माझा बुवा खाक्या असा आहे ! आरंभींच या लोकांना नीट समज दिलेली असली म्हणजे पुढं कटकट करीत बसायची पाळी येत नाहीं ! माझी ही मूठ तर बघा, कशी दगडासारखी कठीण झाली आहे ती !'

त्या गृहस्थानें सायमनचे मुठीस हात लावून म्हटलें, 'आहे खरी बुवा ! मला वाटतं तुमचं हृदय सुद्धां असंच कठीण असेल नाहीं?'

हें ऐकून लेग्रीला अत्यानंद झाला. तो हंसत म्हणाला, 'तें काय विचारतां ? माझ्यासारखा कठोर अन्तःकरणाचा, मला वाटतं, तुम्हांला कोणीच भेटायचा नाहीं. माझ्यापुढं कोणाचीच मात्रा चालायची नाहीं ! गुलाम तर मला असे वचकून असतात कीं बोलायची सोय नाहीं ! अहो, त्यांची पर्वा ठेवतो कोण ? चांगले ठोकून काम करून घेतों !'

'मग आपणाकडे गुलाम फार दिवस टिकत नसतील ?'

'ज्याच्या त्याच्या मगदुराप्रमाणें टिकतात. चांगले धट्टेकट्टे असतील ते सात आठ वर्षें काम देतात, बाकी सटरफटर दोन तीन वर्षांतच आटपतात. पूर्वीं मी त्यांना फार जपत असे व आजारी बिजारी पडले तर औषधपाणी देऊन त्यांची शुश्रूषा करी, पण असं करण्यानं माझे पैसे मात्र फुकट खर्च होऊं लागले. त्यापेक्षां त्यांची दया–माया न करतां चांगले झोडपून त्यांच्यापासून जास्तींत जास्त काम करून घ्यावं व मेले तर त्यांचे जागीं दुसरे आणावे असं मीं चालवलं आहे व हेंच मला फायदेशीर पडतं !'

तो गृहस्थ कांहीं न बोलतां तेथून निघून गेला व दुसऱ्या एका गृहस्था-जवळ जाऊन बसला. त्या गृहस्थानें आतांचें संभाषण ऐकलें होतें. तो पहिल्या गृहस्थास म्हणाला, 'तो मनुष्य म्हणजे शुद्ध पशु आहे ! त्याच्यासारखेच दक्षिणेंतील इतर मळेवाले आहेत असं मात्र समजूं नका हं ! समाज म्हटला म्हणजे तिथें भलेबुरे लोक असायचेच !'

पहिला गृहस्थ रागानें म्हणाला, 'असल्या मनुष्याला आपल्या गुलामांवर हवीतशी अरेरावी चालवायला कायद्यानें मुभा असावी ना? तुम्ही म्हणतां कीं सगळेच कांहीं याच्यासारखे नाहींत. नसतील, कांहीं चांगले असतील. पण तेंच तर वाईट आहे ! सगळेच मालक याच्यासारखे पशु असते तर गुलामगिरीचे केव्हांच बारा वाजले असते ! पण कांहीं मालक चांगले असल्यामुळेंच या नीचांना त्यांच्या चांगुलपणाचा फायदा मिळून हवे तसे अत्याचार करतां येतात !'

पहिल्या गृहस्थाचें हें आवेशपूर्ण भाषण ऐकून दुसरा म्हणाला, 'मेहरबान, जरा हळूं बोला. तुमचं म्हणणं जरी खरं असलं तरी तें पटण्यासारखी सगळींच माणसं या बोटीवर नाहींत ! आपण आपल्या मळ्यांत गेलों म्हणजे मी आहे नी तुम्ही आहां. लागेल तितक्या

शिरा ताणा. चला, उगीच कां जिवाचा संताप करून घेतां! आणि बुद्धिबळाचा एक डाव टाकूं या!'

पहिल्या गृहस्थाला हें म्हणणें पटलें व त्यांचा बुद्धिबळांचा डाव सुरू झाला.

याच वेळीं एमिलिन व ल्यूसी एकमेकींना आपली हकीगत सांगत होत्या. ल्यूसी म्हणाली, 'माझ्या धन्याचं नांव एलिस. तो प्रथम आमच्याशीं चांगल्या रीतीनें वागे. पुढं तो आजारी पडला. चांगला सहा महिने तो आजारी होता. त्यामुळं त्याचा स्वभाव भारीच चिड-खोर बनला. कांहीं केलं तरी त्याच्या मनाला म्हणून येईना. मला रोज रात्रीं त्याच्या शुश्रूषेसाठीं जाग्रणं पडूं लागलीं. एक दिवस माझा सहज डोळा लागला तर त्याची तब्येत गेली व त्यानं मला विकायला काढलं. माझा नवरा घिसाड काम करतो. आम्हांला चार मुलं आहेत. मला विकायचं ठरल्यावर त्या लोकांनीं मला इतक्या तावडतोब जलदीनं नेलं कीं नवऱ्याची व माझी शेव-टची दृष्टिभेटहि झाली नाहीं!' इतकें बोलून ल्यूसी रडूं लागली. एमिलीननें तिचें कसेंबसें समाधान चालविलें.

ताम्र नदींतील तांबूस गढूळ पाण्यांतून बोटीचा प्रवास सुरू होता. शेवटीं एका लहानशा बंदरावर बोट थांबली व लेग्री आपले गुलामां-सह तेथें उतरला.

---

## प्रकरण ३० वें.

### लेग्रीचे मळ्यांत.

सायमन लेग्री एका खटाऱ्यांतून आपले मळ्याकडे निघाला. गाडींत तो, एमिलिन व ल्यूसी बसलीं असून टॉम व इतर गुलाम

गाडीचे मागून पायींच चालले होते. त्यांना लोखंडी कडीतोडे घातलेले होतेच ! रस्ता अत्यंत खराब व कंटाळवाणा असल्यामुळें ही सर्व मंडळी रे रे करीत चालली होती. वेळ जाण्यासाठीं लेग्रीचे आज्ञेवरून गुलामांपैकीं कांहींनीं लावणीवजा एक दोन गाणीं म्हटलीं व त्यामुळें सर्वांची घटकाभर करमणूक झाली.

गाडी आतां लेग्रीचे मळयाजवळ आली होती. मळ्यांतील दुमजली बंगलेवजा इमारत दिसूं लागली. पूर्वी हा मळा व बंगला एका हौशी व श्रीमंत गृहस्थाचे मालकीचा होता. त्यानें त्याची उत्तम निगा राखली होती. पण तो कर्जबाजारी होऊन वारल्यामुळें लेग्रीनें तो विकत घेतला. लेग्रीची दृष्टि निवळ पैसे मिळविण्याचीच असल्यामुळें या बंगल्याचे दुर्दशेस सुरवात झाली व एका काळीं सुंदर दिसणारी ती इमारत आतां भयाण व ओसाड दिसूं लागली.

गाडी बंगल्याचे कापांउंडजवळ उभी राहतांच तिच्या आवाजामुळें जागृत झालेले तीन चार भयंकर कुत्रे नवख्या लोकांना पाहून एकदम त्यांच्या अंगावर धांवून आले. त्यांच्या पाठोपाठ आलेल्या नोकरांनीं त्यांना आवरून धरलें म्हणून बरें झालें, नाहींतर त्यांनीं या लोकांचे लचके तोडायला कमी केलें नसतें !

लेग्री या नवीन गुलामांना उद्देशून म्हणाला, 'पाहिलींत हीं भयंकर कुत्रीं ! यांना मीं मुद्दाम गुलामांचा पाठलाग करून त्यांना धरण्यासाठीं शिकवून तयार ठेवलें आहे. एथून पळून जाण्याचा प्रयत्न करणाराला हीं कुत्रीं फाडून खातील हें लक्षांत ठेवा !' नंतर तेथील दोघां निग्रोंकडे पहात तो म्हणाला, 'कसं काय सांबो–किंबो, सर्व ठीक आहे ना ?'

'होय महाराज !'

सांबो व किंबो म्हणजे लेग्रीचे उजवे डावे होते म्हणाना ! लेग्रीनें

त्यांना जंगली जनावरासारखे वाढवून पशूपेक्षांहि पशु बनविलें होतें ! धन्याला खूष ठेवण्यासाठीं आपल्याच जातीच्या लोकांवर हवेतसे अत्याचार करायला या दोघांना काडीचीही दिक्कत वाटत नसे. 'फोडा व झोडा' या तत्त्वावर लेग्री आपले मळ्याचा कारभार पहात असल्या-मुळें त्यानें या दोघांत परस्पर स्पर्धा लावून दिलेली होती. ते दोघे एकमेकांचा द्वेष करीत व इतर गुलाम या दोघांनाही पाण्यांत पहात. अशा रितीनें तेथें तीन पक्ष झालेले होते. या तीनही पक्षांतील मंडळी एकमेकांच्या चहाडया सांगण्यांत पटाईत बनलेली होती.

बंगल्यापासून बऱ्याच अंतरावर गलिच्छ जागेंत ओबडधोबड झोपड्यांची एक रांग गुलामांना राहण्यासाठीं बांधलेली होती. तिकडे टॉम सांबोबरोबर गेला. तेथील घाण हवेनें टॉमचें डोकेंच उठलें ! त्याला वाटत होतें कीं ओबडधोबड कां होईना पण एखादें स्वतंत्र व हवाशीर खोपटें आपणास मिळेल, आपण तें झाडून लोटून स्वच्छ करून घेऊं व एखादी घडवंची निदान फळी मिळाल्यास तीवर आपलें बायबल ठेवूं. त्यानें बहुतेक झोपड्या पाहिल्या त्या ठिकाणीं टेबल, खुर्ची, बांक वगैरे कांहींच नव्हतें. धुळीनें भरलेलें गवत मात्र जमीनी-वर इतस्ततः पसरलेलें होतें ! या खोपटांपैकीं आपल्या वाट्याला कोणतें येणार तें त्यानें सांबोला विचारलें तेव्हां तो म्हणाला, 'कोणची कसलें ? यांतच कुठं तरी पडयाचं झालं.'

मळ्यांत सर्व दिवसभर जिवापाड कष्ट करून थकलेली व अंगांत घाणेरडीं लकतरें असलेली गुलाम मंडळी संध्याकाळीं या झोपड्यांकडे आली. यापुढें त्यांना धान्य दळून व त्याच्या भाकरी करून खायच्या होत्या ! तो कापसाचा हंगाम असल्यामुळें त्या लोकांना झोडपून सर्व दिवसभर त्यांच्याकडून जास्तींत जास्त काम करून घेण्यांत येई. य लोकां-पैकीं एखादा तरी स्नेह करण्याचे लायकीचा आहे काय हें पाहण्यासाठीं

टॉमनें त्या सर्वांचे चेहऱ्यांकडे आळीपाळीनें पाहिलें. त्या सर्वांचीं तोंडें दुःखानें व निराशेनें काळवंडलेलीं व भेसूर दिसत होतीं. सतत अमानुष छळ सोसावा लागत असल्यानें दयामाया इत्यादि कोमल मनोविकारांना ही मंडळी पारखी होत चालल्याचें स्पष्ट दिसत होतें. तेथें जात्यांची संख्या थोडी होती. यामुळें अगोदर जागा मिळण्यासाठीं त्यांच्यांत धक्काबुक्की चाले व मध्यरात्रीपर्यंत हें दळणवळणाचें काम सुरू असे.

सांबो ल्यूसीजवळ आला व धान्याची एक पिशवी तिला देऊन म्हणाला, तुझं नांव काय ?'

'ल्यूसी.'

'अस्सं. बरं ल्यूसी, तुझ्या या कारभाऱ्यासाठीं झटपट दळण आटोपून भाकरी तयार कर पाहूं ?'

'कारभारी ! कुणाचा रे मेल्या कारभारी ? माझे कारभारी न्यू अरलिन्सला राहिले. तुझा माझा काय संबंध ?' ल्यूसी रागानें म्हणाली.

'असं काय ? लाथा खाशील झालं अशा वागण्यानं !' असें म्हणून साबोनें लाथ उचलली.

'मार ! मेल्या मला एकदा ठार मार म्हणजे तूं सुटलास आणि मीहि सुटलें ! जितक्या लवकर मला मरण येईल तितकं बरंच !' ल्यूसी उत्तरली.

'तूं अशा रीतीनं धनीसाहेबांच्या गुलामांना छळून कामाला अशक्त करतोस हें मी त्यांना सांगून तुझी खोड मोडीन !' किंबो ओरडला. यामुळें सांबोला त्याच्यावर दांत ओठ खात गप्प बसावें लागलें.

टॉम थकून गेला असल्यामुळें त्यालाहि भूक लागली होती. किंबोनें त्याचेकडे एक धान्याची पिशवी फेकली व तो म्हणाला, 'ही घे रे तुझीं वटणी, नीट संभाळ. हें आठवडाभर पुरलं पाहिजे बरं का ?'

टॉमनें मुकाट्यानें ती पिशवी घेतली व जातें रिकामें होण्याची

वाट पहात तो बसला. त्याला बराच वेळ थांबावें लागलें. दोन बायका दळत होत्या. अतिशय थकल्यामुळें त्या बिचाऱ्यांना जातें ओढवत देखील नव्हतें. टॉमला त्यांची दया आली. त्यानें त्यांचें धान्य दळून दिलें व विस्तव पेटवून दिला. मग तो आपलें धान्य दळावयास लागला. त्या बाया आश्चर्यानें स्तंभितच झाल्या, कारण तेथें अशा-प्रकारचें कृत्य दुर्मीळ होतें. त्यांनीं टॉमच्या भाकरी आपण होऊनच भाजून दिल्या.

जेवण होतांच विस्तवाच्या प्रकाशांत टॉम आपलें बायबल उघडून वाचूं लागला. त्या बायांनीं विचारल्यावरून टॉमनें तें बायबल असल्याचें सांगितलें, तेव्हां त्यांपैकीं एकजण म्हणाली, 'दादा, त्यांत काय लिहिलं आहे तें आम्हांला जरा वाचून तर दाखवा!'

टॉम वाचूं लागला. 'सदैव काबाडकष्ट करणाऱ्या दुःखी लोकांनो, माझ्याकडे या मी तुम्हांला शांति देईन!'

'अहाहा! किती गोड शब्द हे! कोणहो हें बोलत आहे?' एका बाईनें विचारलें.

'परमेश्वर' टॉम उत्तरला.

'परमेश्वर! हा परमेश्वर असतो कुठं तें तरी मला एकदां कळूं दे! म्हणजे त्याच्याकडं जाऊन आमच्या दुःखाची कहाणी तरी मी त्याला सांगेन!'

'तो सर्व चराचरांत भरलेला आहे!' टॉम शांतपणें म्हणाला.

'हं! आमचीं दुःखं मग त्याला दिसत कशीं नाहींत! कुठला परमेश्वर नी काय घेऊन बसलांत? आमच्या इथून तरी निदान तुम-च्या त्या परमेश्वराची खास हकालपट्टी झालेली आहे!!'

असें बोलून त्या बायका निजायला गेल्या. टॉमला त्यांचें हें नास्तिकपणाचें भाषण ऐकून वाईट वाटलें. तो मनांत म्हणाला, 'सतत

अपशब्द, मारहाण, हालअपेष्टा याशिवाय या लोकांच्या वाट्याला दुसरें कांहींच येत नाहीं, मग यांनीं असं म्हणूं नये तर काय म्हणावं ? '

नंतर तोहि निजायला गेला. निजलेल्या लोकांच्या श्वासोच्छ्वासानें तेथील दुर्गंधींत अधिकच भर पडली होती. टॉमला तो दर्प सहन होईना ! पण बाहेर दंव पडूं लागल्यामुळें गारठा आलेला होता म्हणून तेथेंच एक रकटें पांघरून तो पडला.

त्याला एक स्वप्न पडलें. आपण सेंटक्लेअरचे बंगल्यांतील लताकुंजांत इव्हासह बसलों असून ती आपणास बायबल वाचून दाखवीत आहे असें दिसूं लागलें. इव्हा वाचीत होती—

' तुझा मार्ग पाण्यांतून असो कीं विस्तवांतून असो; मी तुझा रक्षणकर्ता ईश्वर सदैव तुझ्या पाठीशीं उभा असल्यामुळें तुला पाणी बुडवूं शकणार नाहीं अगर विस्तव भाजूं शकणार नाहीं. '

हे शब्द हलके हलके हवेंत नाहींसे झाले. इव्हानें आपली प्रेमळ दृष्टि त्याचे मुखाकडे लावली. त्याबरोबर तिच्यांतील अमृतकिरण टॉमचे हृदयांत शिरले व त्याचें त्रस्त हृदय शांत झालें. नंतर इव्हा सोनेरी फुलपांखराप्रमाणें भुरकन् उडून गेली व टॉम जागृत झाला.

---

## प्रकरण ३१ वें.

### सत्याग्रह !

थोड्या दिवसांनीं हा नवीन जीवनक्रम टॉमचे अंगवळणीं पडला. त्याचा कष्टाळूपणा व त्याची हुशारी लेग्रीचे लक्षांत आल्यावांचून राहिली नाहीं, तथापि त्याला टॉमचा तिटकारा वाटे. कारण दुर्जनांना जात्याच सज्जनांचा तिटकारा वाटत असतो. टॉम कोमल

मनाचा व मायाळू स्वभावाचा असून आपलें निर्दय वर्तन त्याला आवडत नाहीं हें लेग्रीला कळून चुकलें होतें. त्याला कामानिमित्त मधून मधून बाहेर गांवीं जावें लागे. टॉमला मुकादम करावें व आपले गैरहजेरींत आपले मळ्याची सर्व व्यवस्था त्याचेकडे सोपवावी या उद्देशानें लेग्रीनें त्याला मुद्दाम विकत घेतलें होतें. पण टॉमसारख्या मवाळ माणसाच्या हातून हें काम व्हायचें कसें ? म्हणून टॉमच्या हृदयाचा हा मऊपणा नाहींसा करून त्याला आपल्यासारखाच कठोरहृदयी बनवावयाचें लेग्रीनें ठरविलें.

एक दिवस सकाळीं कामावर जात असतां आपले घोळक्यांत एक नवीन स्त्री टॉमला दिसली, ती उंच, नाजूक बांध्याची, सभ्य स्त्रीला शोभेल असा पोषाख केलेली व कोणाचेंहि चित्त वेधण्यासारखी होती. तिचें वय सुमारें चाळीस वर्षांचें असावें असें दिसत होतें. ती एकेकाळीं सुंदर असावी पण आतां मात्र तिच्या तोंडावर सुरकुत्या पडल्या असून, निराशा व दुःख यांच्या साहचर्यानें तें मलूल झालेलें दिसत होतें. तिचे डोळे काळेभोर व पाणीदार असून हल्लींच्या रोगटपणांतहि त्यांची चमक कमी झालेली नव्हती. इतर मंडळी तिचेकडे पाहून आपापसांत कुजबुजत तिची चेष्टा करीत होती पण त्यांकडे बिलकूल लक्ष न देतां ती चालली होती. टॉम कुलीन सभ्य स्त्रीपुरुषांत वागला असल्यामुळें त्यांचेपैकींच दिसणारी ही स्त्री आपणासारख्या गुलामांत कां येऊन पडली असावी त्याचें त्याला आश्चर्य वाटलें.

या स्त्रीचें नांव कॅसी असून ती लेग्रीचे गुलामांपैकींच होती. पण तो तिला आपले बायकोप्रमाणें वागवीत असे.

मळ्यांत येतांच ती भराभर कापूस वेंचू लागली. त्यावेळीं आपण हें हलकें काम करीत आहों याबद्दल वाटणारा तिटकारा तिचे मुद्रेवर दिसत होता.

दिवसभर टॉम ल्यूसीजवळ कापूस वेंचीत होता. तिची प्रकृति नीट नसल्यानें तिला काम करणें जड जाऊं लागलें व एकदोनदां उन्हानें भोंवळ येऊन ती पडते कीं काय असें टॉमला वाटलें. तो हलकेंच तिचेजवळ आला व त्यानें आमले टोपलींतील बराचसा कापूस ती नको नको म्हणत असतांहि तिचे टोपलींत टाकला. कारण संध्याकाळीं कापूस मोजून घेण्याचे वेळीं तिचा कापूस कमी भरल्यास तिला शिक्षा होईल अशी टॉमला धास्ती वाटत होती.

सांबो ल्यूसीवर नुसता जळफळत होता. त्याच्या नजरेस हा प्रकार पडतांच हातांतील चाबूक फडफडावींत धांवतच तो तिथे आला व ल्युसीला शिव्या देत त्यानें लाथ मारली व टॉमचे तोंडावर हातांतील चाबकाचा फटकारा दिला.

टॉम कांहीं बोलला नाहीं. त्यानें मुकाट्यानें आपलें काम सुरू ठेवले. ल्युसीला भोंवळ आली व ती धाडकन् खाली पडली.

'माझ्यापुढं नाहीं असल्या गमजा चालायच्या समजलीस ? आतां तुला ध्ठणीवर आणतों कीं नाहीं पहा ?' सांबो दांत विचकीत कीत म्हणाला व आपले कोटाचे बाहीतून एक भली मोठी टाचणी काढून ती संबंध त्यानें ल्यूसीचे अंगांत भोंसकली ! ल्यूसी किंचाळतच कशी बशी उठली. तें पाहून तो नरपशु हंसत हंसत म्हणाला, 'आतां कसं ! समजलाना आमच्या इथला ढंगा ! चल उठ, लाग मुकाट्यानं कामाला, नाहीं तर दुसरी टांचणी आलीच बघ !'

भीतीमुळें ल्यूसी कांहीं वेळ जिवापाड काम करूं लागली. तें पाहून सांबो तेथून दुसरीकडे आला. ल्यूसी इवळत म्हणाली, देवा ! माझ्यानं नाहीं रे हें सहन होत ! सोडीव मला एकदांची !'

तिचे हे शब्द ऐकून टॉम पुन: हलकेच तिचेजवळ गेला व त्यानें आपले पाटींतील बराचसा कापूस पुन: तिचे पाटींत घातला. ती

कृतज्ञतेनें त्याचेकडे पहात म्हणाली, ‘ नको रे बाबा असं करूं ! त्या मांगानं बघितल तर तो तुझा जीव घेईल ना ? ’

‘ घेऊं दे ! माझ्यानं असं केल्याशिवाय राहवत नाहीं, त्याला मी तरी काय करूं ? ’

या वेळीं कॅसी कापूस वेचीत वेचीत टॉमजवळ आली होती. तिनें हा संवाद ऐकला. क्षणभर तिनें टॉमकडे पाहिलें व आपले टोपलींतील थोडा कापूस त्याचे टोपलींत टाकून ती म्हणाली, ‘ तूं इथं नवखा दिसतोस. नाहींतर तूं असा वागला नसतास. आणखी कांहीं दिवसांनीं तुलाच कळून येईल कीं इथं स्वतःचीच कातडी बचावतां बचावतां पुरेवाट होते, तर दुसऱ्याला कुठली मदत करायची ? ’

‘ बाईसाहेब ! देवदयेनं असं न घडो ! ’ टॉम उत्तरला.

‘कुठला देव घेऊन बसलास ? आमच्या इथं मुळींच देव नाहीं, मग त्याची दया कुठली आली आहे !’ असें म्हणून ती पुढें गेली.

संध्याकाळ होतांच सर्व मंडळींनीं आपआपल्या पाट्या आपले डोक्यावर घेतल्या व लेग्रीसाहेबांचे बंगल्याचा रस्ता धरला.

सांबो व किंबो हे सर्वांचे पुढें आले होते. त्यांनीं टॉम व ल्यूसी विरुद्ध लेग्रीकडे तक्रार केली. टॉम ल्यूसीला मदत करीत होता हें ऐकून त्याचेकडूनच ल्यूसीला मार द्यावयाचा असें लेग्रीनें ठरविलें. तें ऐकून त्याच्या या हस्तकांना आनंद झाला. टॉम व कॅसी यांनीं मदत करून ल्यूसीची बुट्टी गच्च भरल्यामुळें तिचें माप पुरें होणार व मग तिला शिक्षा कशी करतां येणार अशी भीति त्यांनीं व्यक्त करताच लेग्री म्हणाला, ‘ त्याची नको तुम्हांला काळजी ! वजन करायचं माझ्याच हातांत आहे ना ? ’

थोड्याच वेळांत दिवसभर कष्ट करून थकली भागलेली गुलाम

मंडळी आपापल्या बुट्टयासह कापूस वजन करण्याचे खोलींत आली. लेग्री स्लेट पाटीवर वजन टिपून घेऊं लागला.

टॉमच्या टोपलीचें वजन पूर्ण झालें. यामुळें तो सुटला, पण त्याला बिचाऱ्या ल्यूसीची काळजी वाटत होती.

तिच्या कापसाचें माप पूर्ण भरलें पण ल्यूसीला कांहीं तरी कुरापत काढून मारायचा लेग्रीचा बेत असल्यामुळें तिचेकडें पहात तो गुरगुरत म्हणाला, 'आळशी कुठली ! काम करायला नको ! आजहि तुझं माप भरल नाहीं ! चल बाजूला उभी रहा. तुला चांगली समज दिली पाहिजे !'

ल्यूसी जड अन्तःकरणानें एका बाजूला जाऊन बसली.

नंतर कॅसीनें आपली बुट्टी वजनासाठीं पुढें केली. लेग्रीकडे पहात ती फ्रेंच भाषेंत रागानें कांहीं बोलली व तेथून निघून गेली.

टॉमला हाक मारून लेग्री म्हणाला, 'हें पहा टॉम, तुला मीं असलीं हलकीं सलकीं कामं करायला नाहीं बाराशें डॉलर देऊन विकत घेतला. तुला मुकादम करायचं माझ्या मनांत आहे. आतांपासूनच तूं आपल्या कामास सुरवात कर. या ल्यूसीला चोप देण्याचें काम मी तुझ्यावर सोपवितों.'

'धनीसाहेब ! क्षमा करा, मला असल्या कामाची संवय नाहीं व माझ्यानें तें व्हायचेंहि नाहीं !' टॉम नम्रपणें म्हणाला.

'माझ्या इथं नाहीं असलं चालायचं ! मी सांगेन तें काम उठलंच पाहिजे !' असें म्हणत लेग्रीनें टॉमचे हनवटीवर जोरानें गुद्दा लगावला व नंतर दमेपर्यंत त्याला आणखी पुष्कळ गुद्दे मारून तो म्हणाला 'पुनः असं उत्तर देशील ?'

तोंडावरून वहाणारे रक्ताचे ओघळ पुशीत टॉम उत्तरला, 'होय धनीसाहेब ! रात्रंदिवस आपणांकडं लागेल तेवढं जिवापाड काम मी

करीन, पण असलं अन्यायाचं कृत्य प्राण गेला तरी माझ्यानें होणार नाहीं ! '

टॉमचा मृदु आवाज व त्याचा नम्रपणा पाहून हा एक ढिला प्राणी आहे, त्याला नरम करायला फारसा वेळ लागणार नाहीं अशी लेग्रीची समजूत होती, पण आतांचें त्याचें भाषण ऐकून इतराप्रमाणेंच त्यालाहि आश्चर्य वाटलें. थोडावेळ तो गोंधळला पण लगेच ओरडून म्हणाला, ' काळतोंडया माकडा ! माझा हुकूम तुला अन्यायाचा वाटतो काय ? तुझ्यासारख्या जनावरांना कसला न्याय-अन्याय; माझ्या हुकमांची बजावणी करणं एवढंच तुमचं काम ! तूं आपल्याला समजतोस तरी कोण ? धन्याला न्याय-अन्याय शिकवण्याइतका शिष्टपणा तुझ्या अंगांत केव्हांपासून आला ? त्या पोरटीला मारण्यांत कसला अन्याय आला आहे ! '

धनीसाहेब ! ती आजारी व अशक्त आहे. अशा स्थितींत विनाकारण तिला मारणं म्हणजे अमानुषपणाची कमाल आहे ! तिलाच काय, पण या मंडळीपैकीं कुणालाच मारण्याचं काम माझ्या हातून व्हायचं नाहीं. पाहिजे तर माझा जीव घ्या, पण असलं नीच काम मला सांगूं नका ! '

टॉम जरी सौम्यपणानें बोलत होता तरी त्यांत करारीपणाची झांक मारीत होती. लेग्री रागानें नुसता खवळून गेला ! तथापि क्षणभर आपला राग आवरून तो कुचेष्टेनें म्हणाला, ' एकूण आम्हां पाप्यांमध्यें हे एक साधुमहाराज आले आहेत म्हणायचे ! आमच्या सारख्या लोकांशीं भाषण करणं म्हणजे देखील यांना महत्पाप वाटत असेल ! तूं मोठा धार्मिकपणाचा आव आणला आहेस, पण काय रे ' चाकरांनो ! आपल्या धन्याची आज्ञा पाळा ! ' असं तुझ्या त्या बायबलांतच लिहिलं आहे त्याची काय वाट ? मी तुझा धनी ना ?

(रागानें टॉमला बुटाची लाथ लगावून ) बोल तुला मीं विकत घेतलं आहे कीं नाहीं ? '

टॉम—माझं शरीर तुम्हीं विकत घेतलं आहे खरं; त्यावर तुम्ही लागेल तेवढी सत्ता चालवा, पण माझा आत्मा—जो ईश्वराला वाहिलेला आहे. त्यावर फक्त त्याचीच सत्ता आहे ! त्याचं बरं वाईट करणं तुमच्या हातीं नाहीं ! '

लेग्री—अस्सं काय ? बरं बघूंया माझ्या हातीं आहे कीं नाहीं तें ! सांबो–क्विबो ! पाहतां काय ? या कुतरडयाला असा लंबा करा कीं पुन: म्हणून यानं तोंडच उघडूं नये ! '

भीमकाय सांबो क्विंबोंच्या मुखावर सैतानी हास्य चमकलें ! टॉमला ते फटाफट नेत असतां ल्यूसीनें किंकाळी फोडली व इतर मंडळींच्याहि अंगावर शहारे आले !

---

## प्रकरण ३२ वें.

### चेटूक !

टॉमला फोडून काढण्याचा हुकूम देऊन लेग्री आपले बैठकीचे खोलींत जाऊन बसला. ही खोली एके काळीं मोठी सुंदर होती पण लेग्रीसाहेबांचे हातांत पडल्यापासून सबंध घराचीच जेथें दुर्दशा झाली तेथें ही खोलीच तेवढी चांगली कुठून राहणार ? हल्लीं त्या खोलींत जिकडे तिकडे धूळ व केरकचरा सांचला असून एखाद्या जुनाट व पडक्या घरांत जशी कुजट घाण येते तशी कुबट घाण या खोलींत येत होती. त्या केरांतच लेग्रीच्या घोडयाचें सामान व कपडे अस्ताव्यस्तपणें पडले असून त्यावर लेग्रीचे कुत्रे मनसोक्त लोळत होते.

कांहीं वेळानें *पंचचें टमरेल गरमपाण्यानें भरीत लेग्री स्वत:शीं म्हणाला, 'मरो तो शिंचा सांबो! गुलामांत व माझ्यांत तंटे लावून तो मला त्यांना शिक्षा करायला लावतो! आतां तो टॉम आठवडाभर तरी कामाला निरुपयोगी होईल. हल्लीं हंगामामुळें माणसांची कोण चणचण आहे!'

'सांबो तरी कुणासारखा असणार? यथा राजा तथा प्रजा!' मागून कोणीसें म्हटलें.

ती कॅसीच होती. तिचकडे वळून लेग्री म्हणाला, 'कोण? आपण का? पुन: कशाला आपली धिंडका इथं आली?'

'मला वाटेल तिथं मी जाईन व हवी तशी वागेन!'

'छट! मी नाहीं तें चालूं द्यायचा! तुला गुण्यागोविंदानं माझ्याशीं वागायचं असलं तर इथं रहा, नाहींतर त्या गुलामड्यांच्या झोंपड्यांत राहून आजच्यासारखं त्यांच्याबरोबर कामाला जात जा!'

'चालेल! त्यांच्याबरोबर त्या गलिच्छ जागेंत राहून काम करणं मला हजार पटीनं पसंत आहे, पण इथं तुमच्या जाचाखालीं राहणं नको!'

'नको म्हणून कसं चालतंय्! तें तर आतां तुझ्या नशिबालाच लागलं आहे! बरं जाऊं द्या आतां हें! उगीच भांडत बसण्यांत काय बरं अर्थ आहे? नीट वागलीस तर दोघांनाहीं सुख नाहीं का लागायचं?'

'विसरा बरं—विसरा तें आतां! असल्या गुळचिट बोलण्यानं मी आतां फसायची नाहीं! माझ्याशीं गांठ आहे हें नीट लक्षांत ठेवा!'

पांच वर्षांपूर्वी लेग्रीनें कॅसीला विकत घेतलें तेव्हां ती विनयशील व भित्र्या स्वभावाची होती पण लेग्रीच्या पाशवी वर्तणुकीमुळें ति..

* हें एक प्रकारचें पेय आहे.

वरील त्याचा दाब कमी कमी होत जाऊन ती त्याला अलीकडे जुमानीनाशी झाली होती व तिचाच त्याला एक प्रकारें वचक वाटूं लागला होता. दिवसेंदिवस ती त्रासिक व संतापी बनत चालली होती. बुद्धिभ्रंश झाल्याप्रमाणें ती एखादे वेळीं कांहींच्या बाहींच बरळू लागे व त्यामुळें लेग्री बावरून जाई. अशिक्षित व गांवढळ लोकांप्रमाणें लेग्रीचाही शकून, भुतेखेतें, चेटकें इत्यादींवर विश्वास असून त्याला वेड्या माणसांची फार भीति वाटे. त्यानें एमिलीनला घरीं आणल्या-पासून कॅसीच्या अंगाचा भडका झाला. तिनें एमिलीनची बाजू घेतल्यामुळें लेग्रीशीं तिचा खटका उडाला. 'अशा रितीनें धूसपूस चालवलीस तर मी तुला गुलामांबरोबर हलकं काम करायला लावीन' अशी लेग्रीनें तिला धमकी दिली, तेव्हां आपण असल्या धमकावण्याला किती तुच्छ लेखतों हें दाखवण्यासाठीं ती मुद्दामच आज गुलामांबरोबर कामास गेली होती.

कॅसीशीं उडालेल्या खटक्यामुळें लेग्री सर्व दिवसभर अस्वस्थ होता. तिनें वजन करण्यासाठीं आपला कापूस पुढें करतांच तो अर्धवट तिरस्कारानें व अर्धवट मन वळविण्याच्या उद्देशानें घुटमळत तिच्याशीं बोलूं लागला. त्याचेकडे तिरस्कारानें पहात व कठोर वाग्बा-णांचा प्रहार करून ती तेथून निघून गेली.

टॉमशीं लेग्रीनें केलेल्या वर्तनानें तर कॅसीला त्याची जास्तच चीड आली व त्याबद्दल त्याची कानउघाडणी करण्यासाठींच ती यावेळीं तेथें आली होती.

'कॅसी ! असं काय बरं करावं तें ? तूं नीट रीतीनं वागावंस हें चांगलं नाहीं कां ?'

'लोकां सांगे ब्रह्मज्ञान नी आपण कोरडा पाषाण!' तुम्ही आपल्या

लोकांशीं नीट रीतीनं वागतां आहांत नाहीं ? हल्लींसारख्या कामाच्या चणचणीच्या वेळीं निव्वळ आपल्या लहरीखातर एका चांगल्या माणसाला मारून निकामी करतांना हा विचार तुम्हांला कां सुचला नाहीं ?'

'माझी ती चूक झाली खरी ! तो आपलाच हेका चालवूं लागला म्हणून मला तसं वागणं भाग पडलं. त्याला मी तरी काय करूं ?'

'पण अशानं तो आपला हेका सोडील असं जर तुम्हांला वाटत असेल तर ती तुमची चूक आहे !'

लेग्री एकदम उठून रागानें म्हणाला 'अग जा ! काय, तो माझ्या म्हणण्याप्रमाणं वागायचा नाहीं ? त्याचा देव वागेल ! आजपर्यंत कुणाही गुलामाची मात्रा चालूं दिली नाहीं तो याला बधतों काय ? त्याचं हाडन् हाड सैल करून टाकीन पण त्याला माझं म्हणणं ऐकायला लावीन ! सोडणार नाहीं !'

याच वेळीं दरवाजा उघडून सांबो आंत आला व लेग्रीला सलाम करून त्यानें एक कागदाची पुडी त्याचे हातीं दिली व तो म्हणाला, 'धनीसाहेब, त्या टॉमच्या गळ्यांत हें सांपडलं ! मला वाटतं या गुलामांच्या चेटकांपैकीं हें कांहीं तरी असावं !'

त्या पुडींत चांदीचा एक डॉलर व चकचकीत केसांची एक बट होती. या दोन्हीं वस्तु अनुक्रमें टॉमचा छोटा साहेब जॉर्ज शेल्बी व इव्हा यांनीं आपली आठवण म्हणून दिल्या होत्या हें वाचकांस स्मरत असेलच. लेग्रीनें पुडी सोडतांच डॉलर घरंगळत खालीं पडला व केसांची बट एखाद्या सापाप्रमाणें लेग्रीचे बोटांभोंवतीं गुंडाळली गेली ! तें पाहतांच लेग्रीची भीतीनें गाळण उडाली ! पाय आपटीत तो किंचाळला, 'अरे बापरे ! हें पुनः कुठून आलं इथं ! माझ्या पासून ही पीडा लवकर दूर ने व जाळून टाक ! कशाला माझ्याकडं आण-

लंस हें ?' असें ओरडत त्यानें त्या बटीचे तुकडे तुकडे करून ते पेटलेल्या शेगडींत टाकले !

त्याची ही घाबरगुंडी पाहून सांबो व कॅसी यांना फारच आश्चर्य वाटलें व विस्मयानें तीं दोघे त्याचेकडे पहात राहिली.

मूठ उगारीत लेग्री ओरडून म्हणाला, ' सांबो, पुनः असल्या वस्तु माझ्याकडे आणशील तर याद राख ! '

सांबोनें हळूंच तेथून पाय काढला. लेग्रीनें तो डॉलर उचलून खिडकींतून फेंकून दिला !

सांबो जातांच त्याच्यादेखत आपण भयभीत झाल्याचें दाखविलें याबद्दल लेग्रीला शरम वाटूं लागली. उद्विग्नपणें तो खुर्चीवर बसला व पंचचें टमरेल गरम पाण्यानें भरूं लागला. कॅसी हलकेंच तेथून निसटली.

यःकश्चित् केसाच्या बटीनें, वाटेल तीं दुष्कृत्यं करायला निर्ढाव-लेल्या लेग्रीसारख्या पाषाणहृदयीं मनुष्याची गाळण उडावी याचें कारण काय असेल बरें ?

न्यू इंग्लंड संस्थानांपैकीं एका दूरच्या प्रदेशांत लेग्रीचा जन्म झाला. त्याची आई मायाळू व भाविक असून तिचें लेग्रीवर अत्यंत प्रेम होतें. दुर्दैवानें सायमन लेग्री तिच्यासारखा सुशील न निपजतां बापासारखा कठोर व दुष्ट निपजला. आईच्या सदुपदेशाकडे दुर्लक्ष करून लहान-पणींच तो तिला सोडून गेला व त्यानें खलाशाचें काम पत्करलें. त्यानंतर पुष्कळ वर्षांनीं त्याची व त्याचे आईची गांठ पडली. त्या माउलीनें मोठ्या कळवळ्यानें त्याला विनवून आपणाजवळ ठेवून घेतलें व त्याला सन्मार्गाला लावण्याचा प्रयत्न चालविला. ती वेळ लेग्रीचे आयुष्यांतील आणीबाणीची होती. सुविचार व कुविचार यांचा त्याचे मनांत झगडा सुरू झाला. पण शेवटीं कुविचाराचाच जय होऊन एके रात्रीं त्यानें दारूच्या निशेंत आपलें आईला ती त्याचेपुढें गुडघे

टेकून दारू सोडण्याबद्दल विनवणी करीत असतां जोरानें लत्ताप्रहार केला व तशाच बेशुद्ध स्थितींत तिला टाकून शिव्याशाप देत त्यानें तेथून पोबारा केला व जहाजावरील आपल्या दुर्व्यसनी मित्रांत जाऊन तो मिसळला. यानंतर बरेच दिवस त्याला आईची हकीगत कळली नव्हती. एके दिवशीं रात्रींचे सुमारास त्याला एक पत्र आलें. तें फोडतांच त्यांतील केसांची बट त्याचे बेंटांभोंवतीं गुंडाळली गेली. ही बट त्याचे मृत आईच्या केसांची असून मरतेवेळीं तिनें त्याला क्षमा करून आशीर्वाद दिला असल्याचा मजकूर त्या पत्रांत होता. लेग्रीनें तुच्छतेनें तें पत्र व ती केंसांची बट विस्तवांत टाकून दिली ! पण त्यामुळें त्याचें मन मात्र अस्वस्थ झालें. काळजीनें व दुखण्यानें फिकट झालेली आपली प्रेमळ माता मृत्युसमयीं आपल्या मुलाला क्षमा करण्याबद्दल ईश्वराची प्रार्थना करीत आहे असा त्याला भास होऊ लागून तिच्याशीं केलेल्या निष्ठुरपणाचें स्मरण त्याला असह्य होऊं लागलें ! या गोष्टींचा विसर पाडण्यासाठीं तो मनसोक्त दारू प्याला .एखाद्या रात्रीं सर्वत्र शांत असतां आपली दुःखीकष्टी माता आपल्या बिछान्याजवळ उभी असून तिच्या केंसांची बट आपले बोटाभोंवतीं गुंडाळली जात आहे असें त्याला दिसे. त्यामुळें भितीनें त्याच्या सर्वांगाला दरदरून घाम सुटून तो ओरडत उठे. आपणावर निर्व्याज प्रेम करणाऱ्या माणसाशीं आपण केलेल्या कठोर वर्तनाची आठवण किती त.पदायक असते याचें हें एक चमत्कारिक उदाहरण आहे.

आतांच्या प्रसंगानें लेग्रीची पूर्वस्मृति जागृत झाली. तो दारू पीत असतां स्वतःशीं पुटपुटला, ‘ती बट याच्याजवळ पुनः कशी आली बुवा ! एखादी गोष्ट कायमची विसरतां येईल तर किती चांगलें होईल ? पण असं कुठलं व्हायला ? आतां इथं असं एकटं बसणं

उपयोगाचं नाहीं. त्या नवीन पोरीला तरी जरा हांक मारून पहावी. बाकी मी कुठं तिला आवडतों आहे म्हणा ! तीही माझा तिरस्कारच करते ! करीना, मला काय करायचं आहे त्याच्याशीं ? मी तिला इथं यायला भाग पाडीन ! '

एमिलीन माडीवरील खोलींत स्वतःशीं गात बसली होती, तिला बोलावण्यासाठीं माडीचे जिन्याकडे लेग्री निघाला. जिन्यावर धूळ व सटरफटर सामान पडलें असून तो भाग भयाण व उदास दिसत होता. लेग्री जिन्याचे पायथ्याशीं थांबला. एमिलीनचा आवाज त्याला चमत्कारीक व अमानुष वाटून त्याची भीतीनें बोबडी वळली. त्याचें मन आतां हळवें बनलें असल्यामुळें कदाचित् त्याला असें वाटलें असावें. इतक्यांत जिन्यावर कांहीं तरी पांढरें त्याला दिसलें ती आपली आई तर नसेल हा विचार मनांत येतांच तो तिथें थांबतो आहे कशाला ? तो परत आपले बैठकीचे खोलींत आला.

नंतर त्यानें सांबो–क्विंबोंना बोलावून आणलें व त्यांचेस* यथास्थित दारू पिऊन मनसोक्त गोंधळ घातला !

---

# प्रकरण ३३ वें

## कॅसी

कापूस वठण्याच्या जागेपैकीं एका जुनाट, पडक्या व सटरफटर अडगळ टाकलेल्या खोलींत टॉम एकटाच रात्रीचे वेळीं रक्तबंबाळ स्थितींत कण्हत पडला होता. हवा कुंद असून उकाडा होत असल्यामुळें त्याचे जिवाची तलखी होत होती. त्यांतच भोंवतीं घोंघावणारीं चिलटें चावून त्याला मनस्वी त्रास देत. तहानेनें त्याचे घशाला

विलक्षण कोरड पडली होती. अशा स्थितींत टॉमनें 'हे दीनवत्सल प्रभो ! मला हें सोसायला धैर्य दे !' असा देवाचा धांवा चालविला होता.

इतक्यांत त्याला मनुष्याची चाहूल ऐकूं आली व कंदिलाचा उजेड त्याचे तोंडावर पडला. आलेल्या व्यक्तीला उद्देशून तो म्हणाला 'कोण आहे तें ? मला थोडें पाणी द्याल तर मोठे उपकार होतील !'

कॅसीनें हातांतील कंदील खालीं ठेवला. तिनें बरोबर आणलेल्या बाटलींतील पाणी टॉमला प्यायला दिलें व ती म्हणाली 'लागेल तितकं पी बरं. अशा प्रकारें तुझ्यासारख्यांना पाणी देण्याची ही कांहीं माझी पहिलीच खेप नाहीं. मला तुझ्या स्थितीची जाणीव आहे.'

पाणी पिऊन होताच टॉम म्हणाला, 'बाईसाहेब, मी आपला अत्यंत ऋणी आहे.'

'नको बाबा मला बाईसाहेब म्हणूं ! मी बाईसाहेब कसली ? तुझ्यासारखीच किंबहुना त्याहीपेक्षां हीन दर्जाची एक अभागी गुलाम स्त्री आहे !' असें म्हणून कॅसीनें बरोबर आणलेल्या सामानानें टॉमच्या सर्व जखमा बांधल्या. त्यामुळें त्याला हुषारी आलेली पाहून ती म्हणाली 'इथं असं वागून तुझा निभाव लागायचा नाहीं ! तुझी बाजू खरा असली व त्यासाठीं तूं धैर्यानें हाल अपेष्टा सोसायला तयार असलास तरी तूं सैतानाच्या पंजांत सांपडलेला आहेस हें लक्षांत ठेव. त्याच्यापुढं तुझं कांहीं चालायचं नाहीं. म्हणून म्हणतें, तूं निमूटपणें त्याच्या मर्जीप्रमाणें वागावंस हें चांगलं !'

टॉमला त्याच्या यातनांनीं पूर्वीं हाच कानमंत्र दिलेला होता व त्याबद्दल त्याचे मनांत मोह व सद्विचार यांचा झगडा सुरूं होता. त्यांपैकीं मोह या स्त्रीचे रूपानें आपल्याला भुरळ पाडण्यासाठीं आला आहे कीं काय असें त्याला वाटलें. तो कण्हत म्हणाला, 'देवा ! देवा ! माझ्या ब्रीदाला मी कशी तिलांजली देऊं !'

'देवाला इथून हांक मारण्याचा कांहीं उपयोग नाहीं! कारण इथले शब्द ऐकायला देवाला कान आहेत कुठं? इथलीं दुष्कृत्यं त्याला जशीं दिसत नाहींत, तशाच त्याला इथल्या प्रार्थनाहि ऐकूं येत नाहींत. मला वाटतं देव नसावा तरी एक, किंवा असलाच तर खात्रीनें तो आमच्या विरुद्ध पक्षाचा असला पाहिजे! कारण जिकडून तिकडून आमचा छळ व कोंडमार होत आहे! आम्ही अधःपाताच्या गर्तेत सारखे जात चाललों आहों!'

कॅसीचें हें नास्तिकपणाचें भाषण ऐकून टॉमचे अंगावर शहारे आले. त्यानें डोळे मिटून धरले. कॅसी पुढें बोलूं लागली. 'मी गेलीं पांच वर्षे या सैतानाचे हाताखालीं वागत आहे. हीं जागा तरी किती एका बाजूला आहे तुला माहिती आहे! या मळ्याच्या आसपासच्या दहा मैलांत मनुष्यवस्ती नाहीं. इथं तुझ्या जिवाचं तो वाटेल तें करूं शकेल. तो तुला जिवंत जाळून टाकील किंवा तुझे राईराई एवढे तुकडे करून ते कुत्र्यांपुढें फेंकील. नाहींतर आसुडानें तुझी चामडी लोळवून तुझा प्राण घेईल! कोणीही गोरा मनुष्य त्याचं नीच कृत्य पाहायला नाहीं! आम्हां गुलामांच्या साक्षीला कोर्टांत काडीचीहि किंमत नसल्यामुळें तो इथं करील तें सहज पचून जातं? मी इथं इतके अत्याचार पाहिले आहेत कीं ते ऐकणाराची भीतीनें दांतखीळ बसेल! अशा स्थितींत आमच्या हट्टाचा उपयोग काय? मी चांगल्या कुटुंबांत वाढलेली स्त्री ना? या नीचाच्या संगतींत कसे दिवस काढते आहे तें एक माझ्या जीवाला ठाऊक? हल्लीं त्यानं एक नवीनच मुलगी आणली आहे! मला तिची भारी दया येते. तिला बायबल वाचायला येतं व तिनें तें बरोबर आणलं आहे! कशाला या नरक-पुरींत ती बायबल घेऊन आली आहे कोण जाणें?'

इतकें बोलून कॅसीनें दुःखपूर्ण विकट हास्य केलें त्याचा प्रतिध्वनि त्या जीर्ण कोटरांत उमटला !

टॉमनें हात जोडले. तो कळवळून म्हणाला, 'येशू ! ख्रिस्तप्रभो ! आम्हां अनाथांना तुझ्याशिवाय कुणाचा बरं आधार आहे ? तूंच जर आमची अशी उपेक्षा चालवलीस तर आम्ही जिवंत तरी कसं राहायचं ? नको आतां अंत पाहूं ! धांव—'

कॅसी पुढें बोलूं लागली. 'ज्यांच्यासाठीं तूं हे क्लेश सोसायला तयार झालास, त्यांची तशी लायखी तरी आहे काय ? त्यांना संधी मिळतांच ते तुझ्यावर उलटल्याशिवाय रहणार नाहींत ! हीं माणसं कसलीं ?—शुद्ध जनावरं आहेत ! त्यांना दुःख होऊं नये म्हणून आपल्या जिवाचे हाल करून घेण्यांत कांहीं अर्थ नाहीं !'

'अरेरे ! गरीब बिचारे ! त्यांना असं जनावरासारखं कोणीं बनविलं ? मीं जर माझा हेका सोडला व धनी साहेबांचे म्हणण्याला मान तुकवूं लागलों तर लवकरच माझीही यांच्यासारखीच नाहीं का अवस्था होणार ? नको, बाईसाहेब ! इतके दिवस भलेपणानं वागून आतां शेवटीं माझा असा अधःपात व्हायला नको ! बायको—मुलं घरदार यांना मी अंतरलोंच आहे ! माझा मागचा धनी किती मायाळू व थोर अन्तःकरणाचा होता ! आणखी कांहीं दिवस तो जगला असतां तर माझ्यावर इथं येण्याची पाळी कशाला आली असती ? माझ्या सर्वस्वाची होळी झाली असतांना आतां दुष्टपणानं वागून मी मोक्षालाहि वंचित होऊं काय ?'

कॅसी—याचा दोष आमच्याकडं नाहीं ! आम्हांला असं करायला प्रवृत्त करणारेच खरे अपराधी आहेत !'

टॉम—असेल, तसंहि असेल. म्हणून आम्हीं दुष्टपणानं वागावं असं कांहीं होत नाहीं. त्या सांबोसारखा मी पाषाणहृदयी बनालें व

हत्रा तसा क्रूरपणानं वागूं लागलों तर तो माझा अध:पातच समजला पाहिजे मग तो कोणत्याहि कारणानं झालेला असो. कारण कांहींही असले म्हणून आपण सन्मार्ग सोडावा कीं काय हा प्रश्न आहे.'

कॅसीला टॉमचें बोलण्यांत बरेंच तथ्य असावें असें वाटूं लागलें. ती दु:खित स्वरानें म्हणाली, 'देवा! माझ्यावर दया कर. हा म्हणतों तें खरं आहे!

तिला मानसिक यातना सहन होईनात. ती धाडकन जमिनीवर पडली व स्फुंदूं लागली.

थोडा वेळ कोणीच बोललें नाहीं. नंतर टॉम शांततेचा भंग करून क्षीण आवाजानें म्हणाला, 'बाईसाहेब, त्यांनीं माझा कोट त्या कोपऱ्यांत भिरकावून दिला असावांसा वाटतं त्याच्या खिशांतलं तेवढं बायबल आणतां का!'

कॅसीनें त्याप्रमाणें त्याला बायबल आणून दिलें. त्यानें त्यांतील एक भाग तिला वाचून दाखविण्याची विनंति केली.

तो भाग येशू ख्रिस्ताचे निर्याणप्रसंगाचा होता. तो हृदयस्पर्शी भाग वाचीत असतां कॅसीची अगदीं एकतानता झाली. क्षणांत तिच्या आवाजांत कंप उत्पन्न होई तर क्षणांत गळा दाटून आल्यामुळें तिला पुढें वाचणेंच कठीण होत असे. थोडा वेळ थांबून ती पुढें वाचूं लागे. शेवटीं ती 'बाबा! त्यांना क्षमा करा; आपण काय करतों आहों हें त्यांना कळत नाहीं!' या वाक्याजवळ आली तेव्हां तिला पुढें वाचवेना. तिनें पुस्तक खालीं ठेवलें व मोठ्यानें हुंदके देत ती रडूं लागली!

टॉमचेहि डोळ्यांतून अश्रुप्रवाह सुरू होता. तो कॅसीकडे पहात म्हणाला, 'आपण हे प्रभूचे शब्द लक्षांत ठेवून त्याप्रमाणें वागूं या. देवा! तूं आम्हांला धैर्य दे. बाईसाहेब, माझ्यापेक्षां आपण कितीतरी

थोर आहां, आपणाला एक गोष्ट बरीक मला सांगावीशी वाटते. आपल्या दुर्दशेबद्दल आपण देवाला दोष लावतां व म्हणतां कीं देवानें आपल्याविरुद्ध बाजू घेतली आहे. पण देवाच्या लाडक्या पुत्राची–येशूची–काय स्थिति झाली तें आपण पाहतां ना ? तो गरीब नव्हता का ? त्याच्या इतकी आपली दुर्दशा झाली आहे का ? देव आपणाला विसरलेला नाहीं हें पक्कें लक्षांत ठेवा. प्रभू येशूप्रमाणें जर आपण सत्यासाठीं येतील तीं संकट आनंदांत सोसायला तयार झालों तर तो आम्हांला त्यांतून निभावून नेईल; पण आपण जर त्याला झिडकारून हवं तसं वागूं लागलों तर तो तरी आम्हांला काय म्हणून जवळ करील ? जसा भाव तसा देव ! आम्हांला दुःख भोगावं लागतं म्हणून देव निष्ठुर आहे या म्हणण्यांत कांहीं अर्थ नाहीं. आपण त्याच्यावर भार टाकून सन्मार्गानं गेलं पाहिजे !'

'मग ज्या ठिकाणीं पापाचरण करणं आम्हांला भाग पडतं, अशा ठिकाणीं तो आम्हांला ठेवतो तरी कशाला ?' कॅसीनें विचारलें.

टॉम—आपली ही समजूतच चुकीची आहे. पापाचरण न करतां कोणत्याहि परिस्थितींत आपणाला राहतां येणं शक्य आहे !'

कॅसी—बोलणं सोपं आहे पण करणं मात्र कठीण आहे ! लेग्री व त्याचे हस्तक यांना मी तुझ्यापेक्षां जास्त ओळखतें. उद्यांच बघशील तूं कीं ते तुला आपलं म्हणणं कबूल करायला लावल्याशिवाय सोडणार नाहींत !'

टॉम—ख्रिस्तप्रभो ! तूंच माझा आतां पाठीराखा आहेस, माझं रक्षण कर व मला मोहवश होऊं देऊं नको !'

कॅसी—बाबारे, मीं आजपर्यंत अशा कैक प्रार्थना ऐकल्या आहेत पण त्यांचा कांहीं एक उपयोग झालेला नाहीं ! शेवटीं मुकाट्यानें लेग्रीलाच शरण जाणें त्याना भाग पडलें ! ती एमिलीन देखील

अशीच आपला हट्ट चालवणार आहे म्हणे ! फुकट मराल झालं, दुसरं काय ?'

टॉम—एवढंच ना ? ठीक आहे. मी मरायला तयार आहे. केव्हां तरी मरण येणारच तें कांहीं टळत नाहीं ! प्रभू मला या आपत्तींतून खचीत निभावून नेईल.

---

## प्रकरण ३४ वें

### कॅसीचें आत्मवृत्त.

कॅसी थोडा वेळ स्तब्ध राहिली. नंतर तिनें टॉमला पूर्ववृत्त सांगितलें. ती म्हणाली, 'एका खानदानीच्या घराण्यांत मी लहानाची मोठी झालें. माझं बाल्य हंसण्याबागडण्यांत व सुखासमाधानांत गेलें. मी एका ख्रिस्ती मठांत जाऊन फ्रेंच भाषा शिकलें. त्याच प्रमाणें गायन–वादन व कशिदाकाम मला येऊं लागलें. वयाच्या चौदाव्या वर्षी माझे वडील न्यूअरलिन्समधील पहिल्या कॉलऱ्याला बळी पडले. माझी आई गुलामच होती. मला मुक्त करण्याचं बाबांच्या मनांत फार होतं पण त्यांच्या आकस्मिक मृत्यूनं तो बेत तसाच राहिला व त्यांच्या कर्जफेडीसाठीं नाइलाजानं विक्रीच्या वस्तूंत माझं नांव घातलं गेलं. बाबांच्या इस्टेटीची व्यवस्था पाहणाऱ्या वकिलाबरोबर एक दिवस एक तरुण मनुष्य आमचे घरीं आला. त्याचं नांव हेनरी. तो अतीशय सुंदर असून माझ्याशीं फारच प्रेमळपणानं बोलला. त्यावेळीं मी एकाकी व दुःखी कष्टी असल्यामुळें त्याच्या गोड गोड भाषणानं मी मोहून गेलें. त्यानें दोन हजार डॉलर देऊन मला विकत घेतलें व आपले घरीं नेलें. तो चांगला श्रीमंत असून त्यानं मला ऐश्वर्यांत नुसतें लोळत

ठेवलें. माझं त्याच्यावर किती प्रेम होतं म्हणून सांगूं? प्रत्यक्ष देवापेक्षां किंवा स्वत:च्या प्राणापेक्षांहि तो मला प्रिय होता. अशा रीतीनें सुमारें सात वर्षे गेलीं. तो तापानें अत्यवस्थ असतां मी जिवापाड कष्ट करून रात्रंदिवस त्याची शुश्रूषा केली तेव्हां तो गहिंवरून म्हणाला, 'देवते! तुझ्यामुळं माझा प्राण वांचला!' अशा रीतीनें आम्ही आनंदानें कालक्षेप करीत असता आमचे घरांत एक कलिपुरुष शिरला! त्यानं माझा सत्यनाश केला! हा कलिपुरुष म्हणजे हेनरीचा चुलतभाऊ होय. हेनरीच्या तो जिवाचा कलिजा होता. त्या मेल्याच्या पोटांतला कावा भोळया बिचाऱ्या हेनरीला कळला नाहीं! त्यानें हेनरीला जुगाराचे व खुशालचंदूपणाचें व्यसन लावलें. हेनरीचा स्वभाव असा होता कीं त्याला एकदां एकाद्या गोष्टीचा नाद लागला कीं तो सुटणें कठीण. त्याच्या तापटपणामुळें त्याला बोलायची मला भीति वाटे. यामुळें त्याचा हा अध:पात उघड्या डोळयांनीं पाहण्याखेरीज मला गत्यंतर नव्हतें. आपले सुखाचे दिवस मात्र संपले एवढें मला कळून चुकलें. हेनरी कर्जबाजारी होत चालला. मला व माझ्या दोघां मुलांना कर्जफेडीसाठीं विकत घेण्याची बटलरची तयारी पाहतांच त्यानें गुप-चूपपणें तसें केलें व एक दिवस कांहीं कामानिमित्त परगांवीं जातों अशी मला थाप देऊन हेनरी माझा त्याग करून निघून गेला! बटल-रचा फार दिवसांचा माझ्यावर डोळा असल्यामुळें त्या मांगानें अशा रीतीनें हेनरीला दुर्व्यसनी बनवून आपला कावा साधला! त्याच्याजवळ राहणं मला प्राणसंकट वाटूं लागलें पण 'तूं नीट वागली नाहींस तर तुझीं दोन्ही कारटीं विकून टाकीन' अशी तो मला धमकी देई. त्यामुळं मी गोगलगाईपेक्षां गोगलबाय बनून जाई! माझ्या मुलांशीं तो भारीच कठोरपणानें वागे. एलिझा बिचारी गरीब होती. ती गप्प बसे. पण छोटा हेनरी तापट असल्यामुळें तो त्याला दुरुत्तरें करी.

यामुळें मला त्याची भारी धास्ती वाटे. एक दिवस मी घरीं नसतां बटलरनें माझीं दोन्ही मुलें विकून टाकलीं ! मी अतिशय रागावलें, कावलें, त्याला शिव्याशाप दिले पण काय उपयोग ? कांहीं दिवसांनीं मीं सहज शिक्षागृहाजवळून जात असतां माझ्या मुलाचा आवाज ऐकला. तो मोठमोठ्यानें रडत होता. मला पाहतांच आपणाला धरलेल्या दोघां-तिघां जणांना हिसडा देऊन तो माझ्याकडे धांवला व मला घट्ट मिठी मारून रडूं लागला ! माझ्या विनवण्याकडे बिलकूल लक्ष न देतां त्या सैतानांनीं त्याला बळेंच ओढून शिक्षागृहांत नेलें ! 'आई ! आई ! मला वांचीव ग !' अशा त्याच्या किंकाळ्या ऐकून माझ्या हृदयाचें पाणी पाणी होत होतं ! ! त्या ठिकाणीं उभ्या असलेल्या एका मनुष्याला छोट्या हेनरीला सोडविण्यासाठीं माझ्याजवळ होते नव्हते तेवढे सर्व पैसे मीं देऊं केले. तेव्हां नकारार्थी मान हलवीत तो म्हणाला, 'हा मुलगा फार उर्मट असल्यामुळें त्याला शिक्षा करण्यासाठीं त्याच्या मालकानं मुद्दामच शिक्षागृहाकडे पाठविलें आहे ! यामुळं आमच्या मध्यस्थीचा कांहीं उपयोग व्हायचा नाहीं !' मला आत तेथें उभें राहवेना, मी धांवतच घराकडे आलें. छोट्या हेनरीच्या किंकाळ्या ऐकूं येत आहेत असा मला रस्त्यानें सारखा भास होत होता. घरीं येतांच बटलरचे पाय धरून कसंहि करून माझ्या मुलाला सोडवून आणण्याबद्दल मीं त्याला विनविलें, पण तो नुसतां हेटाळणीनें हंसला मात्र ! हें पाहून रागानें मी बेभान झालें व टेबलावरील सुरी घेऊन त्याचे अंगावर धांवलें ! माझ्या डोळ्यापुढं अंधेरी आली व मी मूर्च्छित पडलें ! कित्येक दिवस मला शुद्धच नव्हती पण पुढें आपण दुसऱ्याच एका घरांत राहात असून आपल्या औषधपाण्याची चांगली व्यवस्था होत असल्याचें मला आढळून आलें. या घरांत मला टाकून व मी बरी

होतांच मला विकण्याबद्दल तेथील मंडळींना सांगून बटलर निघून गेला होतां ! या दुखण्यांत आपला अंत होईल तर बरं असं मला सारखं वाटत होतं, पण माझं इतकं भाग्य कुठलं? माझ्या जन्माचे आणखी हे धिंडवडे व्हायचे होते ना? लवकरच मी बरी झालें व लोक मला विकत घेण्यासाठीं पाहून जाऊं लागले ! मी खिन्न दिसत असल्यामुळें बरेच दिवस सौदा होईना. शेवटीं कॅप्टन स्टुअर्ट नांवाचा एक थोर गृहस्थ तेथें आला. त्यानें माझी सारी हकीगत समजून घेतली व त्यामुळें त्याला माझ्याबद्दल सहानुभूति वाटूं लागली त्यानें मला विकत घेतलें व माझ्या मुलांचाही तपास करून त्यांना सोडवून आणण्याचें मला आश्वासन दिले. त्याप्रमाणें त्यानें पुष्कळ खटपट केली, पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं ! मुलं गेलीं तीं गेलींच ! कॅप्टन स्टुअर्टनें मला आपले मळ्यांत राहावयास नेलें. तो माझ्याशीं भलेपणानें वागे. कांहीं दिवसांनीं कॉलऱ्यानें कॅप्टन स्टुअर्ट वारला. मृत्यु तरी किती चमत्कारीक आहे पहा ! जे जगायला पाहिजेत त्यांना तो बळेंच ओढून नेतो आणि आमच्यासारखं अभागी जीव त्याची सदैव प्रार्थना करीत असतांहि तिकडे तो लक्षच देत नाहीं ! यानंतर आणखी कांहीं धन्यांचे हाताखाली दिवस काढीत काढीत या सैतानाच्या हातांत येऊन पडले व तेव्हांपासून या नरकपुरींत सारखी पिचत आहे !'

इतकें बोलून कॅसी थांबली. आतांचें लांबलचक भाषण करीत असतां कांहीं वेळ ती टॉमला उद्देशून बोलें; तर कांहीं वेळ स्वगत बोलत असल्याप्रमाणें दिसे. टॉम लक्षपूर्वक ही हकीगत ऐकत होता. कांहीं वेळानें ती पुढें बोलूं लागलीं. 'तू म्हणतोस कीं देव आहे व त्याला सगळं दिसतं. असेल कदाचित् तसंहि असेल. ख्रिस्ती मठांतल्या जोगिणी देखील तेव्हां म्हणत कीं शेवटीं देवासमोर पापपुण्याचा

निवाडा झाल्याखेरीज राहणार नाहीं म्हणून कोणीही सूडाच्या भावनेला मनांत थारा देऊं नये! पण आमचा व आमच्या पोराबाळांचा किती छळ होतो याची या लोकांना कल्पना नाहीं! येऊं दे, हा शेवटचा निवाड्याचा दिवस तरी एकदांचा येऊं दे,' म्हणजे त्यावेळीं माझा सत्यानाश करणारांचीं पातकं देवापुढें वर्णून मीं आपलं सामाधान करून घेईन! लहानपणीं मी मोठी भाविक होते. नित्य प्रार्थना करी; आतां मीं तें सारं सोडून दिलें आहे! रात्रदिवस माझा असा छळ चालल्यावर माझा अधःपात झाला तर त्यांत आश्चर्य कसलं? तें कांहीं नाहीं. सूड हा घेतलाच पाहिजे! या सैतानाचा एक दिवस मी निकाल लावल्याशिवाय राहणार नाहीं! मग त्याबद्दल मला कुणीं उभं जाळलं तरी पत्करेल!'

बोलतां बोलतां कॅसीनें आपल्या मुठी आवळल्या व विकट हास्य केलें. तिच्या डोळ्यांत क्रौर्याची चमक दिसत होती. नंतर तिलाच काय वाटलें कुणाला ठाऊक, तिनें जमिनीवर अंग टाकलें व ती ओक्साबोक्सी रडूं लागली. तिच्या जिवाची सारखी तळमळ चालली होती!

थोड्या वेळानें ती शांत झाली. हलकेंच उठून ती टॉमजवळ येऊन म्हणाली, 'बाबा, तुला आणखी कांहीं पाहिजे आहे का? थोडं पाणी देऊं?'

आतांच्या तिच्या भाषणांत किती तरी मार्दव व सहानुभूति दिसत होती! तिनें दिलेलें पाणी टॉम प्याला व म्हणाला बाईसाहेब, आपल्या सुखदुःखाचं गाठोडं सुखमय जीवन देणाऱ्या प्रभूच्या स्वाधीन करून तुम्ही निश्चित रहाल तर किती तरी बरं होईल?'

कॅसी—पण हा तुझा प्रभू आहे तरी कसला अन् तो असतो तरी कुठं?'

टॉम—मघाशीं तुम्हां ज्याच्याविषयी वाचलंत तोच तो प्रभू ?'

कॅसी—लहानपणीं मीं वेदीवर टांगलेलं त्याचं चित्र पहात असे खरी. आतां त्याचं काय ? तूं कांहीं जरी म्हणालास, तरी या भागांत त्या प्रभूचं अस्तित्व खास नाहीं ! पाप, दुष्कर्में व निराशा एवढंच काय तें इथं आहे !?'

टॉम कांहीं बोलणार होता, पण कॅसीनें त्याला न बोलतां स्वस्थ पडून राहण्यास सांगितलें व त्याचेजवळ पाणी ठेवून व त्याच्या सुख-सोईसाठीं तिला करतां आली ती इतरहि थोडी तजवीज करून ती तेथून निघाली.

या वेळीं सुमारें दोनचा सुमार होता. कॅसीनें लेग्रीचे खोलींत डोकावून पाहिलें तों लेग्री व त्याचे श्रृंगी–भृंगी दारू पिऊन तर्रर् झाले असून आरडता आहेत, ओरडता आहेत, नाचत आहेत, एक मेकांशीं धक्काबुक्की करता आहेत व त्यांतच लेग्रीचे कुत्रेहि भुंकत आहेत असा देखावा तिचे दृष्टीस पडला !

लेग्रीकडे एक तिरस्कारपूर्ण दृष्टिक्षेप करून कॅसी स्वगत म्हणाली, 'असल्या चांडाळाला जगांतून नाहींसा केला तर तें पापकर्म होईल का ?'

नंतर ती घाईघाईनें मागील बाजूकडील जिन्यानें वर गेली व एमिलीन बसली होती त्या खोलीचे दाराशीं जाऊन तिनें त्याजवर टिचक्या वाजविल्या.

एमिलीननें दरवाजा उघडतांच कॅसी आंत गेली. खालील आरडा ओरड्यानें एमिलीन अगदीं घाबरून गेली होती. शिवाय लेग्रीची तिला फार भीति वाटे. यामुळें कॅसीला पाहून तिला आनंद झाला. ती म्हणाली 'कॅसीबाई ! आपणाला इथून पळून नाहीं का जातां

यायचं ? पाहिजे तिथं घेऊन चला. रानावनांत हालअपेष्टा सोसायला मी आनंदानं तयार आहे, पण इथं राहणं नको !'

तेथून पळून जाणं अगदीं अशक्य असल्यामुळें येतील तीं सुखदुःखं मुकाट्यानं सोसण्याशिवाय गत्यंतर नाहीं असें कॅसीनें तिला सांगितलें.

---

## प्रकरण ३५ वें

## तात्पुरती सुटका !

दुसरे दिवशीं सकाळीं लेग्री एकटाच टॉमचे खोलीकडे गेला व त्याला एक लाथ मारून म्हणाला, 'कसं काय बुवा, ठीक आहे ना ? आमच्यासारख्या पापी लोकांपुढं बायबलाचं प्रवचन झोडण्याची तुझी खुमखुमी बरीच कमी झाली असेल नाहीं ?'

टॉम कांहींच बोलला नाहीं. त्याला आणखी एक लाथ लगावून लेग्री म्हणाला, 'कुत्तरड्या ! उठतोस कीं नाहीं ?'

टॉम मोठ्या कष्टानें कसा बसा उठला. लेग्रीचे मुखावर सैतानी हास्य चमकलें. टॉमकडे पहात तो पुनः म्हणाला, 'तुला पुरेसा खाऊ मिळालेला दिसत नाहीं ! मुकाट्यानें गुडघे टेकून कालच्या अपराधाबद्दल माझी क्षमा माग !'

टॉम स्तब्ध राहिला. तेव्हां त्याला आपले हातांतील चाबकाचा फटकारा मारून लेग्री ओरडला, काय सांगतों ऐकायला येतं कीं नाहीं ? हं आटप !'

'धनीसाहेब ! मीं आपला कांहींच अपराध केलेला नाहीं तर क्षमा कसली मागायची ? ला योग्य वाटलं तेंच मीं केलं व तुम्हीं कांहीं जरी केलंत तरी पुढें तसेंच करणार !'

'पण टॉमसाहेब ! या वागणुकीमुळं तुम्हांला काय बक्षीस मिळेल तें माहीत आहे का ? अजून तूं कुठं मला पुरा ओळखला आहेस ! तुला दिली ही शिक्षा कांहीच नाहीं ! तुला झाडाला टांगून भोंवताळून खिस्तवाच्या होळ्या पेटवून दिल्या तर तुला आराम वाटेल नाहीं ?'

'धनीसाहेब ! आपण असलीं राक्षसीं कृत्यं कराल याबद्दल माझी खात्री आहे ! या पार्थिव* शरीराचा फार तर तुम्ही नाश करूं शकाल ! पण त्यानंतर मला मिळणारं शाश्वत सुख तुम्हांला हिरावून घेतां येणार नाहीं ! तुम्हीं मला विकत घेतलं आहे तेव्हां इमानेंइतबारें तुमची नोकरी करणं हें माझं काम आहे. माझ्याकडून रात्रंदिवस होईल तितकं जास्तींत जास्त मी तुमचं काम करीन ! मुळींच कसूर करणार नाहीं. माझ्या आत्म्यावर तुमची सत्ता नाहीं; त्या प्रभूची आहे. या शरीराचा नाश झाला तरी चालेल पण आत्म्याचा अधःपात मी होऊं देणार नाहीं ! माझे लागेल तेवढे हाल करून जीव घ्या. त्यानं माझं कांहींच वाईट होणार नाहीं. उलट त्या प्रभूच्या पायाजवळ तितका मी लवकरच जाईन !'

'मी तुला क्षमा मागायला लावीनच लावीन ! सोडणार नाहीं !' लेग्री रागानें जळफळत म्हणाला.

'आपणाला तें करतां येणार नाहीं ! कोठून तरी मला मदत मिळेल!'

'इथं कोण तुला मदत करायला येतो आहे ?'

'तो सर्वशक्तिमान् प्रभू !'

'अस्सं काय ? मीही पाहीन तो प्रभू तुला कशी काय मदत करतो तें !' असें म्हणून लेग्रीनें टॉमला एक गुद्दा लगावला. त्याबरोबर टॉम धाडकन जमीनीवर पडला !

---

*मातीच्या पासून निर्माण झालेला.

याच वेळीं कोणीतरी आपला मृदु व गार हात लेम्रीचे खांद्यावर ठेवला ! लेम्रीनें वळून पाहिलें तों कॅसी ! त्या स्पर्शानें लेम्रीला आपले आईची आठवण होऊन तो थोडा घाबरला. कारण ज्या ज्या वेळीं त्याची आई त्याला स्वप्नांत दिसे त्या त्या वेळीं ती आपला मृदु व गार हात त्याचें अंगावर ठेवी.

कॅसी फ्रेंच भाषेंत म्हणाली, ' तुम्ही असंच मूर्खपणानं वागणार का ? जाऊं द्या त्याला ! याला माझ्या ताब्यांत द्या. मी त्याची शुश्रूषा करून लवकरच त्याला पूर्ववत् धट्टाकट्टा बनवितें कीं नाहीं पहा ! '

लेम्रीलाही आतां फारसें ओढून धरण्याची इच्छा नसल्यामुळें कॅसीचे म्हणण्यास त्यानें मान्यता दिली. तथापि जातां जातां तो टॉमला म्हणाला, ' सध्यां मला माणसांची जास्त गरज असल्यामुळ मी यावेळीं तुझी गय करतों. पण वेळ येतांच माझ्या अपमानाचा मोबदला तुझ्या या काळ्या कातडीपासून पुरापूर वसूल करून घेतल्याशिवाय मी राहाणार नाहीं हें पक्कं लक्षांत ठेव ! ' इतकें बोलून तो तेथून निघून गेला.

' तुझ्याही नीचपणाचं बक्षीस तुला लवकरच पुरेपूर मिळाल्याशिवाय राहाणार नाहीं ! ' त्याचेकडे भेसूरपणें पहात कॅसी उद्गारली. नंतर ती टॉमकडे वळून म्हणाली ' कशी काय बाबा तुझी हालहवाल ? '

टॉम तिचेकडे पहात म्हणाला, ' प्रभूनें या आपल्या दूताकरवीं सध्यांतरी सिंहाचे जबडयांतून माझी सुटका करविली असल्यामुळें ठीक आहे. '

' होय, पण ती तात्पुरतीच ! त्याचा स्वभाव खुनशी असल्यामुळें तो तुझ्यावर दांत ठेवून वेळ येतांच हालहाल करून तुझा प्राण घेईल ! ' कॅसी उद्वेगानें उत्तरली.

---

## प्रकरण ३६ वें
### साक्षात्कार !

आपल्या तत्वासाठीं मृत्युलाही कवटाळण्यास तयार होणाऱ्या मनुष्याला शारीरिक यातना होत नसतील काय ? नसतील कशा ? भावनातिरेकामुळें कांहीं काल त्याला त्यांचा विसर पडतो इतकेंच ! लेग्री निघून जातांच टॉमला वस्तुस्थितीची जाणीव होऊं लागून त्याचें सर्वांग ठणकूं लागलें व तो सर्व दिवस त्याचा विषण्ण मनस्थितींत गेला.

त्याच्या जखमा पुऱ्या बऱ्या होण्यापूर्वींच लेग्रीनें त्याला कामाला लावलें. दिवसेंदिवस त्याच्या खुनशी व दुष्ट स्वभावामुळें टॉमला जास्त जास्तच त्रास होऊं लागला. यामुळें टॉमचा स्वभाव त्रासिक व चिडखोर बनत चालला. फुरसतीच्या वेळीं आपण आपलें बायबल वाचूं अशी त्याला उमेद होती व कांहीं दिवस संध्याकाळीं कामावरून परत आल्यावर विस्तवाजवळ बसून तो त्याचे प्रकाशांत कांही ओळी वाचीं, पण हल्लीं हंगाम असल्यामुळें लेग्रा रविवारीं देखील आपले लोकांना सुट्टी न देतां त्यांना पिळून काम घेई. टॉम तर इतका थकून जात असे कीं रात्रीं केव्हां एकदा जमिनिवर अंग टाकतों असें त्याला होऊन जाई मग कुठलं वाचन नी कुठलं काय ?

दिवसामागून दिवस जात चालले. त्याच्या भोंवतालाची परिस्थिति अत्यंत निराशामय व भेसूर असून परमेश्वराचें अस्तित्व कोठेंच प्रतीत होत नव्हतें. मिस आफेलियानें केंटुकीस मिसेस शेल्बींना पाठविलेल्या पत्राचा कांहीं उपयोग होऊन तेथून मदत येईल व आपली सुटका होईल अशी त्याला कांहीं दिवस आशा वाटे, पण याही बाबतींत आतां त्याची निराशा होत चालली. अशा स्थितीत त्याची *आस्तिक्यबुद्धि थोडी डळमळूं लागली असल्यास नवल कसलें ?

*ईश्वर आहे अशी समजूत.

कधीं कधीं कॅसी व दुर्मुखलेली एमिलिन त्याला दिसे, पण कामा-पुढें त्यांच्याशींच काय, कुणाशींही फारसं बोलायला त्याला वेळ होता कोठें ?

एक दिवस रात्रीं तो खिन्नपणें विस्तव पेटवीत बसला असतां त्याला आपले बायबलची आठवण झाली व त्यानें तें खिशांतून बाहेर काढलें. त्यांतील आपल्या आवडीच्या उताऱ्यांवर त्यानें खुणा केल्या होत्या. हे उतारे वाचींत असतां मागें त्याला गहिंवर येई, पण आज तेच उतारे त्याला नीरस वाटूं लागले ! एक दुःखपूर्ण श्वास सोडून त्यानें तें पुस्तक परत आपले खिशांत घातलें. इतक्यांत एक विकट हास्यध्वनि त्याचे कानावर पडला. त्यानें दचकून वर पाहिलें तो समोर लेग्री उभा !

'कसं काय बुद्दबुवा ! इथं धर्मबिर्म कांहीं उपयोगी पडायचा नाहीं हें मी तुम्हांला सांगत नव्हतों ? तुम्हांला त्याची प्रचीती आली म्हणायची !'

त्याचा हा टोमणा टॉमच्या वर्मीं लागला. तथापि कांहीं न बोलतां तो स्तब्ध राहिला. तें पाहून उत्तेजन येऊनच कीं काय लेग्री पुढें म्हणाला, 'मूर्खा ! तुझं बरं करून तुझ्यापासून आपलाहि फायदा करून घ्यावा म्हणून मी तुला विकत घेतला. हल्लीसारखे कष्ट करायला न लागतां त्या सांबो–क्किंवोपेक्षांहि चांगल्या स्थितींत राहून तुला इतर मंडळींवर अधिकार गाजविता आला असता. जाऊं द्या. झालं ते झालं. अजूनहि तुला समजुतदारपणानं वागतां येईल. तें भिकारडं पुस्तक विस्तवांत फेकून दे व माझ्या मनाप्रमाणें वाग !'

हे शब्द ऐकून टॉमच्या अंगावर कांटाच आला. तो म्हणाला 'देवा ! काय ऐकतों मी हें ,'

'देवाच्या नांवानें टाहो फोडण्यांत कांहींच अर्थ नाहीं ! असं

पाहा, तो जर खरोखर असतां तर त्यानें माझ्यासारख्या माणसाच्या हातांत तुला कशाला दिलं असतं ? तूंच विचार कर ! हा धर्म म्हणजे कांहीं तरी थोतांड आहे झालं ! त्याच्या नादीं तूं लागूं नको ! मी कोणीतरी असून तुझं बरं वाईट करण्याची शक्ति माझ्यांत आहे हें लक्षांत ठेव !'

लेग्रीचें हें भाषण टॉमला आवडलें नाहीं; तो म्हणाला, ' धनी-साहेब ! देव मला मदत करो अगर न करो मी त्याला सोडणार नाहीं ! अगदीं शेवटपर्यंत त्यालाच चिकटून राहीन !'

टॉमला एक लाथेची ठोकर देत व त्याचे अंगावर थुंकत लेग्री उत्तरला ' तुझ्यासारखा महामूर्ख तूंच ! हरकत नाहीं, तुला माझे पाय चाटायला लावल्याखेरीज मी कांहीं राहात नाहीं ! ' इतकें बोलून तो निघून गेला.

जेव्हां अन्त:करणावर पडलेलें अत्यंतिक वजनाचें दडपण अन्त:-करणाला खालीं खालीं चेपूं लागतें तेव्हां शेवटच्या क्षणीं अन्त:करण आपली सारी शक्ति एकवटून तें दडपण झुगारून देण्याचा प्रयत्न करते. ब्रह्मानंदाची प्राप्ति होण्यापूर्वीं क्लेशांची पराकाष्ठा होत असते.टॉमची अशीच स्थिति झाली. लेग्रीसारख्या नीच मनुष्याचे नास्तिकपणाचे टोमणे त्याला सहन झाले नाहींत. त्यांच्या भाराखालीं दडपत जाणारें त्याचें हृदय उसळी मारून वर आलें व त्यानें हे नास्तिकपणाचे विचार पार उधळून लावले ! आस्तिक्यबुद्धि खडबडून जागृत झाली ! टॉम सुदपणें विस्तवा-जवळ बसला होता. एकाएकीं त्याचे भोंवतालची प्रत्येक वस्तु अंधुक अंधूक होत जाऊन त्याला क्रूसावरील येशुखिस्त दिसूं लागला. त्याचे सर्वांगांतून रक्त गळत होतें. तरी त्याचा चेहरा किती शांत व सोशिक दिसत होता. ! टॉम त्याचेकडे साश्चर्य भीतीनें पाहूं लागला ! प्रभूचे ते अत्यंत कारुण्यपूर्ण डोळे पाहून टॉमचे हृदय उचंबळून आले

व त्याचे सात्त्विक अष्टभाव जागृत झाले ! त्यानें आपले हात पसरले व गुडघे टेकले—तत्क्षणीं त्या दृश्यांत फरक पडत चालला. प्रभूच्या अंगांतील तीक्ष्ण खिळ्यांचें तेजस्वी किरणांत रूपांतर होऊन त्याचें मुख दैवी तेजानें झळकूं लागले ! तो आपणाकडे स्नेहपूर्ण दृष्टीनें पहात आहे असा टॉमला भास झाला व झोंपेंत ( स्वप्नांत ) पुढील शब्द त्याचे कानीं पडले—

' मोहावर जय मिळवून मी ज्याप्रमाणें माझ्या पित्याच्या सिंहासनावर त्याच्याशेजारीं बसलों त्याप्रमाणेंच जो मोहवश होणार नाहीं तोही माझ्याजवळच माझ्या सिंहासनावर बसेल.'

उजाडतांच आपलें सहकारी मंडळीबरोबर तो कामास निघाला. आज त्याची मुद्रा इतरांप्रमाणें त्रासिक व खिन्न दिसत नसून त्यावर मूर्तिमंत आनंद विलसत होता ! त्याच्या चालण्याच्या गतींतसुद्धां एक प्रकारचा निर्भयपणा दिसत होता. त्याच्यांतील हा फरक पाहून त्या मंडळींना आश्चर्य वाटल्यावांचून राहिलें नाहीं. लेग्रीचे देखील लक्षांत ही गोष्ट आली पण याचा पळून जाण्याचा बेत असावा म्हणून आज हा एवढ्या आनंदांत आहे असा तर्क लढवून त्यानें सांबोला टॉमवर सारखी नजर ठेवायला सांगितलें !

त्या रात्रीं टॉम भजन करीत बसला असतां लेग्री फिरत फिरत तेथें आला. त्यानें टॉमला तोंड बंद करून निजायला जायला फर्मावलें. टॉम सुहास्यमुद्रेनें त्याला प्रणाम करून जाऊं लागतांच लेग्रीचें पित्त भडकलें. टॉमचें भजन ऐकून आधींच तो चिडला होता. टॉमचा आनंदीपणा त्याला कुठला सहन व्हायला ? टॉमला ठोसे मारीत तो म्हणाला, ' कुतरड्या ! आतां तुला मोठ्या गुदगुल्या होत असतील नाहीं ? '

परंतु त्याचे गुद्दे टॉमचे बाह्यांगावर पडत होते; त्याच्या अन्तरंगाला

बिलकूल धक्का बसलां नाहीं ! तो खालीं मान घालून शांतपणें उभा होता ! तें पाहून आपला या माणसावरील ताबा जात चालला असून देव देव म्हणतात तो कोणीतरी आहे व त्याच्याच मदतीमुळें टॉमच्या अंगांत इतकें असामान्य धैर्य आलें असावें असें लेग्रीला वाटूं लागलें व त्यानें ईश्वराला शिव्याशापांची लाखोली वाहिली !

आपणास जो अक्षय आनंदाचा ठेवा सांपडला आहे त्याचा अप्पलपोटेपणानें उपभोग न घेतां आपल्या भोंवतालच्या दुःखी कष्टी जीवांनाही त्यांत भागीदार करावें असें टॉमनें ठरविलें. तो त्यांना सर्वतोपरी मदत करूं लागला. मळ्याकडे जातां-येतांना व कामाचे वेळीं तो त्यांना शक्य तें साह्य करी. त्यांना याचें प्रथम नितकेंसें महत्त्व वाटलें नाहीं, पण कित्येक महिने टॉमची ही वागणूक कायम असलेली पाहून त्यांच्या अन्तःकरणांत पालट होऊं लागला. त्यांच्या पासून काडीचीही अपेक्षा न करतां उलट त्यांना मात्र लागेल ती मदत करावयास तो तयार असे; रात्रीं स्वतः थंडीनें कुडकुडत राहून तो आपलें ब्लँकेट एखाद्या आजारी व कुडकुडणाऱ्या स्त्रीला पांघरायला देई; मळ्यांत काम करीत असतां आपले कापसापैकीं बराचसा कापूस तो अशक्त कामकऱ्याचे टोपलींत टाकी व असें करीत असतां संध्याकाळीं आपला कापूस कमी भरून आपणास शिक्षा होईल याची बिलकूल क्षिति वाटत नसे. आपणाला अमानुषपणें छळणाऱ्या मालकाला व त्याचे मुकादमांना तो कधींही शिव्या देत नसे. यामुळें साहजिकच त्यांचेवर टॉमची छाप बसत चालली. हंगाम संपतांच कामकऱ्यांना रविवारीं सुट्टी मिळूं लागली. त्या दिवशीं टॉम त्यांना एकत्र करून येशूचा संदेश सांगे. त्या सर्व मंडळींना टॉमबरोबर भजन करण्यांत आनंद वाटूं लागला. पण लेग्रीला हें कोठून सहन होणार ? त्यानें अशा सामुदायिक उपासनांना बंदी करून कित्येक

वेळां त्या उधळून लावल्या. यामुळें हातोहातींच संदेश कथनाचें काम चाले. टॉमला ही सर्व मंडळी धर्मोपदेशक मानूं लागली. त्याच्या उपदेशानें दुःखपूर्ण जीवनांतही त्यांना एकप्रकारचें समाधान वाटूं लागलें.

---

## प्रकरण ३७ वें

### मोहाचा प्रतिकार.

निराशा व दुःख यांत सारखें पिचत राहिल्यामुळें आपणाला व इतरांना छळणाऱ्या लेग्रीचा खून करून त्याच्या अभागी गुलामांना दुःखमुक्त करावें असा विचार कॅसीचे मनांत कित्येक वेळां येई. आज हा विचार अमलांत आणण्याचें कॅसीनें ठरविलें.

रात्रीं सर्वत्र निजानीज होतांच ती हलकेच टॉमचे झोपडीशीं आली व आपणाबरोबर येण्याबद्दल तिनें टॉमला खूण केली.

टॉम बाहेर येतांच ती म्हणाली, *' फादर टॉम ! आपण स्वतंत्र व्हावं असं तुम्हाला वाटतं ना ? '

' होय बाईसाहेब ! ' टॉम उत्तरला.

' आजच्या आज तुम्ही स्वतंत्र व्हाल, पण मी सांगेन तें करायला तयार झालं पाहिजे ! '

' तें काय बाईसाहेब ? '

' माझ्याबरोबर चला. लेग्रीचे दारूत मीं गुंगी आणणारं औषध मिसळल्यामुळें तो अगदीं बेहोष होऊन पडला आहे. मागील दाराला कडी नाहीं. मीं तिथं एक कुऱ्हाड मुद्दाम ठेवली आहे ती घ्या व त्याचा कांटा काढा ! मीच ई काम करणार होतें, पण माझ्या हातांत पुरेसं सामर्थ्य नाहीं ! '

कॅसीचा हात धरून तिला मागें खेचीत टॉम म्हणाला, 'बाई-साहेब! काय बोलतां हें? त्रिभुवनाचं राज्य जरी मला कुणी देऊं केलं तरी असलं दुष्कृत्य या हातांनीं होणार नाहीं!'

'पण या बिचाऱ्या गुलामांच्याकडं तरी पहा! आपण त्यांना स्वातंत्र देऊं व दूर कुठं तरी जाऊन राहूं!'

'नाहीं! बाईसाहेब! दुष्कृत्याचा परिणाम कधींच चांगला होत नसतो!' टॉम निश्चयपूर्वक म्हणाला.

'तर मग मींच हें काम करतें?' इतकें बोलून कॅसी जाऊं लागलेली पाहतांच टॉमनें तिचेपुढें गुडघे टेकले व तो कळवळून म्हणाला, 'बाईसाहेब, आपल्या आत्म्याचा असा अधःपात होऊं देऊं नका! अशानं कांहीं चांगलं व्हायचं नाहीं! देवानं आम्हांला दुष्कृत्यं करण्यासाठीं का जन्माला घातल आहे? देव त्याला शिक्षा करील; तें काम आपलं नव्हे! फक्त आपल्या भागाला येतील तीं सुखदुःखं निमूटपणें सोसणं एवढेंच आपलं काम!'

'आतांपर्यंत पुष्कळ सोसलं व देव त्याला शिक्षा करील म्हणून वाटहि पाहिली. पण देव कांहीं त्याला शिक्षा करीलसं दिसत नाहीं! हा छळवाद संपवायला आतां आपणच तयार झालं पाहिजे! त्या-शिवाय इलाज नाहीं!'

टॉम—बाईसाहेब! प्रभूनं आपल्या शत्रूंसाठीं स्वतःचा रक्तपात होऊं दिला, पण त्यांचं अशुभ चिंतलं नाहीं! त्याच्याप्रमाणेंच आपणहि आपल्या शत्रूंना क्षमा करून त्यांच्यावर प्रेम केलं पाहिजे!'

'काय प्रेम करायचं? असल्या दुष्मानावर प्रेम करूं म्हणतां? छेः! कुणालाही हें पटणार नाहीं!' कॅसी दांत ओठ खात म्हणाली.

टॉम आकाशाकडे पहात म्हणाला 'बाईसाहेब, प्रभूनं एवढंच आमच्या हातीं ठेवलं आहे! व यानंच आम्ही विजयी होऊं. आम्ही

जेव्हां सर्वांवर प्रेमच प्रेम करूं तेव्हां युद्ध तत्काळ संपून आमचा जयच होईल ! प्रभूचा जयजयकार असो !'

बोलतां बोलतां टॉमचा गळा भरून आला व त्याचे डोळ्यांतून घळघळा अश्रू वाहू लागले !

त्याचे भाषणाचा कॅसीचे मनावर अनुकूल परिणाम झाल्यावांचून राहिला नाहीं. तिला आपले वर्तनाचा पश्चात्ताप वाटूं लागला. तिचेहि डोळे पाण्यानें भरून आले. तें पाहून टॉमला समाधान वाटलें पुनः अशा प्रकारचे विचार तिच्या मनांत येऊं नयेत म्हणून एमिलीनसह तेथून पळून जाण्याचा त्यानें तिला सल्ला दिला. पूर्वी कॅसीला तें अशक्य वाटत होतें, पण टॉमचा आग्रह पाहून 'निदान प्रयत्न तरी करून पहावा, मग काय होईल तें होईल' असा विचार आजच प्रथम तिचे मनांत आला, ती टॉमला म्हणाली, 'फादर टॉम, मी तुमच्या इच्छेप्रमाणें प्रयत्न करून पहातें.

'आमेन ! प्रभू तुम्हांला यश देवो !' टॉम उत्तरला.

---

# प्रकरण ३८ वें.

## कॅसीची युक्ति.

लेग्रीचे घराचा शेवटचा मजला अर्थात् दुसरे मजल्यावरील माळा इतर घरांचे माळ्यांप्रमाणेंच ओसाड, जिकडे तिकडे धूळ सांचलेली व कोळिष्टकें माजलेलीं असा असून त्यावर घरांतील अडगळ टाकलेली होती. एका लहानशा खिडकींतून थोडाबहुत प्रकाश आंत येई. एकंदरींत ती जागा अतिशय भयाण व भुताखेतांचें वसातिस्थान असल्यासारखी दिसे. साहजिकच त्या जागेंतील भुताटकीसंबंधीं नानाप्रकारच्या दंतकथा भोळसट निग्रो मंडळींत पसरलेल्या होत्या. कांहीं

वर्षांपूर्वीं लेग्रीचे अवकृपेस पात्र झालेल्या एका निग्रो स्त्रीला त्यानें तेथें कित्येक दिवस डांबून ठेवलें होतें. पुढें काय झालें तें कोणास कळलें नाहीं. त्याबद्दल नानाप्रकारचे तर्क वितर्क मंडळींत चालत. अखेर एक दिवस त्या दुर्दैवी स्त्रीचें प्रेत खालीं आणून पुरलेलें मात्र सर्वांना दिसलें ! तेव्हांपासून त्या माळ्यावर शिव्याशाप, भयंकर किंकाळ्या व आरडा ओरडा ऐकूं येतो अशी कुजबूज गुलाममंडळींत सुरू झाली लेग्रीचे कानीं ही गोष्ट जातांच ' जो कोणी त्या माळ्यासंबंधीं हूं कीं चू करील त्याला तिथला पाहुणचार घ्यायला साखळदंडानें जखडून ठेवून देईन ' अशी त्यानें सर्वांना तंबी देऊन त्यांची कुजबूज बंद केली. सर्व गुलामांना त्या माळ्याची भीति वाटत असल्यामुळें त्यांच्यापैकीं कोणीही चुकून देखील तिकडे फिरकत नसे. लेग्री वरून जरी कितीही अवसान आणीत असला तरी इतर निग्रो गुलामांप्रमाणेंच तोही भुताखेतांना भिणारा आहे हें कॅसीला कळून चुकलें होतें म्हणून या गोष्टीचा फायदा घेऊन आपली व एमिलीनची सुटका करून घेण्याचें तिनें ठरविलें.

तिचें शयनगृह बरोबर या माळ्याखालींच होतें. एक दिवस तिनें लेग्रीला न विचारतां मुद्दामच तेथील आपलें सामान हलवून दुसऱ्या खोलींत ठेवण्याची व्यवस्था केली. लेग्रीला हें कळतांच असें करण्याचें त्यानें कारण विचारलें तेव्हां माळ्यावर ऐकूं येणाऱ्या चमत्कारीक आवाजामुळें आपणास स्वस्थ झोंप येत नाहीं, म्हणून आपणास जागा बदलणें भाग पडलें असें कॅसीनें उत्तर दिलें. तें ऐकून लेग्री मनांत थोडा चरकला, पण वरून तसें न दाखवितां तिचीच टर उडविण्याचा त्यानें प्रयत्न चालविला. तेव्हां कॅसी म्हणाली, ' इतकं कशाला ! तुम्हीच तिथं निजून बघा म्हणजे झालं ! मग कळेल तुम्हांला मी काय म्हणतें तें ! '

लेग्री निमूटपणें आपले खोलींत परत आला. आपली मात्रा लागू पडत चालल्याचें कॅसीला दिसून आलें. तेव्हां तिनें अशाच गोष्टी सांगून त्याचे मनांत जास्तच भीति उत्पन्न करण्याचा प्रयत्न चालविला.

माळ्यावरील कौलारांतील एका भोंकांत तिनें एका जुनाट बाटलीचें तोंड अशा रीतीनें बसवून दिलें कीं वारा मंद जरी वहात असला तरी त्यांतून चमत्कारिक व भेसूर आवाज निघावा. सोंसाट्याचा वारा सुटतांच हा आवाज जास्तच कर्कश व किंचाळल्यासारखा निघे. भुताटकीचे संशयानें पछाडलेल्या लोकांचे कानीं हा आवाज पडतांच त्यांची भितीनें अगदीं गाळण उडून जाई.

यानंतर एक दोन दिवसांनीं लेग्री रात्रीचा आपले बैठकीचे खोलींत बसला होता. त्यादिवशीं भयंकर वावटळ सुटली असून वाऱ्याचा घरघर आवाज, खिडक्यांचें दारांची जोरानें होणारी आदळ आपट व वाऱ्यामुळें जिकडे तिकडे उडणारी धूळ यामुळें काळरात्रीचा भास होत होता. लेग्री हिशेब लिहीत असून कॅसी शेगडींतील विस्तवाकडे विमनस्कपणें पहात बसली होती. कॅसीनें मुद्दामच भुताखेतांच्या भयंकर कथांनीं भरलेलें एक पुस्तक टेबलावर ठेवलें होतें. त्याकडे लेग्रीचें लक्ष गेलें. कॅसी संध्याकाळीं तें बुक वाचीत असल्याचें त्यानें पाहिलें होते. त्यानें तें थोडेंसें चाळलें व तो कॅसीला म्हणाला, 'तुझा असल्या भाकड कथांवर विश्वास बसतो का?'

'त्याच्यासीं तुम्हांला काय करायचं आहे?' कॅसी तुसडेपणानें उत्तरली.

'मागें मी जहाजावर नोकरीस असतां इतर खलाशीं जहाजावर चमत्कारिक आवाज ऐकूं येतो असें सांगून मला भेडसावण्याचा प्रयत्न करीत. पण मी कसला वस्ताद! मी लगेंच त्या ठिकाणीं जाऊन

उंदरांचे गडबडीचा व वाऱ्याचा तो आवाज असल्याचे त्यांना तत्काळ पटवून देई !'

लेग्रीचें हें भाषण ऐकत असतां कॅसी भेदक दृष्टीनें त्याकडे पहात होती. अशा रीतीनें ती पाहूं लागली म्हणजे लेग्रीला तिची फार भीति वाटे व तो अस्वस्थ होऊन जाई. आपले दृष्टीचा हा प्रभाव कॅसीला माहीत असल्यामुळे ती तशाच रीतीनें लेग्रीकडे सारखी पहात म्हणाली, 'उंदीर जिन्यावरून माणसांचे पावलासारखा आवाज करीत चालतात नाहीं ? आणि दाराला आंतून कडी असतांहि दार उघडून आंत आपले बिछान्याजवळ येऊन आपले गार हातांनीं ते आम्हांस स्पर्शहि करीत असतील, नाहीं कुणी म्हणावं ?' असें म्हणून तिनें आपला बर्फासारखा गार हात त्याचे हातावर ठेवला. यामुळें लेग्री तर फारच घाबरला. तो म्हणाला ' खरोखरच कां असं कांहीं झालं ?'

' मी तुम्हांला तेथें निजा म्हणतेना ? मग कळेल काय तें ! '

' बरं आहे, मी आतां पिस्तुलं घेऊन वर येतों व पहातोंच तिथं काय आहे तें ! '

घड्याळांत बारा ठोके पडले. ते मोजीत कॅसी म्हणाली, ' चला तर, या माझ्या मागोमाग ! ' ती जिन्याचे दाराशीं जाऊन कानोसा घेऊं लागली. लेग्रीनें मेणबत्ती पेटवून हातांत घेतली व तो तिचे-बरोबर जिन्याचे पायथ्याशीं गेला. कॅसीनें जिन्याचें दार उघडतांच कोणीतरी वर किंचाळल्यासारखा आवाज ऐकूं आला ! तो ऐकतांच लेग्री भीतीनें पांढराफटफटीत पडला ! कॅसी त्याला वर येण्याचा जों जों आग्रह करूं लागली तसा तो मागें सरूं लागला. तें पाहून कॅसी जिन्यावर चढत म्हणाली, ' कांहो ? याना माझ्याबरोबर ! भूतंखेतं सब झूट आहेतना ? '

‘ तूंच जिवंत भूत असावीस असं मला वाटूं लागलं आहे ! नको वर जाऊं, परत फीर ! ’

परंतु त्याचे बोलण्याकडे लक्ष न देतां कॅसीनें विकट हास्य केलें व भराभर वर जाऊन तिनें माळयाचे जिन्याचें दार उघडलें. याचवेळीं आलेल्या वाऱ्याच्या झोतानें लेग्रीचे हातांतील मेणबत्ती विझली. मग काय विचारतां ? तो जास्तच घाबरला. व धांवतच आपले बैठकीचे खोलींत परत आला. त्याचे मागोमाग कॅसीही आलीच. तिनें घाबरल्यासारखी मुद्रा केली होती. लेग्रीकडे तीक्ष्ण दृष्टीनें पहात ती म्हणाली, ‘ कसं काय ? झाली आपली खातरी ! ’

या प्रसंगानें लेग्रीचे मनावर भितीचें एवढें दडपण पडले कीं सिंहाच्या जबड्यांत मान देणें पुरवलें पण त्या माळ्याकडे जाणें नको असें त्यास झालें !

रात्रीं सर्वत्र सामसूम होताच कॅसीनें माळयाची झाडलोट करून आपणास कांहीं दिवस पुरण्याजोगी अन्नसामुग्री हलकेंच वर नेऊन ठेवली. आपलें व एमीलिनचे इतरहि जरूरीचें सामान तिनें आस्ते आस्ते वर नेलें व ती संधीची वाट पहात बसली.

ती आतां लेग्रीशीं लाडीगोडीनें वागूं लागली. एक दिवस तो खुषींत असतां तेथून कांहीं अतरावर ताम्र नदीचे कांठीं असलेल्या गांवीं आपणास फिरावयास नेण्याचा तिनें हट्ट धरला व त्याप्रमाणें त्याचेंबरोबर तेथें जात असतां रस्त्यांतील खाणाखुणा तिनें चांगल्या लक्षांत ठेवल्या.

अशा रीतीनें सर्व गोष्टींची तयारी होतांच एके दिवशीं संध्याकाळीं लेग्री घरीं नसतां ती लगबगीनें एमिलीनकडे येऊन म्हणाली, ‘ हं आटप ! पोषाक घाल ! आपणांस आतांच्या आतां निघालं पाहिजे ! ’

अजून पुरता अंधारदि पडला नाहीं, आतांच आपण निघालों तर ते आपणांस पहातीलना ? ' एमीलीननें भीतभीत विचारलें.

' राहूं देत ग ! त्यांनीं पाहिलंच पाहिजे ! आपण केव्हां जरी गेलो तरी ते आपला पाठलाग करणारच ! माझा बेत तरी ऐक ! आपण मागील दारानें बाहेर पडून गुलामांचे झोपडयांजवळून खालीं पळत जाऊं. तो मेला सांबो नाहींतर किंबो कोणी तरी तिथं असणारंच. तो आमचे मागें लागतांच आपण तसेंच पळत पुढें दलदलीचे प्रदेशापर्यंत जाऊं. त्या ठिकाणीं झाडाझुडपांची गर्दी असून तो भाग उंच सखल असल्यामुळें त्याला अंधेरात पुढें आमचा पाठलाग करतां येणें शक्य नाहीं. मग तो परत जाऊन इतर लोक व कुत्रे बरोबर घेऊन येईल. ते येथें परत यायचे आंत आपण घराचे मागून वहात जाणाऱ्या ओढयांतून चालत जाऊन मागील दार गाठूं पाण्यांतून गेल्यामुळें कुत्र्यांना आपला माग सांपडणार नाहीं कारण पाण्यांत पावलांचा वास टिकत नाहीं. आम्ही पळून गेल्याचें कळतांच घरांतील सर्व मंडळी आमचे शोधार्थ बाहेर पडतील व आपण वर माळ्यावर जाऊन बसलेले कोणाचेच लक्षांत येणार नाहीं ! कांहीं दिवस त्या माळ्यावरच राहिलं पाहिजे. कारण आम्हांला पकडण्यासाठीं तो आकाश पाताळ एक केल्याखेरीज राहणार नाहीं. आजपर्यंत आपल्या कोणाही गुलामांना आपण पळून जाऊं दिलें नाहीं अशी त्याला घमेंड असल्यामुळें शेजार पाजरच्या मळ्यांतून माणसे व कुत्रे आणून आसपासचा कानान् कोपरा तो तपासील. '

कॅसीची ही युक्ति एमिलीनला पसंत पडली. नंतर त्या दोघी ठरल्याप्रमाणें तेथून निघाल्या. दलदलीचे प्रदेशाकडे जात असतां त्यांचे अपेक्षेप्रमाणें उभे राहण्याबद्दल मागून कोणी तरी दरडावून सांगितलें पण तो आवाज सांबो किंवा किंबोचा नसून खुद्द लेग्री साहेबांचा

होता. कारण तेंच त्यांचा पाठलाग करीत त्यांचे मागोमाग येत होते.

एमिलीन घाबरलेली पाहतांच कॅसीनें बरोबर आणलेला तीक्ष्ण खंजीर तिला दाखवला व रेंगाळलीस तर ठार करीन अशी तिला धमकी दिली त्याबरोबर एमिलीन मुकाट्यानें कॅसीबरोबर धावूं लागली. लवकरच त्या दलदलींतील एका खोल व अंधाऱ्या भागांत त्या शिरल्या त्यामुळें लेग्रीला त्यांचा पाठलाग सोडून देऊन परत यावें लागलें.

परत येतांच त्यानें झालेली हकीकत सांगून सर्व मंडळी एकत्र केली. कामावरील लोक आतां परत आले होतेच. पळून गेलेल्या या दोघींना पकडून देणारास पांच डॉलर बक्षीस देण्याचें व इतरांना एकेक ग्लास दारू देण्याचें त्यानें आश्वासन दिलें. बक्षिसाच्या व दारूच्या लालसेनें व मालकाला खूप करण्याचे इरादानें त्या मंडळींत पळापळ सुरू झाली. नंतर लेग्री आपले भयंकर कुत्रे व सांबो किंबो हे हस्तक बरोबर घेऊन निघाला. त्यांनीं मोठमोठे पाजळलेले पलिते हातांत घेतले होते व अशा रीतीनें सर्वजण आरडाओरड करीत दलदलीज्वळ आले. याच वेळीं कॅसी व एमिलीन हलकेंच परत आल्या व लेग्रीचे बैठकीचे खोलींत शिरल्या. लेग्रीनें घाईनें तेथें फेकलेल्या कोटाचे खिशातील किल्ली घेऊन कॅसीनें त्याचे टेबलाचा कप्पा उघडला व त्यांतील नोटांचें पुडकें आपले खिशांत कोंबलें ! तिचें हें कृत्य एमिलीनला रुचलें नाहीं. ती म्हणाली ‘ कॅसीबाई ! ही तर चोरी झाली ! चोरी करणें पाप आहे ना ?

‘ चोरी ! कसली ग यांत चोरी आली आहे ? त्यानें तरी हे पैसे निढळाच्या घामानें मिळविले असतील नाहीं ? गरीब बिचाऱ्या गुला-मांच्या रक्ताचे हे पैसे या चोरानें तरी लुबाडलेच नाहींत काय ? तेच मी त्याच्यापासून घेतले तर त्यांत काय बिघडलें ? आम्हांला पुढील

प्रवासासाठीं पैसे हवेतच. पैसा आहे तर सर्व आहे; नाहींतर वाटेंत आमचे हाल कुत्रा देखील खाणार नाहीं ! बरं हें आतां राहूं दे. आधीं वर चल. ते परत यायच्या आंत आपणांस तिथं जाऊन बसलं पाहिजे ! '

त्या दोघी वर येतांच कॅसीनें ठेवलेली सर्व जय्यत तयारी पाहून एमिलीनला अति आनंद झाला. तेथें पसरलेल्या आंथरुणावर एमिलीन उशीला टेकून पडली व वेळ जाण्यासाठीं कॅसीनें एक फ्रेंच बुक उघडून तें वाचण्यास सुरवात केली.

थोड्या वेळानें शिकार न सांपडल्यामुळें लेग्री व त्याचेबरोबरची मंडळी चरफडत घरीं परत आली !

---

## प्रकरण ३९ वें.

### बलिदान !

कॅसी व एमिलीन यांना पकडण्यासाठीं ज्यावेळीं लेग्रीनें आपली सर्व गुलाममंडळी एकत्र केली तेव्हां टॉमचे डोळे आनंदानें चमकले; वर पहात त्यानें हात जोडले व इतरांबरोबर पाठलागास न येतां तो मागें राहिला हें लेग्रीचे लक्षांत आल्यावांचून राहिलें नाहीं. टॉमला आपणाबरोबर पाठलागास येण्यास भाग पाडावें असेंहि एकदां त्याचे मनांत आलें पण टॉमला त्याचे इच्छेविरुद्ध एखादी गोष्ट करावयास लावणें किती कठीण आहे हें कळून चुकल्यामुळें त्याच्याशीं कटकट करीत बसून निष्कारण विलंब लावावा हें त्याला बरें वाटलें नाहीं. पण पाठलागाचे कामीं हें यश न आल्यानें चिडलेल्या लेग्रीला आपला राग कोणावर तरी काढावयाचाच होता. टॉम त्याचे डोळ्यांत सलत होताच. शिवाय त्याचे वर्तनावरून तो कॅसी व एमिलीन यांना

सामील असावा असाहि त्यास संशय येऊं लागला. टॉमला चावूं कीं गिळूं असें त्याला होऊन गेलें ! तथापि टॉमला शिक्षा करण्याचें काम दुसऱ्या दिवसावर ढकलून आपले दुर्दैवाला शिव्या देत व ‘ मी उद्या याचा सूड घेईनच घेईन ’ अशी प्रतिज्ञा करून लेग्री झोपी गेला.

उजाडतांच त्यानें पळून गेलेल्या गुलामांची शिकार करण्याची जंगी तयारी चालविली. आसपासच्या मळ्यांतून शिकारी कुत्रे व आपली स्नेही मंडळी त्यानें बोलावून आणली. या लोकांजवळ भरलेल्या बंदुका सज्ज होत्या. नंतर सर्व मंडळींना लेग्रीनें यथास्थित दारू पाजली. दलदलीचे प्रदेशाभोंवतीं वेढा देऊन बारकाईनें शोध करावयाचा, आपली शिकार तेथें सांपडली तर ठीक, नाहीं तर टॉमचा पुरता समाचार घ्यायचा असें लेग्रीनें ठरविलें.

कॅसी व एमिलीन यांनीं माळ्याचे भिंतींतील भोंकांतून खालील ही सर्व तयारी पाहिली. कॅसी उद्वेगानें म्हणाली, ‘ देवा ! आम्ही सगळेच जण पातकी आहों, पण यांच्यापेक्षां आम्ही दोघींनींच असं काय पातक केलं आहे कीं त्याबद्दल आमचा असा छळवाद चालावा! पोरी, तुझ्यासाठीं माझा जीव तुटतो, नाहीं तर अश्शी त्यांच्यापुढं जाऊन मीं त्यांना मला गोळी घालून ठार करण्याबद्दल विनंति केली असती! स्वातंत्र्य मिळून तरी मला आतां त्याचा काय उपयोग आहे ? त्यामुळं माझीं मुलं माझ्या थोडीच दृष्टीला पडणार ? ’

कांहीं न बोलतां एमिलीननें तिचा हात धरला. तो दूर करीत कॅसी म्हणाली ‘ हो बाजूला ! तुझ्या अशा वागणुकीनं माझं तुझ्यावर प्रेम बसूं लागेल, आणि मला तर तें नको आहे ! आतां कुणावर प्रेम करण्याची माझी इच्छा नाहीं समजलीस ! प्रेमाच्या बाबतींत झाली एवढी फसगत पुरे ! ’

‘ कॅसीबाई ! तुमच्याबद्दल भारी मला वाईट वाटतं ! नका गडे

असं बोलूं ! देवानं जर आम्हांला स्वातंत्र्य दिलं तर कदाचित् तुमच्या मुलांची व तुमची भेट होईल, नाहीं कुणी म्हणावं ? माझी माता आतां कांहीं भेटण्याची मला आशा नाहीं. यापुढं माझी आई तुम्हीच ! तुम्ही कशाही माझ्याशीं वागा, मी आईप्रमाणेंच तुमच्यावर प्रेम करणार ! '

एमिलिनच्या या शब्दांनीं कॅसीचें हृदय भरून आलें. तिला पोटाशीं धरून ती म्हणाली, ' देवा ! आपल्या मुलांना पाहण्याची मला किती इच्छा आहे ! आतां ती आशा व्यर्थ आहे ! प्रभो, तूं जर माझीं मुलं मला भेटवशील तर मी आनंदानं तुझी प्रार्थना करीन !'

' कॅसीबाई तुम्ही देवावर भरंवसा ठेवा. तो अत्यंत दयाळू आहे !' एमिलिन म्हणाली.

लेग्री व त्याचे बरोबरची मंडळी यांनीं तपासाचे कामीं बिलकूल कसूर केली नाहीं. पण तिथं त्यांची शिकार नव्हतीच तर ती त्यांना कोठून सांपडणार ? घामाघूम व खिन्न झालेला लेग्री घोडयावरून उतरत असलेला कॅसीला दिसला.

बैठकीचे खोलींत येतांच आपलें खुर्चीवर अंग टाकून तो म्हणाला ' किंबो ! त्या टॉमला धक्के मारीत इथं घेऊन ये ! या सर्व भानगडीच्या मुळाशीं खात्रीनें तोच काळा बुद्रुक असला पाहिजे ! '

आपले गैरहजेरींत टॉमला आपला व्यवस्थापक करण्यासाठीं लेग्रीनें विकत आणल्याचें कळल्यापासून सांबो व किंबो टॉमचा द्वेष करीत. धन्याची टॉमवरील अवकृपा पाहून ते त्याचा जास्तच छळ करूं लागले होते. लेग्रीची आतांची आज्ञा ऐकतांच किंबो उड्या मारीतच टॉमकडे आला !

त्याचा निरोप ऐकतांच आज आपली इतिश्री होणार हें टॉमला कळून चुकलें. कॅसी व एमिलीन या कुठं लपल्या आहेत तें त्याला

माहीत होतें. राक्षसी स्वभावाचा लेग्री आपणांकडून तें काढण्यासाठीं आपले हालहाल करून प्राण घेईल याबद्दल त्याला संशय नव्हता. तथापि विश्वासघात करून त्या दोघींना लेग्रीचे हातीं देण्याऐवजीं स्वतःचें बलिदान करण्याचें त्यानें ठरविलें.

आपले हातांतील टोपली खालीं ठेवून आकाशाकडे पहात तो म्हणाला, ' मंगलमय देवा ! माझा आत्मा मीं तुला वाहिलेला असून तूं त्याची मुक्तता केलेलीच आहेस ! '

क्बिोनें त्याला गचांडी देत म्हटलें ' अरे चल ! किती वेळ लावतोस ! धनीसाहेबांच्या गुलामांना पळून जायला फूस देतोस नाहीं का ? कळेल तुला आतां त्यांचा हिसका ! '

परंतु क्बिोचे हे शब्द टॉमचे कानीं पडलेच नाहींत ! या वेळीं त्याला निराळाच आवाज ऐकूं येत होता. कोणी तरी त्याचे कानाशीं गुणगुणत होतें, ' भिऊं नको ! ते फार तर तुझ्या शरीराचा नाश करतील, पण पुढें–पुढें तुझें बरें वाईट करण्याचें कांहींच त्यांच्या हातीं नाहीं ! ' हा संदेश ऐकून टॉमचें अंग आनंदानें पुलकित झालें व आपले अंगीं असामान्य धैर्य आल्याचा त्याला भास झाला. तो शांतपणें क्बिोबरोबर चालला.

टॉम दृष्टीस पडताच एखाद्या हिंस पशूप्रमाणें त्याचेवर झडप घालून व त्याचे कोटाची कॉलर धरून त्याचेकडे क्रूरपणानें पहात लेग्री म्हणाला, 'मी तुला आज ठार केल्याखेरीज राहणार नाहीं समजलास!'

' धनीसाहेब वाटेल तें करायला मुखत्यार आहेत ! ' टॉम शांतपणें उत्तरला.

' होय ना ? तर मग त्या दोघी कुठं आहेत तें बऱ्या बोलानं कबूल कर, नाहीं तर—

टॉम स्तब्ध असलेला पाहून लेग्री चिडला. रागानें पाय आपटीत

तो गर्जना करीत म्हणाला, ' काय, ऐकायला येतं कीं नाहीं ? तोंड उघड—'

' धनीसाहेब ! सांगण्यासारखं माझ्याजवळ कांहींच नाहीं ! '

' धार्मिकपणाचा आव आणणाऱ्या काळ तोंडया थेरडया ! खरोखरीच तुला कांहीं माहीत नाहीं, नाहीं ? '

टॉम स्तब्ध उभा होता.

' बोल कीं ? आतां दांतखीळ बसली होय ?' त्याला जोरानें गुद्दा लगावीत लेग्रीनें विचारलें.

' धनीसाहेब, मला माहीत आहे, पण तें सांगण्याची माझी इच्छा नाहीं ! त्यासाठीं वाटेल ती शिक्षा भोगायला मी तयार आहे ! '

' आजपर्यंत मीं तुझी गय केली म्हणून तूं शेफारलास होय ! यावेळीं मी एक तर तुला कबूल करायला लावीन, नाहीं तर तुझा जीव घेईन ! तूं काय समजला आहेस ! तूं कबूल करीपर्यंत तुझ्या शरीरांतला रक्ताचा थेंबन् थेंब मी बाहेर काढीन ! सोडणार नाहीं ! '

टॉम त्याचेकडे पहात म्हणाला, ' धनीसाहेब ! आपण आजारी असतां, संकटांत असतां अगर मृत्यूचे दारीं असतां तर आपणाला वांचविण्यासाठीं माझ्या हृदयांतलें रक्त मीं खुषीनें दिलें असतें ! आपल्या आत्म्याचा अधःपात टळत असेल तर या जीर्ण शरीरांतील रक्ताचा थेंबन् थेंब मी द्यायला तयार आहे ! असें वागून पापाचे धनी होऊं नका ! कारण त्यामुळं माझ्यापेक्षां आपणालाच जास्त दुःख होईल ! माझं काय ? मी मरून जाईन, पण तुम्हांला होणाऱ्या यातना कधींच संपायच्या नाहींत !'

लेग्रीला थोडा वेळ विचार पडला. काय करावें तें त्याला सुचेना. शेवटीं त्याच्या दुष्ट मनोवृत्तीचाच जय होऊन क्रोधानें फणफणत त्यानें

टॉमला इतक्या जोरानें गुद्दा मारला कीं त्यासरशीं टॉम धाडकन् जमीनीवर पडला !

नंतर सांबो किंबोंनीं टॉमला एका जुनाट खोपटांत नेऊन लेग्रीचे देखरेखीखालीं त्याला निर्दयपणें चाबकानें झोडपण्यास सुरवात केली. या कामी लेग्री त्यांना सारखा उत्तेजन देतच होता ! धैर्यानें यातना सोसण्याबद्दल टॉमला धीर द्यायला तेथें कोणीच नव्हतें कां ? टॉमजवळ उभा असलेला परमेश्वर इतरांना दिसत नसला तरी टॉमला दिसत होता !

लेग्री वरचेवर त्याला अमिष दाखवी. प्रत्येक क्षणीं 'दुसऱ्यांसाठीं फुकट कां मरतोस ? सांगून मोकळा होईनास !' असा मोह त्याला पाडीत होता, पण तें धैर्यशाली हृदय खचलें नाहीं; शाश्वत सुखावर त्याची दृष्टि खिळलेली होती !

टॉमची ती विलक्षण शांति पाहून सांबोचें हृदय द्रवलें. तो लेग्रीकडे पहात म्हणाला, 'धनीसाहेब, आतां पुरें करावं म्हणतों, कारण हा बहुतकरून आटोपलेला दिसतोय् !'

'अरे हात चालू ठेवा ! तो कबूल होईपर्यंत त्याच्या शरीरांतून रक्ताचा थेंबन् थेंब बाहेर काढा ! बिलकूल थांबू नका !!' लेग्री ओरडून म्हणाला.

टॉमनें हलकेच डोळे उघडले व लेग्रीकडे पहात तो म्हणाला, 'अरेरे ! दुर्दैवी प्राण्या ! आतां माझं वाईट करायचं काय तुझ्या हातांत राहिलं आहे ! तुझ्या सर्व अपराधांची मी तुला क्षमा करतों !' इतकें बोलून तो बेशुद्ध झाला.

त्याला पाहण्यासाठीं लेग्री अमळ पुढें गेला व म्हणाला, अरे खरंच ! हा संपलासं वाटतं ! बरं झालं त्याचं तोंड एकदांचं कायमचं मिटलं !'

टॉमचा आत्मा अद्याप त्याचें शरीराचा त्याग करून गेलेला

नव्हता. त्याच्या वर्तनानें आजपर्यंत अहमहमिकेनें त्याचा छळ करणाऱ्या त्याच्याच जातीच्या सांबो किंबोवर मात्र विलक्षण परिणाम झाला ! त्यांना पश्चात्ताप वाटूं लागला. लेग्रीची पाठ फिरतांच त्यांनीं टॉमच्या जखमा धुतल्या, निरुपयोगी कापडाचें आंथरूण तयार करून त्यावर त्याला निजविलें व त्याला शुद्धीवर आणण्याचा प्रयत्न चालविला. एकानें लेग्रीकडे जाऊन 'आपण फार थकलों आहों थोडी दारू द्या' असा बहाणा करून दारू आणली व ती टॉमला पाजली. तो शुद्धीवर येतांच किंबो म्हणाला, 'टॉम ! आमची चूक झाली ! आम्ही इतक्या निष्ठुरपणानं तुझ्याशीं वागायला नको होतं !'

टॉम खोल आवाजानें म्हणाला, 'मीं तुम्हांला मनापासून क्षमा केली आहे !'

'टॉम ! इतका तुला धीर देणारा हा येशू कोण? आम्हांला त्याची थोडी माहिती सांगतोस का?' सांबोनें विचारलें.

टॉम जरी अगदीं थकला होता तरी या शब्दांनीं त्याला थोडी हुषारी आली व त्यानें येशूचें जीवित, मृत्यु व तारणाचें सामर्थ्य याबद्दल थोडक्यांत त्यांना माहिती सांगितली. ती ऐकत असतां ते सारखे अश्रुमोचन करीत होते. दोघांनींही आपणांवर दया करण्याबद्दल खिस्त प्रभूची प्रार्थना केली.

'देवा ! हे दोघेही अडाणी आहेत. यांच्या उद्धारासाठीं माझ्याजवळ असेल नसेल तें द्यायला मी तयार आहे. त्यांना सन्मार्ग दाखीव !' टॉमनें प्रार्थना केली.

देवानें ही टॉमची विनंति मान्य केली.

---

## प्रकरण ४० वें

### जॉर्ज शेल्बी.

यानंतर दोनच दिवसांनीं लेग्रीचे बंगल्याजवळ एक लहानशी गाडी येऊन उभी राहिली व तिच्यांतून एक तरुण गृहस्थ घाईघाईनें खालीं उतरून बंगल्याचे मालकाची चौकशी करूं लागला. हा तरुण गृहस्थ म्हणजे टॉमचा ' छोटा साहेब ' जॉर्ज शेल्बी होता. तो येथें कसा आला हें कळण्यासाठीं आपणांस थोडें मागें गेलें पाहिजे.

मिस आफेलियानें मिसेस शेल्बींना टॉमच्या मुक्ततेची तजवीज करण्याबद्दल न्यू अरलिन्सहून केंटुकीला पाठविलेलें पत्र दुर्दैवानें एका दूरच्या पोस्ट ऑफिसांत बरेच दिवस पडून राहिलें. दरम्यान टॉमची विक्री होऊन तो लेग्रीचे हातीं पडला होता.

तावडतोब टॉमचे मुक्ततेची तजवीज करणें मिसेस शेल्बींना शक्य नव्हतें कारण मि. शेल्बी तापानें अत्यवस्थ असून त्यांच्या शुश्रूषेंत त्यांचा सारा वेळ जाई. त्यांचा मुलगा जॉर्ज हा आतां वयांत आलेला होता. त्याचाच काय तो त्यांना सर्व बाबतींत आधार होता. लवकरच शेल्बी वारले व त्यांचे इस्टेटीची भानगड मिटविण्यांत सुमारें सहा महिने गेले. मिस आफेलियानें पाठविलेल्या पत्रांत सेंट क्लेअरचे वकिलाचा पत्ता दिलेला होता त्या पत्त्यावर पत्र पाठवून त्यांनीं टॉमची चौकशी केली तेव्हां ' त्याची जाहीर लिलांवानें विक्री होऊन त्याचे पैसे आपणास मिळाले, बाकी आपणास कांहींच माहिती नाहीं ' असें त्याचें उत्तर आलें. मग स्वतःच न्यूअरलिन्सला जाऊन टॉमचा तपास करून त्याचा सोडवून आणण्याचा जॉर्ज शेल्बीनें बेत केला व त्याप्रमाणें तो न्यूअरलिन्सला आला. कित्येक महिनेपर्यंत त्याला कांहींच दाद लागेना. शेवटीं सुदैवानें एका मनुष्याची गांठ पडून

त्यानें जॉर्जला टॉमबद्दल माहिती दिली. तत्काळ जॉर्ज ताम्र नदींतील बोटींत बसून लेग्रीचे मळ्याकडे येण्यास निघाला.

लेग्रीची गांठ पडतांच जॉर्जनें त्याचेजवळ टॉमची मागणी केली तेव्हां कपाळाला आंठ्या घालून टॉमला शिव्या देत लेग्री म्हणाला, ' तो हरामखोर माझ्या गुलामांना फूस देऊन बिघडवूं लागला. त्यामुळें माझ्या भारी किंमतीच्या दोन गुलाम स्त्रिया नुकत्याच पळून गेल्या. त्यांची त्याला माहिती होती ती सांगण्यासाठीं मीं त्याला इतका झोडपून काढला पण तो चोर तोंड उघडेल तर शपथ ! आतां त्यानें मरणाचें ढोंग चालविलें आहे ! '

' पण तो आहे कुठं तें तर सांगाल ? जॉर्जनें संतापातिशयानें विचारलें.

' तो बघा त्या खोपडींत आहे ' टॉम असलेल्या खोपडीकडे बोट दाखवीत तेथें उभें असलेलें एक निग्रो पोर म्हणालें. लेग्रीनें शिव्या देत त्या पोराला एक लाथ लगावली. तिकडे लक्ष न देतां जॉर्ज त्या खोपटांत गेला.

गेले दोन दिवस टॉम एकसारखा त्या जागेंत पडून होता. तो आतां सुखदु:खातीत झाल्यामुळें त्याला यातना बिलकूल होत नव्हत्या. कामावरून परत आल्यावर सर्व गुलाम मंडळी त्याचेजवळ येऊन बसत. टॉमला देतां येण्यासारखं त्या दुर्दैवी प्राण्यांच्या जवळ काय होतें ? एक कपभर थंड पाणी—पण तेंच ते त्याला मोठ्या आनंदानें देत.

आपणासाठीं टॉमनें केलेल्या बलिदानाची हकीगत कॅसीला इतर मंडळींची कुजबूज आडून ऐकल्यामुळें कळून आली व आपण ओळखलें जाऊं याची पर्वा न करतां आदल्या रात्रीं ती टॉमचे समाचारास येऊन गेली होती.

जॉर्ज टॉमचे बिछान्याजवळ जाऊन गुडघे टेकून रडत म्हणाला,

'अरेरे टॉमकाका! काय तुमची दशा झाली ही! डोळे उघडून माझ्याकडं एकदां तरी पहाहो! मी तुमचा छोटासाहेब जॉर्ज शेल्बी आलों आहे. मला ओळखलंत का?'

टॉम डोळे उघडून शून्यपणें जॉर्जकडे पहात राहिला. थोड्या वेळानें त्याला जॉर्जची ओळख पडली. तात्काळ त्याचे डोळ्यांतून आनंदाश्रु वाहूं लागले. आपले हात जोडून तो म्हणाला, 'प्रभूचा जयजयकार असो! अगदीं हेंच-हेंच मला पाहिजे होतं? मला ती मंडळी विसरली नाहींत! झालं माझं काम! आतां माझा प्राण सुखानं जाईल!'

'नाहीं, तुम्ही मरणार नाहीं. तो विचारसुद्धां आतां मनांत आणू नका! मी तुम्हाला विकत घेऊन परत घरीं नेण्यासाठीं आलों आहे!' जॉर्ज आवेशानें म्हणाला.

'छोटेसाहेब! तुम्हांला फार उशीर झाला हो! प्रत्यक्ष प्रभूनं मला आतां विकत घेतलं असून लवकरच तो मला आपले घरीं घेऊन जाणार आहे! मला त्याबद्दल किती उत्कंठा लागली आहे म्हणून सांगूं! केंटुकीपेक्षां स्वर्ग खचीत जास्त चांगला आहे!'

'टॉमकाका! नका हो आम्हांला सोडून जाऊं! तुमचा वियोग मला सहन व्हायचा नाहीं! आजपर्यंत तुम्हीं किती दुःखें सोसलींत? शेवटीं या भिकार जागेंत तुम्हांला मृत्यु यावा ना? अरेरे! गरीब बिचारा!'

'मला आतां 'गरीब बिचारा' म्हणूं नका! एका काळीं मी 'गरीब बिचारा' होतों पण ते दिवस गेले. मी आतां वैभवाच्या दारांत शिरत आहे! प्रभूच्या कृपेनं मला स्वर्गप्राप्ति झाली आहे! प्रभूचा जयजयकार असो! माझी इथं काय स्थिति झाली ते बिचाऱ्या क्लोला मात्र कळवूं नका हं! कारण त्यामुळं तिची छाती फुटून

जाईल. तिला एवढंच सांगा कीं प्रभूनं मला आपला म्हटलं असून मी सुखानं त्याच्याजवळ राहण्यासाठीं स्वर्गी गेलों आहें ! आणि माझीं मुलं—त्यांच्यासाठीं माझं हृदय भडभडून येतं—त्यांना म्हणावं 'आपल्या बापाच्या पावलावर पाऊल टाकून जा, तुमच कल्याण होईल ! धनी-साहेबांना, बाईसाहेबांना, तेथील सर्व मंडळींना माझा सप्रेम नमस्कार सांगा, त्या सर्वांवर—त्यांच्यावरच कां—सर्व प्राणिमात्रांवर माझं प्रेम आहे! प्रेमाशिवाय मला आतां दुसरं तिसरं कांहींही दिसत नाहीं ! प्रेम ! प्रेम ! प्रेम ! ! जिकडं पहावं तिकडं प्रेमच प्रेम !'

याच वेळीं लेग्रीनें खोपडींत डोकावून पाहिलें व तो पुढें निघून गेला. त्याला पाहून जॉर्ज क्रोधानें फणफणत म्हणाला, 'हा मनुष्य कसला ? निवळ सैतान आहे !'

'छोटेसाहेब ! नका असं बोलूं ! तो वाट चुकलेला एक दुर्दैवी प्राणी आहे ! मला त्याची कींव येते. त्यानं माझं काय वाकडं केलं ? उलट त्याच्यामुळं मला स्वर्गद्वार लौकर गांठतां आलं ! अजूनहि आपल्या वर्तनाचा पश्चात्ताप होईल तर प्रभू त्याला क्षमा करील ! पण असं होईलसं मला वाटत नाहीं !'

आपल्या छोट्यासाहेबाची भेट झाल्यामुळें इतका वेळ टॉम आनंदाचे भरांत बोलत होता, पण आतां त्याची शक्ति क्षीण होत जाऊन श्वास आंत ओढूं लागला. त्यानें एकदां सस्मित मुद्रेनें जॉर्जकडे पाहिलें व प्राण सोडला !

जॉर्ज तेथून उठतो तों लेग्री त्याचे दृष्टीस पडला. त्याला जॉर्ज म्हणाला, 'टॉमकाकाला तुम्हीं जिवंतपणीं पिळून काढलाच आहे. आतां त्याच्या मृत देहाची किंमत काय घेणार बोला. मला त्याचा दफनविधी करावयाचा आहे.

'मी मेलेले गुलाम विकत नसतों ! तुम्ही खुशाल त्याला घेऊन

जाऊन पाहिजे तिथं पुरा! माझी कांहीं हरकत नाहीं!' लेग्री तुच्छपणें म्हणाला.

जॉर्जनें तेथील दोन तीन निग्रो गुलामांना मदतीस बोलावलें. एकानें खोरें आणलें व दुसरे दोघे टॉमचा मृत देह जॉर्जचे गाडीकडे नेण्याचे कामीं त्याला मदत करूं लागले. गाडींत टॉमचा देह ठेवतांच जॉर्जनें त्यावर आपला झगा पसरला. नंतर तो लेग्रीकडे वळून म्हणाला 'या नीच कृत्याबद्दल आतांपर्यंत मी तुम्हांला कांहीं बोललों नाहीं कारण तसं करण्याची ही वेळ नव्हे व स्थळहि नव्हे! हा खून पचेल असं मात्र समजूं नका! मॅजिस्ट्रेटकडे याबद्दल फिर्याद केल्याखेरीज मी राहाणार नाहीं!'

'जा हो! काय तुम्हांला करायचं असेल तें करा! उगीच गुरकावूं नका! मीं खून केला याला पुरावा काय? साक्षीदार कोण आहे?!' लेग्री तिरस्कारपूर्वक उत्तरला.

होय, त्याचें म्हणणें खरें होतें! कारण त्याचें हें दुष्कृत्य पाहायला कोणीही गोरा मनुष्य हजर नसून दक्षिणेकडील संस्थानांतील कोर्टांत गुलामांना साक्ष देण्याचा अधिकार नव्हता!! जॉर्जचे लक्षांत ही गोष्ट येतांच त्याला अतिशय वाईट वाटलें व रागहि आला. त्याला आणखी चिडविण्यासाठीं लेग्री कुचेष्टेनें म्हणाला, 'एका यःकश्चित् निग्रोसाठीं कशाला एवढ्या शिरा ताणतां? मेला तर मेला! आहे काय त्यांत!'

लेग्रीच्या या शब्दानें दारूच्या कोठारांत आगीची ठिणगी पडल्यासारखें झालें. तापट स्वभावाच्या जॉर्जनें एकदम लेग्रीला जोरानें ठोसा मारून धूळ खायला लावलें! व त्याचे अंगावर पाय देऊन विजयी मुद्रेनें तो इकडे तिकडे पहात उभा राहिला.

चांभाराच्या देवाला खेटराचीच पूजा आवडते म्हणतात त्यांतलाच लेग्रीचा प्रकार होता. जॉर्ज गाडीकडे जातांच हलकेंच उठून त्यानें

आपले कपडे साफ केले व जाणाऱ्या गाडीकडे ती दृष्टीआड होईपर्यंत तो निमूटपणें पहात राहिला.

लेग्रीचे मळयाचे सीमेपलीकडे येतांच तेथील एका वृक्षराजींत बरोबर आलेल्या लेग्रीचे तिघा गुलामांचे मदतीनें जॉर्जनें टॉमच्या देहाचें दफन केलें.

नंतर त्या गुलामांना बक्षिसी देऊन जॉर्जनें त्याना परत लावलें व टॉमचे थडग्याजवळ गुडघे टेकून गुलामगिरीचा नायनाट करण्यासाठीं आपणाला जितकें करतां येईल तितकें करण्याची त्यानें शपथ घेतली.

---

## प्रकरण ४१ वें

### पलायन.

हल्लीं लेग्रीचे घरांत भुताटकीचे चाळयांस ऊत आला होता. मध्यरात्रीचे सुमारास माळ्याचे जिन्यावरून पांढरें वस्त्र परिधान केलेली कोणी उंच व्यक्ति पावलें वाजवीत खालीं येऊन घराभोंवतीं फिरते, ती क्षणांत दिसते क्षणांत नाहींशी होते; जिन्याचे दारांस कड्या कुलुपें लावलीं तरी तीं आपोआप उघडलीं जातात इत्यादि कुजबूज गुलाम मंडळींत सुरू होऊन ती लेग्रीचेहि कानावर गेली. त्यामुळें तो घाबरून गेला. टॉमचे मृत्यूपासून त्याच्या मनाला सदसद्विवेक बुद्धीची भयंकर टोचणी सुरू झाली होती व एकांत मिळतांच आपलीं दुष्कृत्यें वेडींवांकडीं रूपें घेऊन आपणास भेडसावीत आहेत असा त्याला भास होई. यासाऱ्या गोष्टींचा विसर पाडण्यासाठीं त्यानें दारू पिण्याचें प्रमाण वाढविलें होतें. एक दिवस आंतून सर्व दारांना कडयाकुलुपें लावून व दिवा तेवत ठेवून तो निजला असतां त्याला कोणाचें तरी कण्हणें व किंकाळ्या ऐकूं येऊं लागून तो जागा झाला. दार उघडून कोणीतरी शुभ्रवस्त्र परिधान केलेली व्यक्ति

आंत येत आहे असें त्याला दिसलें. त्या व्यक्तीनें दिवा मालविला व लेग्रीचे बिछान्याजवळ येऊन आपला कालासारखा गार हात त्याचे अंगावर ठेवला. लेग्रीची भीतीनें बोबडी वळली व त्याचे अंगास दर-दरून घाम सुटला. ती व्यक्ति आपली आईच असावी असें त्याला वाटलें. 'ये, ये, माझ्याकडे ये !' असे तीनदां उच्चारलेले शब्द त्याचे कानीं पडले. नंतर ती व्यक्ति एकाएकी अदृश्य झाली. लेग्री एकदम उडी मारून उठला व दार उघडण्यासाठीं दरवाजाकडे धांवला पण तें पूर्ववत् बंद होतें ! लेग्री मूर्छित होऊन पडला !

हे सर्व कॅसीचेच खेळ होते.

त्या दिवसापासून लेग्री अतिशयच दारू पिऊं लागला व लौक-रच तो अत्यवस्थ असल्याची बातमी जिकडे तिकडे पसरली. त्याच्या खोलींत जातांच तो ज्या भयंकर किंकाळ्या मारी व आपणापुढें दिसणाऱ्या भेसूर दृश्यांचें जें वर्णन करी तें ऐकून कोणाचेही अंगावरील केस भीतीनें उभे राहत असत.

ज्या रात्रीं लेग्रीला वरील भयंकर दृश्य दिसलें त्याचे दुसरे दिवशीं पहाटचे सुमारास दोन शुभ्र वस्त्रें परिधान केलेल्या व्यक्ति लेग्रीचें घराचे दारांतून बाहेर पडून रस्त्याकडे गेलेल्या कित्येक गुलामांना दिसल्या. या व्यक्ति म्हणजे कॅसी व एमिलीनच होत्या.

सकाळीं त्या एका गांवास पोचल्या. कॅसीनें स्पेनमधील क्रिओल स्त्रियांप्रमाणें काळा पोषाख केला असून तोंडावर बुरखा घेतला होता. तिनें क्रिओल स्त्रीची व एमिलीननें तिचे दासीची बतावणी कर-ण्याचें ठरविलें होतें. कॅसी लहानपणापासून उच्च वर्णीय लोकांत वावरली असल्यामुळें तिला त्यांचे आचारविचारांची चांगली माहिती होती म्हणून वरीलप्रमाणें बतावणी करणें तिला मुळींच जड गेलें नाहीं. गांवांत जातांच तिनें आपल्यासाठीं एक सुंदर ट्रंक विकत

घेतली व ती एका मुलाचे डोक्यावर देऊन इतर सटरफटर सामानाची बॅग घेतलेल्या एमिलीनसह ती एका खानावळींत मुक्कामासाठीं आली.

जॉर्ज शेल्बी त्याच खाणावळींत उतरला असून त्या गांवीं येणाऱ्या बोटींतून परत जाणार होता. टॉमचा मृतदेह नेतांना त्याची व लेग्रीची झालेली बोलाचाली कॅसीनें माळ्याचे भिंतींतील फटींतून पाहिली होती. रात्रीं भुताचे वेषानें हिंडत असतां निग्रो गुलामांचें बोलणें तिनें आडून ऐकलें त्यावरून त्याचा व टॉमचा संबंध तिला कळून आला होता. तिनें त्याला तत्काळ ओळखलें. आपण जाणार त्याच बोटीनें तोही जाणार असल्याचें ऐकून तिला आनंद झाला.

कॅसीची मुद्रा, वागण्याची तऱ्हा व ती सढळ हातानें करीत असलेला खर्च पाहून खाणावळींत कोणालाही तिचेबद्दल संशय आला नाहीं. संध्याकाळचे सुमारास एक बोट त्या गांवीं आल्याचें कळतांच जॉर्जनें कॅसीला आपणाबरोबर बोटीवर नेऊन तिची चांगली व्यवस्था केली. बोट ताम्र नदींतून जात असतां जॉर्जनें अगर इतर कोणी आपली विशेष चौकशी करूं नये म्हणून कॅसीनें प्रकृतीस बरें वाटत नसल्याचें सोंग केलें व ती सारखी आपले खोलींतच पडून राहिली. तिची सेवाशुश्रूषा करण्यासाठीं तिची दासी अर्थात् एमिलीन सदैव तिचेजवळ असे.

ताम्र नदींतील प्रवास संपून मिसिसिपी नदींतून सुरू होतांच ती आपणाप्रमाणेंच उत्तरेकडे जाणार आहे हें ऐकून जॉर्जनें तिला ' सिनसिन्नाटी ' नांवाच्या भव्य बोटीवर आपणाबरोबर घेतलें. तिचा चेहरा दृष्टीस पडल्यापासून आपण हिला पुष्कळ वेळां पाहिलें असावें असें जॉर्जला वाटूं लागलें पण कोठें व केव्हां तें त्याला स्मरेना. तो वरचेवर तिचेकडे जिज्ञासेनें पहात राही. त्यामुळें कॅसी मात्र अस्वस्थ

होऊं लागली. त्याला आपला संशय तर येत नसेल असें तिला वाटूं लागलें. त्याच्याबद्दल तिचें मन चांगलें होतें म्हणून त्याला संशयांत न ठेवतां आपली हकीगत सांगून त्याचे सौजन्यावर विश्वसून रहावें, मग काय होईल तें होईल, असा बेत करून एक दिवस तिनें जॉर्जला आपली हकीगत सांगितली. ती ऐकून जॉर्जचें मन द्रवलें. लेम्रोचे मळयांतून आल्यापासून जॉर्जला त्याचे गुलामांबद्दल विशेष कळवळा वाटूं लागला होता. त्यानें कॅसीला धीर देऊन तिचें रक्षण करण्याचें वचन दिलें.

---

## प्रकरण ४२ वें.

### योगायोग !

बोटीवरील ज्या खोलींत कॅसी राहात होती त्या खोलीचे पलीकडील खोलींत डीथो नांवाची एक स्त्री आपले बारावर्षांचे सुंदर मुलीसह उतरलेली होती. लवकरच या मंडळीची ओळख होऊन त्यांच्या गप्पा गोष्टी सुरू झाल्या. जॉर्ज शेल्बी केंटुकींत राहात असल्याचें ऐकून एक दिवस डीथो बाईनें त्याला आपलें बालपण केंटुकींतच गेलें असल्याचें सांगितलें व केंटुकींतील स्थितीबद्दल व विशेषतः जॉर्ज हॅरीसबद्दल तिनें चौकशी केली.

जॉर्ज म्हणाला, ‘ जॉर्ज हॅरीस का ? मला त्याची चांगली माहिती आहे. माझ्या आईच्या दासीबरोबर तर त्याचें लग्न झालें—पुढें तो पळून गेला व आतां तो कानडांत आहे म्हणतात. ’

जॉर्जचें हें भाषण ऐकून डीथोबाईचे डोळ्यांत आनंदाश्रु आले.

ती म्हणाली, ' मिस्टर शेल्बी, तुम्हाला आश्चर्य वाटेल, जॉर्ज माझा धाकटा भाऊ ! तो अगदीं लहान असतां मला दक्षिणेकडे विकण्यांत आलें. मला एका उदार व सुशील गृहस्थांनीं विकत घेतलें व आपणाबरोबर वेस्ट इंडिज बेटांत राहावयास नेलें. मला स्वतंत्र करून त्यांनीं तेथें माझ्याशीं लग्न केलें. नुकतेच ते वारले. आपले भावाची मुक्तता करावी म्हणून मी केंटुकीला निघालें होतें. '

जॉर्ज—हां आतां मला आठवूं लागलें ! आपणाला एमिली नांवाची बहीण असून तिला दक्षिणेकडे नेऊन विकल्याचें जॉर्ज हॅरीस कधीं कधीं सांगत होता खरंच ! '

डीथोबाई—तीच-तीच बरं मी एमिली ! जॉर्ज आतां किती तरी मोठा झाला असेल बाई ! त्याचा स्वभाव कसा काय आहे हो ?

जॉर्ज—फारच गोड ! गुलामगिरींत खितपत असतांही त्याची अलौकिक बुद्धिमत्ता प्रगट झाल्याखेरीज राहिली नाहीं ! '

' बरं, त्याची बायको कशी काय आहे ? '

' अहो, ती तर सर्व सद्‌गुणांची खाण आहे ! सुंदर, हुषार, सुस्वभावी अन् किती धार्मिक वृत्तीची आहे म्हणतां ? तिला लिहितां वाचतां येतें, उत्तम शिवण काम व कशिदा काम येतें व चांगलें गातांहि येतें. आमच्या आईनें तिला मुलीप्रमाणें वाढविलें होतें. '

' ती कुठं बरं जन्मली ? तुमच्याच घरांत का ? '

' नाहीं. पुष्कळ वर्षांपूर्वीं बाबांनीं तिला न्यूअरलिन्सहून विकत आणली. त्यावेळीं ती सारी आठ नऊ वर्षांची असून मोठी देखणी दिसे. म्हणून बाबांनीं तिला फार किंमत देऊन घेतली. परवां ते वारले तेव्हां त्यांच्या कागदपत्रांत एलिझाचें खरेदीखत सांपडलें त्यावरून ही गोष्ट मला तरी कळून आली. '

कॅसी हा संवाद ऐकत बसली होती. एलिझाची हकीकत ऐकून

तिची मुद्रा चमत्कारिक झाली. ती जॉर्जला म्हणाली, ' तुमच्या वडिलांनीं तिला कुणापासून विकत घेतलं त्याचं नांव तुमच्या लक्षांत आहे का ? '

' मला वाटतें त्याचें नांव सिमन्स असावं—हो, हेंच नांव त्या खरेदीखतांत वाचल्याचें मला स्मरतें. ' जॉर्ज उत्तरला.

' अरे देवा ! तीच—' इतकें बोलून कॅसी धाडकन् जमीनीवर पडली व बेशुद्ध झाली.

जॉर्ज व डीथोबाई आश्चर्यातिरेकानें कॅसीकडे पहात राहिली. तिच्या मूर्च्छेचें कारण त्यांना कळेना. बोटीवरील इतर कांहीं मंडळींचे मदतीनें त्यांनीं तिला शुद्धीवर आणलें. शुद्धीवर येतांच ती भिंतीकडे तोंड करून एखाद्या लहान मुलाप्रमाणें हुंदके देऊन रडत होती. अखेर देवाला आपली दया आली असं तिला वाटलें कारण इतक्या वर्षांनीं तिच्या मुलीचें वृत्त आज तिला कळलें.

एलिझाचे व कॅसीचे चेहऱ्यांत साम्य असल्यामुळें तिला कोठें तरी पाहिलें असावें असें आपणास कां वाटत होतें याचा जॉर्जला उलगडा झाला.

या प्रसंगामुळें डीथोबाई व कॅसी यांची मैत्री जमली. आतां दोघींचा उद्देश एकच होता. दोघींनीं मिळूनच जॉर्ज हॅरीस व एलिझा यांचा शोध काढावयाचा असें ठरविलें. जॉर्ज शेल्बीनें एलिझाचें खरेदीखत कॅसीकडे पाठविलें. तें पाहून तिची खात्रीच झाली.

त्या दोघी तपास करीत करीत कॅनडाकडे निघाल्या. कांहीं दिवसांनीं त्या ॲमहर्स्टबर्गला पोंचल्या. याच ठिकाणीं राहणाऱ्या एका परोपकारी मिशनरी गृहस्थाचें घरीं जॉर्ज व एलिझा कॅनडाला पोंचल्यानंतर प्रथम उतरली होतीं, हें वाचकांस स्मरत असेलच. या मिशनरी गृहस्थांना कॅसी व डीथोबाई यांची हकीगत ऐकून आनंद झाला.

जॉर्ज हॅरीस आपले बायकोमुलांसह मौंटरिअल शहरीं राहात असल्याचें सांगून तो त्यांचेबरोबर मौंटरिअलला जाण्यास निघाला.

गेलीं पांच वर्षें जॉर्ज हॅरीस सहकुटुंब मौंटरिअलमधील एका लहानशा पण टुमदार घरांत स्वातंत्र्याचा उपभोग घेत आनंदानें राहिला होता. एका सुशील गृहस्थाचें वर्कशॉपमध्यें त्याला नोकरी असून पगार चांगला मिळे. दरम्यान त्यांना एक मुलगी झाली होती. छोटी एलिझा आपले आईची प्रतिमाच होती. जॉर्जची ज्ञानपिपासाप्रबल असल्यामुळें फुरसतीच्या वेळीं तो चांगल्या पुस्तकांचा अभ्यास करी. हॅरी हा मोठा होऊन शाळेंत जाऊं लागला होता.

ते दिवशीं संध्याकाळीं जॉर्ज कामावरून परत येऊन आपले बायको–मुलांशीं बोलत बसला असतां डीथो व कॅसी यांना घेऊन आमचे मिशनरी गृहस्थ तेथें आले. जॉर्जला पाहतांच डीथोबाई एकदम त्याचे गळ्यास मिठी मारून म्हणाली, 'जॉर्ज ! मला ओळखलंस कां ? मी तुझी बहीण एमिली ! '

कॅसीनें छोट्या एलिझालाच हृदयाशीं धरलें व ती म्हणाली, ' बाळ ! मी तुझी आई ! '

एलिझाला ज्या वेळीं लहानपणीं कॅसीपासून नेण्यांत आले, तेव्हां ती या छोट्या एलिझेएवढीच होती व तशीच दिसे. इतक्या वर्षांनीं ती एवढीच कशी राहील इतका विचार आनंदातिशयामुळें कॅसीला राहिला नाहीं. असो. मिशनरीबुवांनीं सर्व खुलासा केला. इतक्या वर्षांनीं जॉर्जला बहीण व एलिझाला आई भेटली ! त्या वेळीं त्या सर्वांचे डोळ्यांतून आनंदाश्रु वाहूं लागले. त्यांनीं गुडघे टेकून मनोभावें परमेश्वराची प्रार्थना केली.

यानंतर दोन तीन दिवसांतच कॅसीचे वृत्तींत किती तरी फरक पडला. निराशेमुळें खिन्न व कष्टी दिसणाऱ्या तिच्या चेहऱ्यावर सम-

धानाची छटा हिसूं लागली. तिला मुलीपेक्षां नातच जास्त आवडे व तिला खेळवण्यांत तिचा वेळ तेव्हांच जाई. एलिझाची धर्मपरायणता व धार्मिक पुस्तकांचें सतत वाचन यायोगें कॅसीचे नास्तिकपणाचे विचार पूर्णपणें मावळले.

डीथोबाईची सांपत्तिक स्थिति चांगली होती. जॉर्जजवळच राहण्याचें तिनें ठरविलें. एक दिवस ती जॉर्जला म्हणाली, 'जॉर्ज तुझ्या सुखसोईसाठीं आपणाजवळचे सारे पैसे खर्च करण्याचा माझा विचार आहे.'

हें ऐकून जॉर्ज आनंदानें उद्गारला 'ताई ! तर मग हे पैसे खर्च करून मला चांगलें शिक्षण दे. त्यासाठीं मी फार हापापलों आहे ! एकदां मी सुशिक्षित झालों म्हणजे माझ्या मनाप्रमाणें मला साऱ्या गोष्टी करतां येतील !'

बराच वेळ विचार करून या सर्व मंडळींनीं कांहीं वर्षे फ्रान्समध्ये जाऊन राहण्याचें ठरविलें. एमिलीन त्यांचेबरोबर होतीच. बोटीवरील एका गृहस्थाचें तिच्यावर मन बसलें व त्या उभयतांचा लौकरच विवाह झाला.

चार वर्षें एका फ्रेंच विश्वविद्यालयांत राहून जॉर्जनें झटून अभ्यास केला व चांगलें शिक्षण मिळविलें.

पुढें फ्रान्समधील राजकीय स्थिति चमत्कारीक झाल्यामुळें या मंडळींना फ्रान्स सोडून जाणें जरूर झालें. पण परत अमेरिकेला येण्याची जॉर्जची इच्छा नव्हती. आफ्रिकेंतील आपले निग्रो बांधवांबद्दल त्याचें मन फार हळहळे. त्यांच्यांत राहून व त्यांना शिक्षण देऊन त्यांची शक्य ती सुधारणा करावयाची व निग्रोंचें एक स्वतंत्र राष्ट्र बनवावयाचें हें ध्येय त्याचे डोळ्यापुढें होतें. त्याप्रमाणें तो आपले कुटुंबांतील सर्व मंडळीसह आफ्रिकेंत राहावयास गेला.

# प्रकरण ४३ वें

## अखेर

जॉर्ज शेल्बीनें आपण केंटुकीस परत येत असल्याबद्दल आपले आईस जें पत्र पाठविलें होतें त्यांत फक्त ' मी अमुक दिवशीं येतों ' एवढाच मजकूर होता. टॉमचे मृत्यूची हकीकत त्याच्यानें लिहवली नाहीं. ती लिहिण्याचा त्यानें बरेच वेळां प्रयत्न केला, पण दरवेळीं त्याचे अन्तःकरण भरून येई व डोळ्यांतून खालील कागदावर टपाटप अश्रू गळूं लागत; यामुळें त्याला पुढें लिहिणें अशक्य होऊन जाई. अखेर कंटाळून त्यानें तो नाद सोडला.

त्याचे पत्राप्रमाणें तो येण्याचे दिवशीं शेल्बीचें घरची सर्व मंडळी मोठ्या उत्सुकतेनें त्याची व टॉमची वाट पाहात होती.

दिवाणखान्यांत मिसेस शेल्बी क्लोकाकूशीं बोलत बसल्या होत्या. आपले कारभारी आज आपणास भेटणार या विचारानें आनंदित झालेल्या क्लोकाकूनें छानदार पोषाख केलेला होता.

' छोट्यासाहेबांनीं कारभाऱ्यांच्याबद्दल काय काय लिहिलं आहे?' क्लोकाकूनें उत्सुकतेनें विचारलें.

' त्यानं त्याबद्दल कांहींच लिहिलं नाहीं ग. फक्त मी आज येतों एवढाच त्याच्या पत्रांत मजकूर आहे. मला वाटतं समक्ष भेटींत तो सर्व हकीकत सांगणार असावा. ' मिसेस शेल्बी उत्तरल्या.

' छोट्या साहेबांची ही नेहमींचीच रीत आहे म्हणा! त्यांना इथनं जाऊन पांच वर्षं झाली. आतां आपलीं मुलं किती तरी मोठी झालेली पाहून त्यांना फार कौतुक वाटेल नाहीं? बाईसाहेब, मी लुइव्हिलला नोकरी करून आणलेले पैसे नीट ठेवलेत ना? मला ते त्यांना दाखवायचे आहेत!'

'होय, हे बघ मीं ते टेबलावरच ठेवले आहेत!' मिसेस शेल्बी म्हणाल्या.

जॉर्जनें टॉमबद्दल कांहींच न लिहितां फक्त एकच ओळ व तीहि स्वतःचे येण्यासंबंधीं लिहिली असल्यामुळें मिसेस शेल्बींना बरीच हुर हुर वाटत होती. तथापि त्याबद्दल त्या कांहीं बोलल्या नाहींत.

गाडीचे चाकाचा आवाज ऐकूं येतांच क्लो खिडकींतून डोकावून म्हणाली, 'बाईसाहेब, छोटे साहेब आले!'

दोघीही दरवाज्याकडे धांवल्या. जॉर्जला पाहून मिसेस शेल्बीनें आनंद झाला. पण त्याला एकटाच पाहून क्लोचं मन चरकलें! तिचा हात आपले हातांत धरून जॉर्ज तिचेकडे केविलवाण्या मुद्रेनें पहात म्हणाला, 'क्लो–काकू! कसें हो सांगूं तुम्हांला? टॉम काकाला परत आणण्यासाठीं मीं वाटेल तें दिलें असतें! पण काय करायचें! ते आम्हां सर्वांना सोडून देवाकडे गेले!!'

हें ऐकून मिसेस शेल्बींना रडूं कोसळलें. क्लो मात्र स्तब्ध उभी होती. नंतर ते सर्व दिवाणखान्यांत परत आले.

टेबलावरील पैसे मिसेस शेल्बींना परत देऊन क्लो म्हणाली, 'या मेल्या पैशांना घेऊन मला आतां काय करायचं आहे? मला त्याचं दर्शनसुद्धां नको! मला वाटलं होतं तसंच झालं! दक्षिणेकडे गेललं मनुष्य परत कुठलं भेटायला?'

ती जाऊं लागलेली पाहतांच मिसेस शेल्बींनीं तिच्या हाताला धरून तिला एका खुर्चीवर बसविलें व तिचेजवळ बसत त्या म्हणाल्या, 'देवा! काय रे झालं हें!'

धानिणीचे खांद्यावर डोकें ठेवून क्लो स्फुंदत म्हणाली, 'बाईसाहेब! मी हें सहन तरी कसं करूं? माझ्या काळजाचे तुकडे तुकडे होताहेत हो!!'

कांहीं वेळ सर्वत्र स्तब्धता होती. तेथें जमलेल्या सर्व मंडळीचे डोळ्यांतून अश्रु वहात होते. नंतर जॉर्ज क्लोकाकूजवळ जाऊन बसला व त्यानें टॉमचे मृत्यूची हकीकत व त्याचा शेवटचा निरोप कसा कसा तिला सांगितला.

यानंतर सुमारें एक महिन्याने एके दिवशीं जॉर्जनें आपल्या साऱ्या गुलाम मंडळींना दिवाणखान्यांत एकत्र जमविलें. त्याचे हातांत बरे-चसे कागद होते. हे कागद म्हणजे त्यांना गुलामगिरींतून मुक्त केल्या-बद्दलचीं सर्टीफिकिटें असून जॉर्ज प्रत्येकाला बोलावून त्याचे सर्टि-फिकेट त्याला वाचून दाखवी व त्याचे हातांत देई. तें पाहून त्या सर्वांना आनंद झाला.

नंतर पुष्कळजण त्याचेकडे जाऊन आपलीं सार्टीफिकिटें परत देत म्हणाले 'धनीसाहेब ! नका आम्हाला असें दूर लोटूं ! आम्हांला हीं सार्टीफिकिटें घेऊन काय करायचीं आहेत ? आम्ही इथें सुखांत आहों आम्हांला स्वतंत्रता नको !'

त्यांचा गलगा थांबवून जॉर्ज म्हणाला, 'मित्रांनो, तुम्हांला इथून जायचें कारण नाहीं. तुम्ही सारीं मंडळी आम्हांला पूर्ववत् कामा-साठीं हवींच आहांत, पण यापुढें तुम्ही गुलाम म्हणून इथें न राहतां नोकर म्हणून राहाल व तुमच्या कामाबद्दल मी तुम्हांला तुमचे आमचे विचारानें ठरेल तो पगार देईन. बहुधा धन्याला कर्ज झालें किंवा तो मेला म्हणजे त्याच्या गुलामांची विक्री होते. तुमच्या-वर अशी पाळी केव्हांही येऊं नये. म्हणून मीं ही योजना केली आहे. आपल्या स्वातंत्र्याचा कसा सदुपयोग करावा तें तुम्हांला शिकवण्याचा माझा विचार आहे; मात्र तुम्ही भलेपणानें वागून शिकायला तयार झालें पाहिजे. आपल्या मुक्ततेबद्दल तुम्ही देवाची प्रार्थना करून त्याला धन्यवाद द्या.

तेथेंच लहानाचा मोठा झालेल्या एका वृद्ध व अंध निग्रो गुलामानें जॉर्जचे म्हणण्यास पाठिंबा दिला. तेव्हां सर्व मंडळींनीं गुडघे टेकून गद्गदित अन्तःकरणानें ईश्वराची प्रार्थना केली.

नंतर जॉर्ज म्हणाला, ' आतां फक्त एकच गोष्ट सांगावयाची राहिली. आपला टॉमकाका तुम्हां सर्वांना माहीतच आहे. त्याचे थडग्याजवळ बसून गुलामगिरीचा नायनाट करण्यासाठीं माझे एकट्याचे हातून होईल तितका प्रयत्न करण्याची मीं शपथ घेतली होती. आजपासून मी कधींही गुलाम जवळ बाळगणार नाहीं. तुमच्या मुक्ततेचें सर्व श्रेय टॉमकाकाला आहे. त्याच्या बायको–मुलांशीं ममतेनें वागा. टॉमकाकाची झोपडी हेंच त्याचें स्मारक होय. जेव्हां जेव्हां म्हणून त्या झोपडीकडे तुमची नजर होईल तेव्हां आपणाला स्वातंत्र्य देणाऱ्या त्या पुण्यात्म्याचें स्मरण करा व त्याचेप्रमाणें सद्गुणी होण्याचा निश्चय करून त्याप्रमाणें वागा.